# मानसशास्त्र-प्रवेश





–: लेखक :–

**शरयू बाळ**, एम् ए., बी.टी.
प्रिन्सिपॉल, श्री. ना. दा. ठाकरसी कॉलेज्, पुणें.

**वा. दा. गोखले**, एम्.ए., बी.टी.
प्राध्यापक, श्री. ना. दा. ठाकरसी कॉलेज, पुणें.

# मनोगत

'मानसशास्त्र' या विषयावर मराठीत काही पुस्तके आहेत; पण विद्यापीठाच्या पदवीपरीक्षासाठी म्हणून लिहिलेले व तेहि विद्यापीठाने नियुक्त केलेल्या अभ्यासक्रमानुसार असलेले असे पुस्तक उपलब्ध नसल्याने विद्यार्थ्यांची मोठी गैरसोय होते. प्राथमिक व दुय्यम अध्यापकशाळांतहि मानसशास्त्र हा विषय अभ्यासिला जातो हे ध्यानात घेऊन मराठीतून या शास्त्राचा अभ्यास करणारास थोडेसे साहाय्य व्हावे, एवढ्याच हेतूने मानसशास्त्र-प्रवेश हे पुस्तक लिहिले आहे. इंग्लिश भाषेतील सर्वमान्य व अधिकृत ग्रथाचा उपयोग केला असल्यामुळे प्रस्तुत पुस्तक म्हणजे इग्रजी मानसशास्त्राचा एक मराठी अवतार असेच म्हणणे सयुक्तिक होईल. लेखकाचे ज्ञान इग्रजी पुस्तकावर आधारलेले, प्रत्यक्ष मानसशास्त्रीय प्रयोग करून पाहाण्याची साधने अनुपलब्ध, या दृष्टीने या पुस्तकात नावीन्य अगर स्वतत्र विचार याचा अभाव असणे क्रमप्राप्त आहे. पाश्चात्य विशेषनामांच्या उच्चारांतहि मतभिन्नता दिसून येईल. मानसशास्त्र हे साप्रत वर्धमान आहे, त्यामुळे कित्येक मतप्रणाली [illegible] आहेत. म्हणून आतापर्यंत जी तत्त्वे सामान्यतः मान्य अशी मानली जातात, त्यांचेच विवेचन प्रस्तुत पुस्तकात केले आहे. मराठी भाषेच्या एखाद्या नामवंत सेवकाने असले पुस्तक लिहिले असते तर त्यातील भाषाहि रसाळ व समर्पक झाली असती. पुस्तकातील भाषा काही ठिकाणी सदोष व दुर्बोध असल्यास तो दोष लेखकाचा आहे.

'मानसशास्त्रप्रवेशा'चे दोन भाग आहेत. पहिल्या भागात मानसशास्त्राच्या विविध तत्त्वांचा ऊहापोह केला आहे. मानसशास्त्रातील विविध वाद व वादांगे याचा परिचय व्हावा व त्यामुळे या शास्त्राचे आकलन पूर्णतया व्हावे या हेतूने दुसरा भाग लिहिला आहे. दोन्ही भागातील विषयाचे विवेचन अद्ययावत् करण्याचा प्रयत्न केला असल्यामुळे या पुस्तकाच्या वाचनाने अभ्यासकाला मानसशास्त्राची चागली ओळख होईल असे

वाटते. पुस्तक लिहावे हे ठरविणे सोपे होते; पण प्रत्यक्ष लिहिण्याला आरभ झाला आणि खऱ्या अडचणी पुढे उभ्या राहिल्या पहिली अडचण परिभाषेची. मराठीत प्रत्येक शास्त्राच्या बाबतीत ही अडचण उपस्थित होणारच; परतु मानसशास्त्राची परिभाषा प्रा दे. द. वाडेकर याच्यासारख्या अनुभवी प्राध्यापकांनी छापली असल्यामुळे, लेखकाची मोठी सोय झाली. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनेहि परिभाषेची एक पुस्तिका तयार केली आहे. प्रस्तुत पुस्तकांत प्रा. वाडेकर याची परिभाषा प्रामुख्याने उपयोगिली आहे. दुसरी अडचण मार्गदर्शनाची. लेखकाचे ज्ञान पुस्तकी अर्थात् मार्गदर्शन अत्यत आवश्यक. सुदैवाने याहि अडचणीचे निरसन झाले गुरुवर्य प्राध्यापक दे. द. वाडेकर यानी मोठ्या आपुलकीने व तत्परतेने पुस्तकाचे हस्तलिखित वाचले व त्यात अनेक सुधारणा केल्या. सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्रिन्सिपाल गुरुवर्य प्राध्यापक श. वा दाडेकर व फर्ग्युसनचे प्राध्यापक गुरुवर्य प्रा. न. ग. दामले यानीहि पुस्तक नजरेखालून घातले. प्राध्यापक वाडेकरानी पुस्तकाला प्रस्तावना लिहून लेखकाचा पुरस्कार केला. या सर्व विद्वानाचे उपकार शब्दानी फिटतील असे वाटत नाही. लेखक कृतज्ञ आहेत एवढेच म्हणता येईल.

ज्या अनेक इग्रजी पुस्तकाचे साहाय्य झाले, त्याच्या कर्त्यांचे ऋण बोलून दाखविणेच फक्त शक्य आहे. या पुस्तकात जे काही चागले आहे त्याचे सर्व श्रेय आधारभूत ग्रथाच्या विद्वान् लेखकाना द्यावे लागेल व जे दोषयुक्त आहे त्याचे धनी सर्वस्वी प्रस्तुत लेखक आहेत. असो, मराठीतून मानसशास्त्राचा अभ्यास करणाराना " मानसशास्त्र-प्रवेश " उपयुक्त ठरेल अशी आशा आहे.

पुणे, मार्गशीर्ष शुद्ध, ८, १८७१.
दि. २८।११।१९४९.

—लेखक

# प्रस्तावना



‘ मानसशास्त्र-प्रवेश ’ या प्रस्तुत ग्रथाच्या कर्त्या प्रिन्सिपल (सौ ) शरयू बाळ यानी काही दिवसापूर्वी आपण प्रा वा दा गोखले याच्या साहाय्याने हे पुस्तक लिहिले असून त्यास मी प्रस्तावना लिहावी अशी जेव्हा इच्छा प्रदर्शित केली तेव्हा मी त्यास समति दिली याची कारणे मुख्यतः तीन एकतर सौ बाळ या एम् ए. च्या वर्गांत असताना येथील आतरमहाविद्यालयीन अध्यापनव्यवस्थेत माझ्या विद्यार्थिनी होत्या व त्यावेळेपासून मानसशास्त्राच्या एक आस्थेवाईक व चौकस अभ्यासक म्हणून मला माहित होत्या दुसरे असे की एरडवण्याच्या महिला महाविद्यालयात मानसशास्त्राचे अध्यापन त्या स्वत. मराठींतून करीत असल्याने अशा अनुभविक शिक्षिकेच्या मराठी ग्रथलेखनाचे स्वागत करणे आवश्यकच आहे. तिसरे असे की माझ्या “मानसशास्त्रीय परिभाषेच्या कोशा” चा बराच उपयोग करून हा ग्रथ लिहिल्याचे त्यानी मला सागितल्यामुळे आपल्या परिभाषेचा कसा काय उपयोग होतो आहे हे पाहण्याची मला जिज्ञासा होतीच

हा ग्रथ वाचून पाहिल्यानतर ग्रथकर्त्रीचे मानसशास्त्राचे वाचन विस्तृत व साक्षेपी असल्याचे व ती आपल्या विषयात समरस झाली असल्याचे स्पष्ट दिसते विवेचनाचे क्षेत्र विस्तृत घेतले असून विवेचन बहुशः सुगम आहे. ग्रथाचे दोन विभाग असून पहिल्या विभागात मानसशास्त्राची सामान्य तत्त्वे प्रतिपादिली आहेत, व दुसऱ्या विभागांत मानसशास्त्रातील प्रस्तुत ग्रथाची स्थूल मते व त्यातील प्रमुख आचार्य याची माहिती दिली आहे. शेवटी मानसशास्त्राचा मानवी व्यवहारांत कसा अनेकविध उपयोग होतो त्यासबंधीहि एक प्रकरण जोडले आहे.

प्रकरणांच्या किवा विषयाच्या क्रमातील पौर्वापर्य, विवेचनांतील किंवा विधानातील घनता, क्रमबद्ध माडणी, किंवा पूर्णत्व या दृष्टीनी

कर्त्री नवीनच लेखिका असल्याने ग्रथात काही सुधारणास्थळे राहून गेली आहेत तसेच परिभाषेच्या बाबतीतहि काही सुधारणा होऊ शकेल. परतु मानशास्त्रावरील ग्रथलेखन आपणाकडे अजूनहि नवीन गोष्ट आहे. या विषयावरील काही ग्रथाची हस्तलिखिते पारितोषिकाकरिता परीक्षक म्हणून मला तपासावी लागली होती या माझ्या अनुभवावरून हा ग्रथ बराचसा यशस्वी होऊ शकेल असे मला वाटते आणि हा ग्रथ ज्या हेतूने त्यानी लिहिला आहे की महिलाविद्यालयातील मानसशास्त्रीय अध्ययनास उपयोगी पडावा, तो हेतु या ग्रथाने बराचसा पूर्ण होईल.

ग्रथकर्त्रीस विषयाबद्दल जिव्हाळा व उत्साह विशेष असून तिचे त्याबाबतचे वाचन व ज्ञानहि अभिनदनीय आहे. आणि या ग्रथाच्या लेखनावरून पहावयाचे तर प्रि. बाळ मराठीत मानसशास्त्रावरील एक महत्त्वाच्या लेखिका पुढील काळात ठरतील यात मला शका वाटत नाही. त्याच्या लेखनाबद्दल मी उज्ज्वल भविष्य चाहतो

फर्ग्युसन कॉलेज, पुणे (४)
जून १, १९४९

देविदास दत्तात्रेय वाडेकर
(मानसशास्त्राचे प्राध्यापक)

# दुसरी आवृत्ति : मनोगत

सुधारून वाढविलेल्या या आवृत्तीत प्र ३ नवीन आहे प्र. १३ मध्ये आत्मविकासाविषयी समाजशास्त्राच्या मताचे निवेचन देऊन त्या विषयाला पूर्णता आणली आहे. प्र १७ त ज्ञानग्रहणाच्या पायऱ्या-भाषा व तिचा विकास हे सपूर्णतया नवीन व उपयुक्त माहितीने भरलेले असे विवेचन केले आहे. आमचे मित्र टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशनमधील ख्यातनाम प्राध्यापक श्री रा. म मराठे यानी "प्रायोगिक मानसशास्त्र" हे प्रकरण लिहून दिले, त्यामुळे पुस्तकातील एक महत्त्वाची उणीव दूर झाली. आम्ही प्रा. मराठे याचे फार ऋणी आहोत 'तरी न्यून ते पुरते। अधिक ते सरते। करूनि घ्यावे हें तुमते। विनवितु असे'।। अशी सज्जन वाचकाना प्रार्थना करून ही आवृत्ति प्रकाशित करीत आहोत.

लेखन म. सा. परिषदेच्या नियमांप्रमाणे आहे.

—लेखक

# अनुक्रमणिका



# मानसशास्त्र-प्रवेश



प्रकरण १ लें

## मानसशास्त्राचा प्रारंभ व मनासंबंधीच्या कल्पना



मानवी बुद्धि विकसत होती आणि मानवाची जिज्ञासा वाढत होती. या परिस्थितीत ज्ञानेच्छा माणसाला स्वस्थ बसू देईना प्रत्येक बाबतीत क्षणोक्षणी "हे का ?" व "ते कसे ?" असे प्रश्न मानवी मनासमोर उभे राहू लागले बाह्य सृष्टीतील अनेकविध चमत्कार--इतकेच काय पण सृष्टीतील बारीक सारीक घटनाहि--आश्चर्याने भरलेल्या वाटत आपण विचार का करतो, कसा करतो, आपण विशिष्ट प्रसगी विशिष्ट पद्धतीने का वागतो इत्यादि स्वत सबधीच्या गोष्टीची कारणपरपरा व त्याची मीमासा अद्याप अज्ञात व अनाकलनीय होत्या तरीसुद्धा आपल्या अर्धविकसित बुद्धीच्या जोरावर मानवप्राणी बाह्यसृष्टीशी वागडू लागला याच बालसदृश जिज्ञासेतून आणि धडपडीतून अनेक आधुनिक शास्त्रे व उपशास्त्रे निर्माण झाली मनुष्यप्राण्याचाच प्रामुख्याने अभ्यास करणारी जी शास्त्रे आहेत त्यापैकी समाजशास्त्र, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, वैद्यकशास्त्र, शरीरशास्त्र व मानसशास्त्र ही प्रमुख होत. मनुष्याचा देह कोणकोणत्या द्रव्याचा बनलेला आहे, त्याची हालचाल व वाढ कशा प्रकारे होते, याचा अभ्यास शरीरशास्त्र करते व्यक्ति, समाज व विश्वनियत्रक शक्ति, या त्रिकुटाचा विचार करताना व्यक्ति व समाज याचे परस्परावलबित्व

स्पष्ट झाले त्यात एक प्रकारची समता आवश्यक दिसत होती या समतेवरच समाजाचे स्थैर्य आधारलेले दिसे त्यामुळे व्यक्ति व समाज यातील संबंध ठरविणारे नियम तयार झाले. त्यातूनच नीतिशास्त्र जन्माला आले त्याबरोबर अखिल सृष्टीच्या मागे काही तरी अदृश्य शक्ति असली पाहिजे, कारण ती नसली तर सृष्टीचा व्यवहार चालणार नाही ही जाणीव होऊ लागल्याने या शक्तीचे स्वरूप, तिची उपासना इत्यादि कल्पना व्यक्त होऊ लागल्या, व धर्म ही स्वतंत्र ज्ञानशाखा बनली मनुष्य एकटा रहात नाही तर गट करून राहतो इतकेच नव्हे तर त्या गटाचे नियंत्रण करण्यासाठी तो मोठमोठी राज्ययंत्रे निर्माण करतो, संस्था निर्माण करतो व शासनाचे एक स्वतंत्र तंत्रच बनते या सर्वांचा अभ्यास करण्यासाठी समाजशास्त्र निर्माण झाले, तर मानसशास्त्राचा उगम मनासंबंधी माहिती मिळविण्याच्या उत्सुकतेतून झाला मानसशास्त्र म्हणजे काय ? असा प्रश्न केल्यास मानसशास्त्र म्हणजे मनाचे शास्त्र ( Psychology is the science of mind ) असे उत्तर अगदी सहजच सुचते पण 'मन म्हणजे काय ?' असा प्रश्न विचारल्यास मात्र उत्तर देणे कठीण आहे या बाबतीत एका शास्त्रज्ञाने एक सुंदर वाक्य लिहिले आहे, अशा अर्थी की आकाशात उंच उड्डाण करून अंतरिक्षाचे मापन मनुष्य करू शकला, अथांग पसरलेल्या महासागराच्या सपाट विस्ताराचा थांग लावून त्याच्या अगाध समजल्या जाणाऱ्या गहीरतेची मोजदाद माणूस आज करीत आहे पण आपल्या अगदी अगदी जवळ असलेल्या मनाच्या स्वरूपाचे तसूमात्रहि मापन माणसाला करता येऊ नये हे आश्चर्य नव्हे का ? पण आजचा शास्त्रज्ञ या शोधाच्या मागे लागला आहे हे निश्चित आणि आज ना उद्या बाह्यसृष्टीच्या स्वरूपाप्रमाणेच अंतःसृष्टीच्या स्वरूपाबद्दलहि तो खात्रीची उत्तरे देऊ शकेल अशी आशा बाळगण्यास पुष्कळच जागा आहे

## मनाचें स्वरूप

'मन्यते अनेन'—विचार करते ते मन अशी सर्वसाधारण मन या शब्दाची व्युत्पत्ति देण्यात येते डोळे, कान, नाक इत्यादि पंचज्ञानेन्द्रिये गोचर असल्यामुळे त्याचे वर्णन करणे शक्य आहे पण मन हे अगोचर असल्यामुळे त्याला अन्तरिन्द्रिय म्हणून शास्त्रज्ञ मोकळे झाले ज्ञानग्रहणात मन हे

प्रधान इन्द्रिय असल्यामुळे 'इन्द्रियाणा मनश्चास्मि' असेच भगवंताला सागावे लागले ऐहिक व्यापारात गुतलेल्या माणसाच्या आध्यात्मिक प्रगतीच्या आड हेच मन येते, उलट आध्यात्मिक मार्गाने उन्नतपद प्राप्त करून देण्याला हेच मन कारणीभूत होते हे ध्यानात आणून 'मन एव मनुष्याणा कारण बन्धमोक्षयो' अशी कल्पना पुढे आली वेदान्तात अंत करणाच्या चार वृत्ति मानल्या आहेत मन, बुद्धि, अहकार आणि चित्त केवळ सोयी-साठी ही कार्यपरत्वे चार नावे दिली, पण वृत्ति एकच! मनाला वृत्ति म्हणण्यात एक प्रकारचे औचित्य साधले आहे वेदान्ती लोकाप्रमाणे इतर दर्शनकारहि मन ही स्वतत्र वस्तु मानतात त्याच्या वर्णनात व कार्यात मात्र अनेक मतमतान्तरे आहेत

पाश्चात्य देशात रूढ असलेल्या मनासबधीच्या कल्पनाकडे पहा दिल्यास अशाच निरनिराळ्या तऱ्हा त्यात दिसून येतात दकार्त नावाच्या फ्रेंच तत्त्वज्ञाने मन नावाचा मेंदूतीलच एक भाग आहे अशी कल्पना केलेली दिसते. दकार्तपूर्वी सॉक्रेटिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल या तत्त्ववेत्त्यानी आपल्या तत्त्व-ज्ञानविषयक ग्रथातून मनासबधी व बुद्धिसत्तेसबधी व त्याची मनाच्या स्वाभाविक प्रवृत्तीसबधी थोडीफार चर्चा केलेली आढळते पण 'मन' म्हणजे काय याविषयी निश्चित कल्पना मात्र कोणीच नक्की केलेली नाही. लॉक् नावाच्या इंग्लिश तत्त्वज्ञाने मन म्हणजे एक कोरीकरकरीत पाटीच होय व त्यावर अनुभवाच्या द्वारे येणाऱ्या सवेदनाकडून पहिली अक्षरे लिहिली जातात असे म्हटले आहे अशा निरनिराळ्या कल्पना पाहिल्या की फारच गोंधळ उडून जातो पण मन म्हणजे काय हे जरी निश्चित सागता आले नाही तरी ते शरीरापेक्षा निराळे आहे, त्याला काही तरी स्वरूप आहे व त्याला स्वतत्र अस्तित्व आहे यात मात्र शका वाटत नाही कारण मनाचे स्वतत्र अस्तित्व सिद्ध करण्यासाठी शेकडो उदाहरणे देता येतील अशी कल्पना करा की, वर्गात शिक्षक काही माहिती सागत असताना आपण बाह्यत: त्याकडे लक्ष आहे असे भासवीत असतो, पण एकीकडे मनात दुसरेच विचार चालले असतात अशा वेळी जर शिक्षकाने अचानक प्रश्न विचारला तर झोपेतून एकदम जागे झाल्याप्रमाणे आपण दचकतो आपल्याला प्रश्न काय विचारला आहे हेहि समजत नाही व पुरते लक्ष नसल्याने उत्तरहि

चट्दिशी देता येत नाही. अशा वेळी मनाच्या स्वतंत्र अस्तित्वाचा भरपूर पुरावा मिळतो

पुष्कळ वेळा वरकरणी देखाव्यासाठी म्हणून रस्त्यात भेटलेल्या एखाद्या माणसाशी आपण खूप गोड बोलतो; पण त्याच वेळी त्याला लाखो शिव्या देऊन "कशाला ही ब्याद आता भेटली!" असे विचारहि मनात घोळत असतात यावरून गोड बोलण्याची बाह्य कृति व तिच्या मुळाशी असलेली जाणीव व तिरस्काराने त्या माणसाला शिव्या देणारी जाणीव या दोन स्वतंत्र असल्याचे सिद्ध होते

काही वेळा एखादी गोष्ट करावी की न करावी, असा सदेह आपणास निर्माण होतो त्यावेळी आपण असा शब्दप्रयोग करतो की एक मन सागतं की 'कर' व एक मन सागत की 'अस करू नको'. यावरूनहि कृति करणाऱ्या शरीरास आज्ञा व सूचना देणारी मन ही चीज स्वतत्रच असली पाहिजे अशी खात्री पटते

स्वप्न ही घटना तर याहूनहि निर्णायक आहे. कारण झोपेत शरीर अगदी निश्चल व स्वस्थ विश्राति घेत असताना आपण आपल्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष घडत असलेल्या असख्य घटना पहात असतो. हे कार्य मनाचे स्वतत्र अस्तित्वच दाखवीत नाही काय ?

अशा तऱ्हेची आणखी शेकडो उदाहरणे देता येतील. एकूण इतके निश्चित समजण्यास हरकत नाही की मन ही एक स्वतत्र वस्तु असून त्याला शरीरापासून वेगळे अस्तित्व आहे. मग या स्वतंत्र मनाचे स्वरूप कशा प्रकारचें असेल ? मनाचे स्वरूप निश्चित रीतीने सागणे खरोखर अतिशय कठीण किंबहुना अशक्यच आहे. कारण इतर शास्त्राची गृहीत प्रमेये सिद्ध करण्यास उपकरणाचा अगर आकृत्याचा काहीतरी आधार घेता येतो. उदाहरणार्थ, भूमितीतील प्रमेये सिद्ध करण्यासाठी आपण आकृत्याचा उपयोग करू शकतो; पण मनाचे स्वरूप स्पष्ट करण्यास कोणत्या वस्तूचा अगर आकृतीचा आधार घेणार ? अशी परिस्थिति असली तरी शास्त्रज्ञ निराश होऊन बसले नाहीत. गेल्या शंभर वर्षांत मनाचे स्वरूप निश्चित शब्दांत वर्णन करण्यांत बऱ्याच शास्त्रज्ञांस यश आलेले आहे. त्याच्या आधाराने

आज आपणास असें ठासून सागता येते की मन म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून जेथे अनुभवाचे बोधन, संघटन, माडणी व पुनर्रचना होते असे जे कांही तेंच मन होय मन या नावाची स्वतत्र जागाहि नाही व वस्तुहि नाही. मनुष्याने वेळोवेळी केलेल्या क्रिया, प्रतिक्रिया व त्याची वैचारिक पार्श्वभूमि यासच आपण आज हजारो वर्षे मन अशी सज्ञा देत आलो आहो विल्यम जेम्स या शास्त्रज्ञाने असे म्हटले आहे की मन म्हणजे जाणिवेचा एक अखङ प्रवाहच होय. *

इम्यॅनुअल् काट या तत्त्वज्ञाने असे म्हटले आहे की, ज्या ठिकाणी मानवी अनुभवाचे एकत्रीकरण, सकलन व पुनर्रचना केली जाते ती पार्श्वभूमि म्हणजेच मन होय एवढी मनाची कल्पना आल्यानतर आता मानसशास्त्राची व्याख्या करणे कठीण नाही मानसशास्त्र म्हणजे मनाचे शास्त्र ही व्याख्या फारच अस्पष्ट असल्याने ती त्याज्य ठरवून त्याच्या ऐवजी मानसशास्त्र म्हणजे सजीव प्राण्याच्या अतर्बाह्य वर्तणुकीचे सत्तात्मक शास्त्र होय ही व्याख्या सर्व आधुनिक मानसशास्त्रज्ञानी मान्य केली आहे

## मानसशास्त्राचा पूर्वेतिहास

समाजशास्त्राप्रमाणेच मानसशास्त्राची महत्त्वाची सर्व वाढ व प्रगति गेल्या शेदीडशें वर्षांतच झालेली आहे

आजच्या मानसशास्त्राची शभर वर्षापूर्वीच्या मानसशास्त्राशी तुलना करणे म्हणजे अतिशय गुटगुटीत व सशक्त मुलाची त्याच्या गर्भावस्थेतील स्थितीशी तुलना करणे होय स्वतत्र मानसशास्त्राचा खराखुरा जन्म गेल्या शतकाच्या मध्यावर म्हणजे इ स. १८५० च्या सुमारास झाला. त्यापूर्वी सर्वसाधारण शास्त्रज्ञाचा दृष्टिकोन असा होता, की मानसशास्त्र हा तत्त्वज्ञानाचाच एक भाग असून त्याची स्वतत्र चर्चा करण्याची काहीच जरुरी नाही. त्यामुळे विद्वान् लोक मानसशास्त्राच्या स्वतंत्र अस्तित्वाविषयी साशंक व उदासीन होते. ग्रिकाच्या कालात प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनी

---

* Mind is nothing else but a continuous flow of consciousness.

मनाच्या विविध प्रवृत्ति व त्याचे कार्य यासबधी बरीच चर्चा आपापल्या ग्रथातून केली, पण मानवी मनाचा अभ्यास करण्यासाठी मानसशास्त्र तत्त्वज्ञानाच्या प्रान्तापासून अलग बाहेर काढणे आवश्यक आहे अशी मात्र त्याना मुळीच कल्पना नव्हती मानसशास्त्रावर पहिला स्वतत्र ग्रथ इ स. १७३४ मध्ये वुल्फ् याने लिहिला. व त्याला त्याने "तार्किक मानसशास्त्र" असे नाव दिले नतर 'ज्ञान कसे मिळविले जाते?' या प्रश्नाचा अभ्यास करताना लॉक्, बर्कले, ह्यूम, काट वगैरे लोकानी मनाच्या व्यापाराबद्दल बरच सशोधन केले गाल्टनने मनुष्याच्या स्वभाव वैचित्र्याचे चार प्रमुख भाग पाडून त्याची चर्चा केलेली आढळते अशा रीतीने भौतिक शास्त्रज्ञ मानसशास्त्रासाठी स्वतत्र प्रान्त तयार करीत असताना शिक्षणशास्त्रज्ञहि त्याना येऊन मिळाले रूसो, पेस्टॅलोझी व फ्रोबेल या तिघानी शिक्षणविषयक शास्त्राची घडण करीत असताना असा महत्त्वाचा शोध लावला, की शिक्षण म्हणजे मुलाच्या डोक्यात भारूडभर माहिती कोबणे असा अर्थ नसून मुलाच्या स्वाभाविक प्रवृत्तीचे योग्य ते सगोपन करून त्याच्या विकासास मदत करणे हा होय हरबार्ट याहि पुढे एक पाऊल गेला व त्याने असे प्रतिपादन केले, की मनाची घडण, त्याचे गुणधर्म व स्वाभाविक प्रवृत्ति ह्याचा अभ्यास करून नतरच त्यावर शास्त्रशुद्ध शिक्षणशास्त्राची इमारत उभी करणे आवश्यक आहे

मानसशास्त्राच्या स्वतत्र अभ्यासाची कल्पना याच वेळी शरीरशास्त्र-ज्ञाच्या मनातहि डोकावू लागली होती निरनिराळ्या शारीरिक कृतीचा अभ्यास करताना त्यास असे दिसून आले की, मानवी कृति या यात्रिक क्रिया-सारख्या एकसधी आधळ्या नसतात. त्याच्या पाठीमागे कोणतीतरी अदृश्य अशी प्रेरणाशक्ति असते. या प्रेरणाशक्तीच्या कार्याचा स्वतत्रपणे अभ्यास केल्याशिवाय शरीरशास्त्र प्रगत होणार नाही.

'प्रयोजनम् अनुद्दिश्य न मदोऽपि प्रवर्तते' या संस्कृत वचनात सागि-तल्याप्रमाणे कोणत्याहि कृतीमागे हेतु हा असलाच पाहिजे या हेतूच्या स्वरूपाचे स्पष्टीकरण स्वतत्रपणे केल्याखेरीज कृतीचे मूल्यमापन करणें शक्य नाही. अशा रीतीने स्वतत्र मानसशास्त्राची मागणी सर्वतोमुखी झाल्याने

मानसशास्त्राची वाढ गेल्या १००–१५० वर्षांत आश्चर्यकारक झपाट्याने झालेली दिसून येते.

ऐतिहासिक दृष्टया मानसशास्त्राच्या विकासाचे एकूण तीन कालखंड पाडले जातात :—

(१) इ स. १८३३ पूर्वीचा काल :—या कालात शरीरशास्त्र व शिक्षणशास्त्र याचे मानसशास्त्राशी जिव्हाळयाचे सबध प्रस्थापित झाले त्याचप्रमाणे इतरहि सर्व शास्त्राना पाया म्हणून मानमशास्त्राचा फार मोठा उपयोग होईल ही गोष्टहि सर्वाना पटली सामान्य माणसाप्रमाणेच असामान्य माणसाच्या मनोव्यापाराचा व मनोविकृतीचाहि अभ्यास करण्याची शक्यता शास्त्रज्ञान दिसून आली व पटू लागली पण अजूनहि बरेच लोक मानसशास्त्रास इतर वैज्ञानिक शास्त्राच्या रागेत बसविण्यास तयार नव्हते.

(२) इ स १८३३ ते १९०० पर्यतचा काल :—या कालातील अत्यत महत्त्वाच्या घडामोडीपैकी पहिली म्हणजे प्रायोगिक मानसशास्त्राची सुरवात मानसशास्त्रातील प्रयोगाच्या शक्यतेबद्दल पहिले पुस्तक फेक्नरने इ स १८६० मध्ये लिहिले प्रत्यक्ष पहिली प्रयोगशाळा वुटने इ स १८७९ मध्ये लिपसिकला काढली दुसरी या कालातील महत्त्वाची घटना म्हणजे इ स १८५९ मध्ये डार्विनने आपला विकासवादावरचा जगद्विख्यात सिद्धात 'Origin of Species' हा पुस्तकरूपाने जगापुढे ठेवला.

वरील दोन घटनानी मानसशास्त्रास तत्त्वज्ञानापासून पूर्णपणें विभक्त केले व त्याच्या स्वतत्र स्थानाला मान्यता मिळविली. इ. स. १९०० पर्यत प्रायोगिक मानसशास्त्राची झपाट्याने वाढ होत गेली व मानसशास्त्राचे सर्व प्रश्न विकासवादाच्या आधाराने सोडविण्याचे प्रयत्न होऊ लागले.

(३) इ. स १९०० च्या पुढचा काल :—हा काल म्हणजे मानसशास्त्रातील निरनिराळ्या पंथाच्या उदयाचा काल होय. या पंथापैकी प्रमुख पथ म्हणजे (१) वर्तनवाद, (२) मनोविश्लेषणवाद, (३) समष्टि किवा साकल्यवाद, (४) अंतर्निरीक्षणवाद व (५) हेतुवाद हे होत. या पंथानी मानसशास्त्राच्या अभ्यासाविषयी इतके निरनिराळे दृष्टिकोन पुढे मांडले की, मानसशास्त्र एक नसून तीं अनेक आहेत की काय असा वरवर पाह-

णाऱ्यास भास होतो. या सर्व मतप्रणालीचे दृष्टिकोन जरी एकमेकापासून खूप भिन्न असले तरी एक गोष्ट मात्र सर्वांनीच मान्य केली आहे व ती म्हणजे मानसशास्त्राच्या अभ्यासास शरीरशास्त्राच्या अभ्यासाची जोड देणे अत्यत आवश्यक आहे या दृष्टीने पचेन्द्रिये, मेंदू, ज्ञानततु वगैरेच्या अभ्यासास सर्वच विचारवतानी महत्त्वाचे स्थान दिलेले आहे.

## मानसशास्त्राचा अभ्यासविषय

आतापर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट वाचकाच्या सहज ध्यानात आली असेल की मानसशास्त्रात आपण मनोव्यापाराचा व मनाच्या कार्याचा अभ्यास करतो. 'मनोव्यापार' या शब्दात कोणकोणत्या गोष्टीचा समावेश होतो ? बाह्य जगासबधी पचेंद्रियाकडून आलेला सर्व अनुभव साठविणें हे मनाचे पहिले कार्य होय दुसरे, हा अनुभव घेताना मन नुसते स्वस्थ नसते तर सवेदनाकडून आलेल्या अनुभवाचा अर्थ लावणे हे कार्य मनाकडून चालू असते. जरूर त्या गोष्टीकडे अवधान केन्द्रित करून अनुभवाचे ठसे पक्के करणे हे मनाचे तिसरे कार्य होय यालाच आपण स्मृति असे म्हणतो मिळालेल्या अनुभवातून जरूर त्या कल्पना एकत्र करून त्यातून काव्य व शास्त्रे निर्माण करण्याचे मनाचे चवथे व अतिशय महत्त्वाचे कार्य होय. अशा रीतीने अनु-भवाचे ग्रहण, सघटन, पुनर्रचना व त्यातून नवीन कल्पनाची निर्मिति अशा तऱ्हेच्या मनाच्या विविध कार्याचा अभ्यास आपण मानसशास्त्रात करतो

मन ही दृश्य वस्तु नसल्याने इतराच्या मनोव्यापाराचा अभ्यास कर-ण्याचे साधन काय ? याला एकच उत्तर व ते म्हणजे बाह्य वर्तनाचे निरीक्षण करून त्या वर्तनापाठीमागे असणारे विचार व विकार याचा तलास लावणे. वर्तणुकीचे बरेचसे नमुने सर्वसामान्य असल्याने अशा तऱ्हेची अनुमाने काढणे शक्य होते. यावरून बाह्य वर्तणुकीच्या अभ्यासासहि मानसशास्त्राच्या अभ्यासात फार महत्त्वाचे स्थान आहे हे लक्षात येईल.

तिसरे असें की मन म्हणजे एक कोरीकरकरीत पाटीच होय, तिच्यावर संवेदनाकडूनच पहिली अक्षरे लिहिली जातात, हे लॉकचे विधान तितकेसे खरें नाही. कारण प्रत्येक प्राण्यात काही काही प्रवृत्ति उपजतच असलेल्या दिसून येतात. बदकाचें पिल्लू उपजल्याबरोबर पाण्यांत टाकले तरी

आपोआप पोहूं लागतें. एखादा मुलगा कोणीहि न शिकवता आपोआप चित्रे काढतो. गाईचे वासरू जन्मल्याबरोबर अर्ध्या तासांतच उभे राहते. या सर्व गोष्टी शिकविल्याखेरीज येतात यावरून त्यासबधीच्या प्रेरणा उपजतच असल्या पाहिजेत अशा नैसर्गिक प्रवृत्ति कोणत्या असतात, त्याची सख्या निश्चित ठरविता येईल काय वगैरे प्रश्नाचा विचारहि मानसशास्त्रज्ञानेच करावयाचा आहे शिवाय प्रयोग व निरीक्षण याच्या साहाय्याने वेडी माणसे, लहान मुले, इतर प्राणी याच्याहि मनोव्यापाराचे शास्त्रीय दिग्दर्शन करण्याचे काम मानसशास्त्र करते

गेल्या तीस-चाळीस वर्षानतर मानसशास्त्राचा प्रात इतका विस्तृत झाला आहे की त्याच्या निरनिराळ्या शाखा कराव्या लागल्या आहेत यापैकी काही प्रमुख शाखा खालीलप्रमाणे सागता येतील (१) शैक्षणिक मानसशास्त्र— शिक्षणशास्त्रात तर हल्ली मानसशास्त्राच्या मदतीखेरीज पाऊलच हालत नाही (२) व्यवसायविषयक मानसशास्त्र (Business Psychology). (३) पशु-मानसशास्त्र (Animal Psychology) (४) विकृत व्यक्तीचे मानसशास्त्र (Abnormal Psychology) (५) बाल मानसशास्त्र (Child Psychology) (६) सामाजिक मानसशास्त्र (Social Psychology) वगैरे यावरून या शास्त्राच्या अभ्यासाचे महत्त्व हल्ली लोकाना किती तीव्रतेने पटू लागले आहे हे दिसून येईल. मानसशास्त्राचा अभ्यासविषय व प्रात रेखीव करण्यासाठी त्याची इतर काही शास्त्राशी तुलना करू

## मानसशास्त्र व नीतिशास्त्र

या दोन शास्त्रात असलेले साम्य प्रथम विचारात घेऊ (१) पहिला मुद्दा असा की ही दोन्ही शास्त्रे फक्त मनुष्यप्राण्यापुरतीच मर्यादित आहेत. नीति व अनीति ह्या कसोट्या काही आपण मनुष्येतर प्राण्याना लावीत नाही. बुद्धिनिष्ठांसाठीच चांगल्या व वाईट या कल्पनाचा अर्थ असतो. मानसशास्त्रांतील नव्याण्णव टक्के भागहि मनुष्याच्या मनोव्यापाराचा व कृतीच्या निरीक्षणावरच अवलबून असतो. ‘हेतु’ हा जो मानसशास्त्राच्या अभ्यासविषयाचा गाभा त्याचे अस्तित्व मनुष्यप्राण्यात जितक्या सुस्पष्टतेने आढळतें

तितके खालच्या दर्जाच्या प्राण्यात आढळत नाही. कारण खालच्या प्राण्याच्या प्राथमिक गरजाहि मर्यादित स्वरूपाच्या असतात. त्या साध्य करून घेणाऱ्या त्याच्या कृतीच्या मागचे हेतुहि अगदी प्राथमिक स्वरूपाचेच असल्याने त्यात सखोल अभ्यासास फारसा वावच नसतो अशा रीतीने मानसशास्त्र व नीतिशास्त्र या दोघाचाहि अभ्यासविषय मुख्यत मानवी वर्तणूक व त्या पाठीमागील प्रेरणा हाच आहे

या एकाच मुद्द्यात मानसशास्त्र व नीतिशास्त्र याच्यातील साम्य सपते आता या दोन शास्त्राच्या दृष्टिकोनात दिसून येणारे महत्त्वाचे फरक पाहू. मनुष्याच्या वागणुकीचा आदर्श काय असावा, या सबधीची चर्चा नीतिशास्त्रात केली जाते उलट मानसशास्त्राला व्यक्तीपुढे वागणुकीचा कोणताहि आदर्श ठेवावयाचा नसतो तर फक्त कोणतीहि मानवी कृति विचारात घेऊन त्या कृतीपाठीमागे कोणता हेतु, विचार, भावना अथवा विकार आहेत याचे दिग्दर्शन करणे येवढेच काम करावयाचे असते या दृष्टीने असे म्हणता येईल की मानसशास्त्र हे वास्तववादी शास्त्र आहे, तर नीतिशास्त्र हे ध्येयवादी शास्त्र आहे वास्तववादी शास्त्राचे काम इतकेच की जे जसे दिसेल तसे त्याचे वर्णन करून सागावयाचे ते कसे असावे या प्रश्नाचे उत्तर देण्याचे वास्तववादी शास्त्राचे काम नाही उलट ध्येयवादी शास्त्राला जे दिसेल ते कसे आहे, हे विचारात घेऊन शिवाय ते कसे असले पाहिजे हेहि सागावे लागते

वरील भेदावरून येवढी गोष्ट स्पष्ट होईल की मनाचे कार्य कोणत्या तऱ्हेने व कसे घडत असते, याचे वर्णन करणे हा मानसशास्त्राचा मुख्य उद्देश होय. वर्तनाचे पाठीमागील हेतु समजावून सागताना तो हेतु इष्ट की अनिष्ट, योग्य की अयोग्य याचा विचार मानसशास्त्राच्या कक्षेत येत नाही

## मानसशास्त्र व तत्त्वज्ञान

आता **मानसशास्त्र** व **तत्त्वज्ञान** याची तुलना करू म्हणजे मानसशास्त्राचा प्रात आणखी सुस्पष्ट होईल सर्वसामान्यत: असे विधान करता येईल की जेथे इतर शास्त्रे संपतात तेथून तत्त्वज्ञानास सुरुवात होते. म्हणजे काय ? इतर शास्त्रें जगात निसर्गात दिसणाऱ्या सर्व वस्तु व प्राणिमात्र

याचें अस्तित्व गृहीत धरून चालतात. कारण काहीतरी गोष्टी गृहीत धरल्या-खेरीज शास्त्राना प्रगतिच करता येणार नाही मन म्हणून काहीतरी स्वतत्र अस्तित्वाची वस्तु आहे. त्यात विचार, विकार, आकाक्षा, भावना वगैरे निर्माण होतात व निरीक्षणाने त्याचा अभ्यास करणे शक्य आहे इतक्या गोष्टी गृहीत धरल्याखेरीज मानसशास्त्राची प्रगति होणे शक्य नाही पण तत्त्वज्ञानाच्या प्रातात शिरल्यावर शाश्वत–अशाश्वत, चिर–अचिर, स्थिर–अस्थिर, चिरतन–क्षणभगुर अशा तऱ्हेच्या विचारास सुरुवात होते. जीवित शाश्वत टिकणारे आहे की नाशिवत आहे, ज्याला मन किवा अत करण असे म्हटले जाते तसे खरोखर एखादे काही आहे का ? असल्यास कोठे आहे ? त्याचे स्वरूप कसे असेल ? अशा तऱ्हेचे विचार तत्त्वज्ञानाच्या प्रातात शिरल्या-नतरच उद्‌भवतात जगाच्या दृष्टीने चिरकाल व अतिम तत्त्व शोधून काढणे हा तत्त्वज्ञानाचा उद्देश व मनुष्याला वर्तन करावयास लावणाऱ्या प्रेरणा शोधून काढून त्याचे वर्णन करणे हा मानसशास्त्राचा उद्देश होय

## मानसशास्त्राच्या अभ्यासपद्धति

शास्त्रोक्त रीतीने कोणत्याहि विषयाचा अभ्यास करावयाचा झाल्यास एका विशिष्ट पद्धतीचा अवलब करणे अपरिहार्य असते कारण विचार किवा प्रयोग पद्धतशीर रीतीने केल्याखेरीज उत्तरे अगर शास्त्रीय निर्णय बिनचूक येणार नाहीत. इतर सर्व शास्त्राप्रमाणे मानसशास्त्राच्या अभ्यासासाठीहि आतापर्यत तीनचार पद्धतीचा अवलब केलेला दिसून येतो.

### (१) अन्तर्निरीक्षणपद्धति

या पद्धतीपैकी अगदी सुरुवातीची व जुनी पद्धत म्हणजे 'अन्त-र्निरीक्षण पद्धति' ही होय मन ही दृश्य वस्तु नसल्याने दुसऱ्याच्या मनाचे प्रत्यक्ष अवलोकन करून त्याचा अभ्यास करण्याची तर शक्यताच नाही. पण ज्याच्या बुद्धीची पातळी एका ठराविक उच्च दर्जापर्यत जाऊन पोचलेली आहे त्या माणसाला स्वत ची दृष्टि अतर्मुख करून मनात काय चालले आहे, याची तपासणी करणे शक्य असते व नित्यव्यवहारातहि मोठी माणसे अत-र्निरीक्षण करीत असतात असे दिसून येते. त्याशिवाय "मनातून खरी इच्छा नव्हती; पण व्यवहाराचा देखावा करण्यासाठी मी तसा वागलो" किवा "मी किती मूर्ख आहे, इतकी साधी गोष्ट माझ्या कशी ध्यानात आली नाही"

अशा तऱ्हेची स्वत वर टीका करणे आपल्यास जमले नसते. मानसशास्त्रातील सामान्य सिद्धान्त तयार करण्याच्या दृष्टीने जे आत्मनिरीक्षण करावयाचें ते मात्र फार काळजीपूर्वक व निरपेक्षबुद्धीनें केले गेले पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की जे निरीक्षण केलेले असेल ते निर्भीडपणे लोकाना सागितले पाहिजे. त्यात लपवालपवी करता उपयोगी नाही. तिसरे असे की उत्तम रीतीनें आत्मनिरीक्षण करणाऱ्याची कल्पनाशक्ति उच्च दर्जाची असावी लागते. कारण प्रत्यक्ष अनुभव घेत असताना त्याचे निरीक्षण करता येत नाही. तो अनुभव घेऊन मपल्यानतर मग पुन्हा कल्पनेने तो जागृत करून मनश्चक्षूसमोर उभा करून नतर त्याचे निरीक्षण करावे लागते. अनुभवाच्या या पुन:-प्रत्ययासाठी नीव्र कल्पनाशक्ति नसेल तर तो अनुभव परत त्याच तऱ्हेने जागृत करता येणार नाही व अनुभव जर जशाचा तसा डोळ्यासमोर उभा करता आला नाही तर त्याचे निरीक्षण करणेहि शक्य नाही. यावरून एक गोष्ट अशी दिसून येईल की ज्याची कल्पनाशक्ति कोती आहे अशा माणसाला अतर्निरीक्षण करणे शक्य नाही. अशा रीतीने गेल्या शतकात विद्वान् लोकानी, अन्तर्निरीक्षण करून व नतर एकमेकाचे निरीक्षण एकमेकाना सागून अनुभवाचे सामान्य घटक शोधून काढले व या पद्धतीने मानसशास्त्रात बरीच प्रगति घडवून आणली

पण गेल्या तीस चाळीस वर्षातील आधुनिक विचारवनाना अतर्निरीक्षण पद्धतीत बरेच दोष दिसू लागले आहेत अतर्निरीक्षण पद्धतीतील कोणकोणत्या मुद्द्यावर टीका केली जाते त्याचा आता थोडा विचार करू.

(१) पाण्याचा प्रवाह अखड वहात असला म्हणजे एकाच पाण्यात आपल्याला दोनदा पाऊल भिजविता येत नाही. त्याप्रमाणे मनाच्या अवस्थाहि दर क्षणास बदलत असतात. मनात उद्भवणारा कोणताहि भाव काही क्षणसुद्धा स्थिर रहात नसल्याने अशा तऱ्हेचा, जात्याच अस्थिर असलेला, भाव मनापुढे स्थिर धरून नंतर त्याचे निरीक्षण व परीक्षण करणे हे फारच कठीण किबहुना अशक्यच वाटतें.

(२) दुसरी अडचण अशी की आत्मनिरीक्षणासाठी एक स्वतंत्र शक्ति आपणात आहे असे गृहीत धरल्याशिवाय अतर्निरीक्षण कोण करतें, ह्याचे उत्तर मिळणार नाही व ही शक्ति कार्यप्रवण होऊन निरीक्षण करूं

लागेपर्यंत ज्या मनाच्या अवस्थेचें परीक्षण करावयाचे ती अवस्था संपूनहि जाईल व निरीक्षणास काही शिल्लकच राहणार नाही.

(३) प्रत्यक्ष एखाद्या भावनेचा अनुभव घेत असताना दृष्टि अन्तर्मुख करून तिचे निरीक्षण करणे शक्य नाही. कारण भावना उत्कटतेचा परमोच्च बिंदु जेव्हा गाठते तेव्हा सर्व मनच त्या भावनात्मक अनुभवाशी एकरूप झालेलें असते. अर्थात् अशा तऱ्हेच्या अनुभवाचे निरीक्षण करण्यासाठी ते पुन्हा मनासमोर उभे करावयाचे म्हटल्यास त्याच्यातील उत्कटता बरीचशी कमीच झालेली असणार व अशा तऱ्हेच्या भावनाचे निरीक्षण करून जे सिद्धान्त आपण माडू त्याच्यात थोडा कमीपणा येणार.

(४) आत्मनिरीक्षण करणे ही गोष्ट थोर व समजस लोकानाच शक्य आहे अर्थात् या पद्धतीने मानवी मनाचे कितीतरी नमुने अभ्यासताच येणार नाहीत. वेडी माणसे, लहान मुले, खालच्या दर्जाचे प्राणी, अज्ञानी माणसें या सर्वाचा अभ्यास अतर्निरीक्षण पद्धतीचा अवलब करून करता येणे शक्य नाही.

(५) अनुभवाला एक प्रकारचें व्यक्तिगत स्वरूप असते * अर्थात् एकाच मनोवृत्तीचा अनुभव दोन वेगवेगळ्या व्यक्तीना सारखाच येईल असे नाही. म्हणून दोन वेगवेगळ्या माणसानी एकाच तऱ्हेच्या अनुभवासबधी अंतर्निरीक्षण करून काढलेले निर्णय ततोतत जुळतीलच असे सागता येत नाही. व अशा तऱ्हेच्या निरीक्षणाचे शास्त्रीय दृष्टीने फारसे महत्त्व नाही.

(६) फ्रॉईडच्या मते मनाचा फक्त एकअष्टमाश भागच जाणिवेच्या ( conscious ) कक्षेत येतो व बाकीचा सातअष्टमाश भाग अबोधरूप किंवा नेणिवेचा (unconscious) असतो. नेणिवेचा भाग अतर्निरीक्षणाच्या पलीकडील आहे. म्हणून नेणिवेच्या कार्याचे सशोधन करण्यास अतर्निरीक्षण ही पद्धति अगदी निरुपयोगी आहे.

इतक्या उणीवा जरी या पद्धतीत असल्या तरी ही अभ्यासपद्धति अगदीच टाकाऊ आहे असा याचा अर्थ नाही. प्रत्यक्ष अनुभव घेत असताना

---

* Experience has got a peculiar privacy and is thus restricted to an individual experiencing it.

जरी त्याचे निरीक्षण करणे या पद्धतीने शक्य नसले तरी नंतर तो अनुभव स्मरणाने जागृत करून त्याचा अभ्यास करणे अगदीच अशक्य नाही व या पद्धतीच्या साहाय्याने मिळविलेली माहिती मानसशास्त्रात महत्त्वाची भर घालू शकते हे गेल्या शभर वर्षात प्रगत झालेल्या मानसशास्त्राने सिद्ध करून दिलेले आहे

## (२) निरीक्षण व प्रयोग पद्धति

मानसशास्त्राची गेल्या ५० वर्षात झालेली प्रगति लक्षात घेतल्यास असे दिसून येईल की, इतर भौतिक शास्त्राप्रमाणेच मानसशास्त्राचे स्वरूपहि जास्त जास्त भौतिक होत आहे व या प्रगतीची मोठी निशाणी म्हणजे इतर शास्त्राप्रमाणेच मानसशास्त्राच्या अभ्यासासाठी स्थापन झालेल्या प्रयोगशाळा. इ स १८५० पर्यंत मानसशास्त्रज्ञाची अशी समजूत होती की 'मन' ही वस्तुच अशा तऱ्हेची आहे की त्याचा कोणताहि भाग किंवा त्याचे कार्य चर्मचक्षूपुढे उभे करता येणार नाही अर्थातच जी वस्तु कोणत्याहि स्वरूपात दिसणे शक्य नाही तिच्यावर प्रयोगशाळेत प्रयोग कसे करणार ? म्हणून बरीच वर्षे मानसशास्त्राचा अभ्यास अंतर्निरीक्षण पद्धतीनेच चालू होता पण आत्मनिरीक्षणाची मदत घेऊन मर्यादित परिस्थितीत जर काही प्रयोग करून पाहिले तर मानसशास्त्रदृष्टचा बरेच महत्त्वाचे निर्णय मिळू शकतील अशा कल्पनेने एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात काही मानसशास्त्रज्ञाचे प्रयत्न सुरू झाले एखाद्या प्रेरकासबंधी (Stimulus) व्यक्तीला जो अनुभव आला असेल तो सर्वच्या गर्व कथन केल्यास शास्त्रज्ञाला संशोधनाच्या दृष्टीने त्याचा खूप फायदा होतो उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीने दोन निरनिराळ्या वजनाचे दगड उचलताना त्याचे शास्त्रज्ञाने केलेले निरीक्षण व प्रत्यक्ष दगड उचलणाऱ्याने आपल्या अनुभवाचे केलेले वर्णन, ही दोन्ही एकत्र केल्यास काही **संवेदनांचा** अभ्यास जास्त चांगल्या तऱ्हेने करता येईल इ स. १८९० मध्ये जर्मन प्रोफेसर मुलर याने या पद्धतीचा जोराने पुरस्कार केला त्याच्या अगोदर १८७९ मध्ये वुटची एक मानसशास्त्रीय प्रयोगशाळा लिपझिक येथे स्थापन झालीच होती मुलरने दाखवून दिलेल्या दिशेने योग्य तेवढा अंत-र्निरीक्षणाचा उपयोग करून इतरहि काही मानसशास्त्रज्ञानी महत्त्वाचे प्रयोग करून पाहिले उदाहरणार्थ (१) एबिंग हॉसने विस्मरण-आलेख (Curve

of Forgetting) व स्मरण-पद्धति (Methods of Memorizing) वर केलेले प्रयोग (२) टिच्नेरने कॉर्नेलच्या प्रयोगशाळेत मुलरच्या पद्धतीने विचारक्रियेचे ( Process of Thinking ) केलेले संशोधन. (३) मार्बने निर्णय-क्रियेचा ( Process of Judging ) केलेला अभ्यास. (४) एक्ने प्रतिक्रियेचा कालावधि कोणकोणत्या गोष्टीवर अवलंबून असतो, याचा केलेला अभ्यास अशा रीतीने प्रयोग केल्यानंतर हे सिद्ध झाले की योग्य तेवढे अंतर्निरीक्षणाचे साहाय्य घेऊन प्रयोगशाळेत जर काही मनोवृत्तीचा अभ्यास केला तर फार महत्त्वाचे निर्णय मिळू शकतात

मानसशास्त्रात प्रयोगपद्धति यशस्वी करण्यासाठी बाह्य वर्तणुकीचा अभ्यास व वर्तणूक प्रत्यक्ष घडत असताना ती करणाऱ्याचे अनुभव या दोन्ही गोष्टी विचारात घ्याव्या लागतात पण शरीरशास्त्राच्या चष्म्यातून मानसशास्त्राकडे बघण्याची ज्या शास्त्रज्ञाची प्रवृत्ति होती त्याना मनाचे अस्तित्व व अंतर्निरीक्षणपद्धति या दोन्ही गोष्टी अमान्य होत्या त्याच्या मते फक्त बाह्य वर्तणुकीचा अभ्यास केला की मानसशास्त्राचे काम झाले कारण प्रत्येक मानसिक क्रिया शारीरिक क्रियेच्या शब्दात वर्णन करून सागणे शक्य आहे उदाहरणार्थ–' घाबरणे ' हा मनोविकार विचारात घेऊ. मनुष्य घाबरला आहे असे आपण केव्हा म्हणतो ? त्याचे हातपाय कापत असतात, जीभ कोरडी पडते, चेहरा चितायुक्त व काळवंडलेला दिसतो. ' घाबरणे ' या मनोविकाराची ही सर्व शारीरिक लक्षणे आहेत शरीरशास्त्रज्ञाचे म्हणणे असे की ही लक्षणे एकत्र केल्यानतर जी एक संमिश्र शारीरिक अवस्था तयार होते तिसच आपण ' घाबरणे ' असे नाव देतो. वर्तनवाद्याच्या मताने भीति या कल्पनेचे संपूर्ण पृथक्करण केल्यास वर सांगितलेल्या सर्व शारीरिक अवस्थाचाच फक्त त्यात समावेश झालेला दिसून येतो मग त्याचे एकत्रीकरण म्हणजेच ' भीति ' असे म्हणण्यास काय हरकत आहे ? ' भीति ' या नावाचा तिच्या शारीरिक लक्षणाहून वेगळा असा स्वतंत्र मनोविकार आहे असे मानण्याचे कारण काय ? अर्थात् हा वर्तनवादाचा दृष्टिकोन अगदी एकान्तिक आहे. यासंबधी अधिक विचार पुढे करू.

### (३) मनोविश्लेषणपद्धति

प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ सिगमंड फ्रॉईड याने आपल्या आयुष्यात मानसशास्त्रीय प्रगतीसाठी ज्या पद्धतीचा अवलंब केला ती पद्धति मनो-

विश्लेषण ( Psycho-analysis ) पद्धति या नावाने प्रसिद्ध आहे. इ. स. १८८० मध्ये डॉ. ब्रूअरच्या आढळात हिस्टेरियाचा एक विचित्र रोगी आला. ती एक तरुण मुलगी होती. काचेच्या भाड्यांतून पाणी पिताना तिचा थरकाप होई. या विशिष्ट घटनेचे कारण डॉ ब्रूअरला काही केल्या सापडेना. तेव्हा त्याने त्या मुलीच्या आयुष्यातील पूर्वी घडलेल्या सर्व घटनाचा इतिहास विचारला तेव्हा त्याला असे आढळून आले की त्या मुलीला कुत्र्याबद्दल अत्यत भीति व तिरस्कार अगदी लहानपणापासून वाटे ती ज्या घरी कामाला होती त्या मालकिणीचा एक अतिशय लाडका कुत्रा होता त्याला काचेच्या भाड्यातून पाणी पीत असताना तिने एकदा पाहिला व तेव्हापासून काचेच्या भाड्यातून पाणी पिण्याची कल्पना डोक्यात आल्याबरोबर ती अगदी कावरीबावरी होई ती घरात हलके काम करणारी असल्याने मालकिणीसमोर तिच्या कुत्र्याबद्दलचा तिरस्कार व्यक्त करणे तिला शक्य नव्हते; पण ही नावड मनात सतत दाबून ठेवल्याने शेवटी त्याचा परिणाम उन्मादाचे झटके (Hysterical fits) येण्यात झाला

वरील मुलीच्या बाबतीत डॉ ब्रूअरने जे उपचार केले त्यातूनच नेणीव (Unconscious) असा मनाचा बराच मोठा भाग असतो व या भागाच्या कार्याचा मनुष्याच्या जाणिवेतील वर्तणुकीवर फार महत्त्वाचा परिणाम घडत असतो हा शोध प्रथम लागला फ्रॉईड व ब्रूअर दोघानी मिळून व्यक्तीच्या आयुष्यात झगडा किवा अस्वस्थता निर्माण करणारा हा कोणता प्रान्त आहे, तो किती शक्तिमान् आहे व त्याच्या कार्याचे काय काय परिणाम होऊ शकतात याबद्दल पुष्कळ सशोधन केले

शारीरिक लक्षणापेक्षा मानसिक मूळच ज्या रोगात जास्त प्रामुख्याने असलेले दिसून येते ते मूळ शोधून काढण्यासाठी प्रथम फ्रॉईडने व ब्रूअरने मनोविश्लेषणपद्धति शोधून काढली या पद्धतीत रोग्याच्या गत आयुष्यातील सर्व महत्त्वाच्या घटना समजावून घेणे, त्याच्या विशेष भावना, आकांक्षा व मनोरथ याच्या साफल्याचे मोजमाप करणे व त्यावरून मनाचा समतोलपणा नाहीसा होण्यास कोणत्या प्रवृत्ति कारणीभूत झालेल्या आहेत हे शोधून काढणे

हे भाग महत्त्वाचे म्हणून मानले जातात. रोग्याच्या सपूर्ण सहकार्याशिवाय मनोविश्लेषणपद्धतीने रोगनिदान करण्यात यश येणे शक्य नाही.

पुष्कळ निरनिराळ्या रोग्याची या पद्धतीने तपासणी केल्यानंतर लैंगिक-प्रवृत्ति (Sexuality) ही प्रत्येक सामान्य मनुष्यातच फार जोरदार असते व तिचीच रूपातरे अबोधाच्या किवा नेणिवेच्या कार्यात दिसून येतात असा सिद्धान्त फ्रॉइडने बसविला बालपणात जे मनोविकार दाबून टाकण्याचा फार निकराचा प्रयत्न झाला असेल ते विकार नेणिवेत दडून राहून पुढील आयुष्यात शक्य त्या तऱ्हेने माणसास त्रास देत राहतात रोग्याचे मनोविश्लेषण करीत असताना ज्या गोष्टी तोडाने उघड सागण्याची त्यास लाज वाटते, त्या सागण्याचे तो टाळत असतो असे फ्रॉइडला आढळले रोग्यात बाह्यत दिसून येणाऱ्या लक्षणावरून नेणिवेत दडलेले कोणते मनोविकार त्याच्या मुळाशी आहेत हे शोधून काढणे हा मनोविश्लेषणपद्धतीचा महत्त्वाचा भाग होय अशा तऱ्हेचे मनोविकार शोधून काढण्यास जागृतावस्थेतील घटनापेक्षा स्वप्नातील घटनाचा अधिक चागला उपयोग होतो अशी खात्री पटल्यानतर फ्रॉईडने आपले सर्व लक्ष स्वप्नाच्या अभ्यासाकडे वळविले स्वप्न म्हणजे नेणिवेतील मनोविकाराच्या कार्याचे यथातथ्य दर्शनच होय, हे फार महत्त्वाचे सत्य फ्रॉईडनेच प्रथम सागितले. स्वप्न हा अतृप्त आकाक्षा प्रगट होण्याचा एक राजमार्ग आहे फ्रॉईडच्या मते अशा अतृप्त आकाक्षात लैंगिक प्रवृत्तिच (Sex tendencies) प्रामुख्याने असतात जागृतावस्थेत व थोड्याबहुत प्रमाणात स्वप्नातसुद्धा नेणिवेतील मन प्रवृत्तीवर बधने घालणारी जी शक्ति असते तिला फ्रॉईडने अवेक्षक (Censor) असे सबोधिले आहे

इ स १९०४ मध्ये फ्रॉईडने "दैनदिन जीवनाचे मनोविकृतिशास्त्र" (Psycho-pathology of Everyday Life) हे पुस्तक प्रसिद्ध केले

सर्व मानवी जीवनाच्या बुडाशी असलेली जी लैंगिक प्रवृत्ति फ्रॉईडने मानली आहे, तिच्या वाढीच्या तो एकूण चार अवस्था मानतो.

(१) आत्मकाम्या—Auto-erotism मुलाचे स्वत.वरील प्रेम.

(२) मातृकाम्या—Œdipus complex (मुलात)
पितृकाम्या—Electra complex (मुलीत).

(३) समकाम्या—Homo-Sexuality.

(४) विषमकाम्या—Hetero-Sexuality.

फ्रॉईडच्या सर्व सिद्धाताचे सार असे की कोणतीहि मानसिक शक्ति दाबून टाकण्याचा प्रयत्न केल्यास ती कोणत्या ना कोणत्या रूपात मनात दडून बसते व सधि सापडेल तेव्हा जाणिवेत येण्याचा प्रयत्न करीत असते. कोणतीहि मन प्रवृत्ति कायमची व सपूर्णपणे नाहीशी होत नाही.

## मनोविश्लेषणावर आक्षेप

(१) अबोध किवा नेणिवेचे अस्तित्व प्रयोगाने सिद्ध करता येत नाही.

(२) अगदी बालपणापासून लैंगिक प्रवृत्तिच जोरदार असते हे फ्रॉईडचे म्हणणे पटण्यासारखे नाही

(३) या पद्धतीत प्रयोगशाळेत परिस्थिति मर्यादित करण्यास आणि निश्चित निर्णय मिळविण्यास फारसा वाव नाही



## प्रकरण दुसरें

# शरीर आणि मन यांचे परस्पर संबंध



"अतिपरिचयाद् अवज्ञा" अशीच थोडीशी परिस्थिति माणसाच्या ज्ञानाबद्दल व ज्ञानाभिमानाबद्दल असते असे म्हणावे लागते. आपले मन व आपले शरीर म्हणजे काय व मन ही वस्तु कशी आहे, त्याचप्रमाणे शरीर-मन याचा काही सबंध आहे का, या प्रश्नाचा विचार करण्याम आपण अवसरच घेत नाही त्याबद्दल कोणी जिज्ञासेने प्रश्न उत्पन्न केलाच तर "त्यात हो काय ? मन म्हणजे अत करण व शरीर म्हणजे देह" अशी उत्तरे देऊन या महत्त्वाच्या प्रश्नाला बगल देण्याचा नेहमी प्रयत्न होत असतो इग्रजीमध्ये ही गोष्ट फार सुदर रीतीने सागितली जाते. 'What is mind ?' 'No matter.' 'What is matter ?' 'Never mind'. सामान्य लोकाच्या तोडी ही भाषा शोभेल, पण सत्याचा शोध करणाऱ्या शास्त्रज्ञाना असल्या निरर्थक उत्तरानी गप्प बसविणे शक्य नाही.

व्यवहारातील वाक्प्रचारावरूनहि शरीर-मनाचा सबंध स्पष्ट होतो. कोणत्याहि गोष्टीत तन-मन-धन अर्पण केले पाहिजे, मनोवाक्कायकर्मभि: इत्यादि अनेक प्रयोगात शरीर आणि मन याची जोडी बनविलेली दिसून येते. यावरून माणसाच्या पूर्ण कृत्याचा विचार करताना त्याच्या शरीराने व मनाने त्या कृत्यात किती भाग घेतला हे पहावे लागते दोन्हीचा भाग सारख्याच प्रमाणात असल्यास त्या मनुष्याने ते कार्य पूर्णत्वाने केले असें समजण्यात येते. शरीर आणि मन याचा अशा रीतीने परस्परसबध अत्यत घनिष्ठ स्वरूपाचा आहे असे दिसून येईल; व त्या सबंधाचे स्वरूप स्पष्ट करताना शरीर आणि मन या दोन स्वतत्र वस्तु आहेत हेहि स्पष्ट होतें. अडचण येते ती येथेच. शरीर ही दृश्य वस्तु असल्यामुळे त्याचे विवेचन करणारें स्वतत्र

शास्त्र तयार झाले. पण मन ही वस्तु असली तरी अगोचरच आहे. तिचे अस्तित्व भासमान होते पण ते कोणाला? तर मनालाच; म्हणजे मनानेच मन आहे असे म्हणावयाचे. समजा, सोईसाठी मन ही स्वतंत्र वस्तु आहे, ती वस्तु अगोचर आहे असे मानले तरी एका दृश्य वस्तूचा दुसऱ्या अगोचर वस्तूशी घडून येणारा संबंध हा तरी जाणावयाचा कसा हा प्रश्न शिल्लक राहतोच असे असले तरी शारीरिक व्यापाराचा मनावर होणारा व मानसिक व्यापाराचा शरीरावर होणारा परिणाम याची प्रतीति हरघडी व्यवहारात येत असल्यामुळे शरीर-मन यांच्या परस्पर संबंधाबाबत शास्त्रज्ञ आपापली मते लोकासमोर ठेवण्याचा प्रयत्न आज कित्येक शतके करीत आहेत.

या प्रयत्नात वर्तनवादी हे जसे एका टोकाला पोचले आहेत, त्याप्रमाणे कल्पनावाद्यानी ( Idealist ) दुसरे टोक गाठले आहे. पहिल्याच्या मते मन म्हणून काही वस्तुच नाही. शरीर हे एक स्वायत्त यंत्र आहे त्या शरीराच्या हालचालीला अगर व्यापाराला आवश्यक म्हणून मन गृहीत धरताच कामा नये.

शरीरात जी अनेकविध कार्ये आपोआप घडत असतात—विशेषत: पूर्ण विकसित मेंदूकरवी ज्या अनेक गुतागुतीच्या क्रिया-प्रक्रिया होत असतात—या सर्वांच्या सामुदायिक बोधाला किंवा जाणिवेला आपण मन म्हणतो. या मताप्रमाणे विचारक्रिया म्हणजे अनुच्चारित बोल आणि बोलण्याची क्रिया ही तर शुद्ध शारीरिक स्वरूपाची आहे

या विचारसरणीच्या अगदी उलट कल्पनावाद्याचा सिद्धान्त आहे. जगात मन ही एकच वास्तव गोष्ट. इतर सगळा नुसता देखावा. केवळ मनाच्या साहाय्याने सृष्टीतील अनेकविध गोष्टी आपण जाणू शकतों. एवढेचसे काय, प्रत्यक्ष आपले शरीर हे सुद्धा मनोग्राह्यच आहे एकदरीत मन आणि मनोव्यापार याशिवाय जगात काहीच नाही. कारण जे जे आपण जाणतो ते कल्पनेने म्हणजेच मनोव्यापाराने.

हे एकातिक पक्ष वगळले, तर या दोहोंचा समन्वय साधू पहाणारे अनेक पक्ष-उपपक्ष प्रचलित आहेत. त्यापैकी शरीर आणि मन याची कार्यें एकाच वेळी परंतु समान्तर पद्धतीने चालतात असें म्हणणारे शरीरमनोवादी

किवा समान्तरवादी हे आहेत. मनावर शारीरिक हालचालीचा व शरीरावर मानसिक व्यापाराचा परिणाम होतो. म्हणून शरीर व मन ही दोन्ही वास्तव आहेत यापैकी अग्रिमत्वाचा मान कोणाला द्यावा हे सागणे कठीण आहे, अशी या पक्षाची विचारसरणी आहे. मात्र परस्पर भिन्नस्वरूपी अशा या दोन वस्तु एकत्र कशा येतात, हे या लोकाना सागता येत नाही यांच्याप्रमाणे विचारसरणी असणारा आणखी एक पक्ष आहे; पण त्याच्या मते मनाचा शरीरावर ताबा नाही, शरीर मात्र मनावर अमल करू शकतें. तिसरा पक्ष सापेक्ष क्रियावाद्याचा मन व शरीर एकमेकावर अवलंबून आहेत, त्यापैकी कोणतेहि एक दुसऱ्याच्या साहाय्याशिवाय कार्य करू शकत नाही या व यासबधी इतर सर्व मतप्रणालीचा बारकाईने विचार केल्यास एवढे स्पष्ट होते की शरीर व मन ही अविभाज्य आहेत. किबहुना मन व शरीर ही एकाच वस्तूची सोईसाठी मानलेली दोन अगे आहेत, एवढाच निष्कर्ष शिल्लक राहतो म्हणून समष्टिवादी लोकाची विचारसरणी शरीर-मनाच्या बाबतीत पटण्याजोगी आहे.

सोईसाठी का होईना, मन हे गृहीतक स्वीकारले म्हणजे नसासस्थेला ( Nervous system ) आपोआपच महत्त्व प्राप्त होते कारण नसासस्था शरीर-स्थितीच्या मुळाशी असते व बाह्य जगातील अनुभवग्रहणाच्या कामी याच सस्थेचा अत्यत उपयोग होतो विचार व क्रिया याचे यत्र म्हणजे नसा-सस्था होय या नसा-सस्थेचा मूल घटक नसा ही असून ती अत्यत सूक्ष्मतम आहे पेशी, शिखातन्तु ( Dendrite ) व एकशाखी मुख्य तन्तु ( Axon ) या तिहीची मिळून एक नसा होते. यापैकी प्रत्येक घटकात अनेकसख्य तनु असतात या नसा-सस्थेचे मुख्य दोन विभाग आहेत. जाणीवेने कार्यघडवून आणणारी इच्छावर्ती नसासस्था व जाणीव मुळीच न होता कार्य घडविणारी अनिच्छावर्ती नसासस्था या दोन विभागाचे रचनेच्या दृष्टीने परत दोन भाग पाडता येतात एक केंद्रीय व दुसरी परिसरीय.

**केन्द्रिय नसासंस्था** (Central nervous system) :—या नसा डोक्याच्या कवटीत व पाठीच्या कण्यात असतात. सर्व तऱ्हेची नियंत्रणें येथे उद्भवतात व यामुळे सर्व मानवी क्रियात एक प्रकारचा एकसूत्री-पणा येतो.



नसा-संस्था

**परिसरीय नसासंस्था** (Peripheral nervous system)—केंद्रीय नसा क्रिया करणाऱ्या सर्व अवयवाशी जोडलेल्या असतात हा जोड देणारा, तारायंत्रातील तारा-सारखा, जो विभाग तो परिसरीय नसा-संस्थेचा मार्ग होय या नसांचा रंग पांढरा असतो व यांच्या शाखानुशाखा होत होत त्यांचे बारीक तंतु कार्य करणाऱ्या पेशीशी अगदी निगडित होतात यातहि तीन प्रकार आहेत (१) बाह्य जगातील किंवा शरीरांतर्गत हालचालींची बातमी नसा केंद्राना पोचविणारी अभिगामी (afferent, sensory) ज्ञानग्राही नसा व (२) शरीरातील अवयवांना अथवा बाह्य अवयवांना संदेश पाठविणारी बहिर्गामी प्रेरणावाहक (Efferent-motor) नसा. (३) या दोहोंचा संबंध घडवून आणणारे मध्यवर्ती नसातंतु असतातच.

या सर्वांची मिळून नसा-संस्था तयार होते. या नसा-संस्थेचा पूर्ण विकास मानवी प्राण्यात फक्त दिसून येतो.

केंद्रीय नसा-संस्थेत मेंदू व मज्जारज्जु याना फारच महत्त्व आहे. शरीराच्या सर्व व्यापारावर अधिकार चालविणारी नसा-केंद्रे याच भागात आहेत डोक्याच्या कवटीत मेंदू असतो व पाठीच्या कण्यात मज्जारज्जु असतो. वास्तविक मेंदू व मज्जारज्जु हे एकजीव आहेत; पण सोईसाठी त्याचे दोन भाग पाडले आहेत. मेंदूच्या वरच्या भागास मोठा मेंदू (Cerebrum) व तळाच्या भागास लहान मेंदू (Cerebellum) अशी नावे आहेत. मेंदूच्या पृष्ठभागावर पुष्कळच चुण्या आत आत गेलेल्या दिसतात. जनावराच्या मेंदूत भेगा कमी असतात प्रौढ माणसाच्या मेंदूत फटीचा भरणा पूर्णत्वाने दृष्टीस पडतो मेंदूचा पाढरा भाग ततुयुक्त असतो. काही ततु एका फटीपासून दुसऱ्या फटीपर्यंत गेलेले दिसतात, काही ततु मेंदूला आच्छादणाऱ्या नसासस्थेच्या धूसर भागाला जोडलेले असतात, तर काही ततु तळाच्या भागाशी मज्जारज्जूशी सलग्न होतात यातच सवेदना आणणारे व पोचविणारे बारीक बारीक ततु आढळतात

बुद्धि, स्मरण, ज्ञान, इच्छा, भावना हे सर्व व्यापार मेदूत उत्पन्न होतात इच्छा झाली म्हणजे क्रियेला आरभ होतो व ज्ञान-सवेदना होऊन भावना निर्माण होते या सर्वांचा सबध जोडणारी क्रिया म्हणजे विचार. मेंदूच्या आच्छादनातील धूसर भागात विचार उत्पन्न होतात.

मेंदूच्या निरनिराळ्या भागाचा शरीराच्या विशिष्ट भागाशी सबध असतो उजव्या भागाचा मेंदू शरीराच्या डाव्या बाजूवर व डाव्या बाजूचा मेंदू शरीराच्या उजव्या बाजूवर ताबा चालवितो मोठ्या मेंदूच्या विकासावर सर्व शारीरिक व मानसिक क्रिया अवलबून असतात. सर्व प्राण्यात माणसाचा मेंदू मोठा असतो. हा आकार व त्यावर असलेल्या भेगाची मोठी सख्या ह्यामुळेच माणूस अधिक बुद्धिमान् ठरला आहे. ही बुद्धिमत्ता मेंदूच्या वजनाच्या प्रमाणावर अवलबून नाही. अधिक वजनाचा मेंदू म्हणजे अधिक बुद्धिमत्ता असे म्हणता येत नाही. एका जडबुद्धीच्या माणसाचा मेंदू सर्वात वजनदार ठरला आहे या उलट कित्येक अत्यंत कुशाग्र बुद्धिमानाच्या मेंदूचें वजन अगदीच कमी भरले आहे. माणसाच्या मेंदूचे साधारण वजन १४०० ग्रॅमच्या अलीकडे-पलीकडे असते. या मोट्या मेंदूवरच डोळे, कान, वाणी

इत्यादि अनेक क्रियाची क्षेत्रे आखलेली असतात. या मेंदूला थोडी जरी दुखापत झाली तरी त्याचे परिणाम भयकर होतात. पायाची बोटे, गुढघा, हाताचा खादा, कोपर, मान, जीभ, तोड इत्यादीच्या क्रियाना चालना देणारे भाग त्याचप्रमाणे सर्व ज्ञानेंद्रियाची कार्ये करणारे भाग याच मेंदूत ठिकठिकाणी विखुरले आहेत माणसाचा मेंदू अजिबात काढला तर त्याचा प्राण राहणे शक्य नाही

मेंदू-तलातहि असेच अनेक क्रियाशील भाग आहेत. डोळ्याच्या नसा, डोक्याचे स्पर्शज्ञान करणारी नसा, चावण्याच्या क्रियेला चालना देणारी नसा, जिभेला चव-ओळख देणाऱ्या नसा इत्यादि अनेक कार्याचे क्षेत्र मेंदूतळाशी निगडित असते



मनुष्याचा मेंदू

लहान मेंदूचे मुख्य कार्य शरीरातील स्नायूच्या हालचालीचा समन्वय घडवून आणण्याचे असते. हातापायाचे हालणे व ताठ होणे इत्यादीचे नियत्रण हा मेंदू करतो. शरीराचा समतोलपणा यावरच अवलबून आहे. या मेंदूमुळेच माणस सावध राहतो, त्याला जाणीव असते शास्त्रज्ञानी मेंदूचा अभ्यास कसा केला, त्याचा इतिहास फार मनोरजक आहे. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस सर चार्लस बेल नावाच्या एका प्रसिद्ध शरीरशास्त्रज्ञाने अभिगामी व बहिर्गामी नसा-व्यापाराचा शोध लावला पुढे एका फ्रेंच शास्त्रज्ञाने कबुतराच्या मेंदूवर अनेक प्रयोग केले मेंदूच्या वरचा भाग काढून टाकला तर कान, डोळे याच्या कार्यात व स्मरण, इच्छा इत्यादिकात बिघाड होतो. मेंदूचा खालचा भाग काढला तर वर्तनातील एकसूत्रीपणा बिघडतो असे त्याने ठरविले. १८६१ साली पॅरीसमधील पॉल ब्रोका नावाच्या एका डॉक्टरने मेंदूच्या बाबतीत एक महत्त्वाची गोष्ट उघडकीस आणली. त्याच्याकडे एक रोगी होता. मानसिक दृष्टचा तो चागला होता पण त्याला बोलतां येत नसे एवढीच विकृति होती. तो मेल्यानंतर ब्रोकाने त्याचा मेंदू तपासला. त्यावेळी पुढील भागातील एका घडीत त्याला थोडीशी दुखापत दिसली. त्यावरून त्याने ताडले की मेंदूच्या या भागाचा बोलण्याच्या क्रियेशी संबध आहे. त्या भागाला सध्यां ब्रोकाचेंच नांव देण्यात आलें आहे. दोन जर्मन

वैद्यानी लढाईत डोक्याला जखमा झालेल्या शिपायाना औषधोपचार करताना मेंदूचा अभ्यास केला व नतर त्या सबधीचे प्रयोग प्राण्यावर केले उघड्या मेंदूच्या विशिष्ट भागात मृदु स्वरूपाचा विद्युत्प्रवाह सुरू केला म्हणजे विशिष्ट शारीरिक हालचाल सुरू होई यावरून चेहरा, मान, पाय यावर नियत्रण करणाऱ्या स्नायूची क्षेत्रे मेंदूच्या कोणत्या भागात आहेत हे त्याना ठरविता आले पुढे हेच प्रयोग माकडावर करून अभिगामी व बहिर्गामी नसा-सस्थाची मेंदूवरील क्षेत्रे निश्चित झाली.

डॉ रिचर्ड एम् ब्रिक्नेर यानी न्यू यॉर्कमध्ये एका माणसाच्या मेंदूवर एक मनोरजक प्रयोग केला एका रोग्याच्या मेंदूला कप सुटे, तो थाबवावा म्हणून ब्रिक्नेरने मेंदूच्या पुढच्या बाटोळ्या भागातील बराच भाग काढला. अभिगामी व बहिर्गामी नसाच्या व्यापारात त्यामुळे विशेष फरक पडला नाही, पण त्या माणसाच्या वागणुकीत विलक्षण बदल झाला. तो अस्वस्थ झाला, मोठ्याने ओरडू लागला, गाऊ लागला, नाचू लागला, बरळू लागला. यावरून ब्रिक्नेरने असा निर्णय केला की, मोठ्या मेंदूतील विशिष्ट भाग काढल्यास मनुष्याला विचाराचा सुसूत्रपणा राखता येत नाही व भावना-सयमाच्या बाबतीतहि तो दुबळा होतो

मज्जारज्जूचे कार्य अभिगामी व बहिर्गामी व्यवस्था राखण्याचे आहे. सर्व शरीराची सुस्थिति व शरीराचा मेंदूशी सबध जोडणे ही कामे मज्जा-रज्जु अखड करीत असतो.

मेंदू आणि मज्जारज्जु यासारखीच आणखी एक शारीरिक रचना शरीर-मन-सबधाचे ज्ञान करून घेताना महत्त्वाची समजली जाते. शरी-रातील रासायनिक घटना ज्यावर अवलबून असते त्यामध्ये ग्रथिसमूहाला ( Glands ) फार मोठे महत्त्व आहे काही विशिष्ट अवयवातच ह्या ग्रथि आहेत. त्यापासून एक प्रकारचा स्राव उत्पन्न होतो निरनिराळ्या ग्रथीतून होणारे हे स्राव शरीरातील रासायनिक क्रियाचे नियंत्रण करीत असतात. ग्रंथीचे प्रकार दोन—अत:स्रावी व बहि:स्रावी. याशिवाय उत्तेजक नावाचा एक स्रावहि शरीरात उत्पन्न होतो.

बहिस्रावी ग्रंथीमुळेच घाम, लाळ, अश्रु याची निर्मिति होते. आपण फार भ्यालो, म्हणजे लालाग्रंथीचे काम थांबतें व जीभ कोरडी पडते. अन्त:-स्रावी ग्रंथीत शीर्षग्रंथी, कण्ठग्रंथी इत्यादि महत्त्वाच्या आहेत. बहि:स्रावी

ग्रंथीपेक्षा या ग्रथीचे महत्त्व अधिक आहे, कारण या ग्रथीचे कार्य योग्य प्रमाणात झालेच पाहिजे. त्याचें प्रमाण कमीअधिक झाल्यास मनुष्याच्या स्वभावात फरक होतो उदाहरणार्थ, कण्ठग्रंथीचा अतिस्राव झाला तर मनुष्य भावनाशील होतो, तो चटकन् रागावतो, चटकन् शात होतो शीर्षग्रथीच्या स्रावाचा परिणाम शरीर व मन या दोहोवर होतो या ग्रथीचा स्राव मोठ्या प्रमाणात झाला तर माणसाच्या शरीराची वाढ राक्षसी प्रमाणावर होते उलट हा स्राव अगदी कमी प्रमाणात झाला तर माणूस अगदीच बुटका होतो मानसिकदृष्टचा या ग्रथीच्या अतिस्रावाने माणूस भाडखोर, काटेकोर वागणारा होतो कमी स्रावाने निराशा, भीति निर्माण होते बौद्धिक न्यूनतेशीहि या ग्रथीचा बराच सबध येतो

राग किवा भीति या भावना जागृत झाल्या म्हणजे ॲड्रिनलीन नावाचा एक विशिष्ट स्राव रक्तात मिसळतो व माणूस स्नायूचे आकुचन करू शकतो. पण हा स्राव फार प्रमाणात झाला तर माणसाच्या यकृतावर त्याचा परिणाम होतो व त्यापासून मधुमेहासारखे रोग उत्पन्न होतात पुरुषी बाई व बायकी पुरुष या विपरीत गोष्टी केव्हा केव्हा आढळतात त्याच्या मुळाशी हीच ॲड्रिनल ग्रथी असते असे शास्त्रज्ञानी ठरविले आहे

शरीररचनेच्या या विवेचनावरून मन व शरीर याचा परस्परसबध किती जिव्हाळ्याचा आहे हे स्पष्ट होते व्यवहारात तर आपण नेहमी अनुभवतो की, अतिकामाने शरीर थकले तर मन काम करण्याला तयार नसते. उलट बौद्धिक कार्याचा मनाला फार ताण पडला तर शरीरालाहि थकवा येतो अर्थात् प्रवर्तक हेतु अत्यत जोरदार असला तर या थकव्याची पर्वा न करता आपण काम पुढे रेटतो हे खरे, पण तो अपवाद आहे काळजी, चिता, भीति या भावनाचे शरीरावर वाईट परिणाम होतात हे जितके खरे तितकेच हेहि खरे आहे की आनद, मन स्वास्थ्य यासारख्या भावनानी शरीर अनामय राहते माणसाचे अनेक मानसिक व शारीरिक रोग बरे करण्याच्या बाबतीत अनेक तज्ज्ञ वैद्याना जे यश मिळते त्याचे खरे कारण त्यानी मन व शरीर यामधील नातें अचूक ओळखलेले असते शिक्षकालाहि याची पूर्ण माहिती पाहिजे; म्हणजे अध्यापनकाळात थकवा, विश्रांति, वेळापत्रक, आवडनिवड, विषयाचा कठिणपणा इत्यादि तत्र योग्य रीतीने पाळले जाईल व अध्ययन-अध्यापन ही कार्ये यशस्वी होतील.

प्रकरण ३ रें

# मनाच्या शक्ति व त्यांचीं कार्यें



शरीर व मन याचा निकटचा सबध आहे हे आपण पाहिले मानसशास्त्रात आपणाला मनाचा अधिक विचार करावयाचा असतो डोळे, नाक, कान, जीभ व त्वचा ही ज्ञानेंद्रिये प्रमुख समजली जातात ही ज्ञानेंद्रिये मेंदूशी ज्ञानतंतूनी जोडली असल्यामुळे जेव्हा जेव्हा या इद्रियापैकी एक किवा अनेक इद्रियाचा बाह्य वस्तूशी सयोग घडून येतो तेव्हा आपणास ज्ञान होते, त्या सबधित बाह्य वस्तूची मनाला जाणीव होते बाह्य वस्तूचे ज्ञानेंद्रियाना होणारे जे पहिले ज्ञान त्याला अनुभव म्हणतात हा अनुभव मानवाच्या मनातून कायमचा नाहीसा होत नाही त्याचे सस्कार जाणिवेच्या किवा नेणिवेच्या स्वरूपात राहतात मात्र अनुभवाच्या वेळची परिस्थिति ज्या प्रमाणात क्षोभक असेल, मनात खळबळ उडवून देणारी असेल, त्या प्रमाणात तो अनुभव अधिक काळ टिकणारा असतो.

ज्ञानेंद्रियानी मिळालेले अनुभव मेंदूवर चागले ठसले जातात. हे कार्य **ग्रहणशक्ति** करीत असते **धारणाशक्ति** असेहि नाव या शक्तीस देता येईल. आपल्या स्मरणशक्तीच्या मुळाशी हीच शक्ति असते. मेंदूत दुसरीएक गंमतीची प्रक्रिया चालू असते. समान स्वरूपी अनुभव असले म्हणजे ते एकदम एकत्र जमतात. हे **संलग्नताशक्तीचें** कार्य होय या शक्तींनी जमा केलेले ज्ञान प्रामुख्याने प्राणिमात्राच्या हालचालीच्या मुळाशी असते.

मनाच्या या विविध शक्तीचा सूक्ष्म अभ्यास केला म्हणजे असे दिसून येते की एखाद्या वस्तूचे ज्ञान होणे म्हणजे त्या वस्तूसबधी विविध अनुभवाचा संग्रह होणे व त्या सग्रहाची जाणीव होणें, प्रतीति येणे. ग्रहणशक्तीच्या साह्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष वस्तूची जाणीव होते ही अनुभवातील पहिली

अवस्था. हिलाच ‘ **बोधन** ’ हे नाव आहे. त्या विशिष्ट वस्तूचे बोधन झाल्यावर मनात सुखदुःखात्मक काही क्षोभ निर्माण होतो अनुभवाची ही दुसरी अवस्था. हिला ‘ **भावन** ’ म्हणतात. ‘ भावन ’ प्राण्याला स्वस्थ बसू देत नाही, त्याला कार्यप्रवृत्त करते, ही अनुभवाची तिसरी अवस्था ‘ **प्रेरण** ’ किंवा ‘ **प्रवर्तन** ’ या नावाने ही संबोधिली जाते.

प्रत्येक अनुभवाच्या वेळी बोधन, भावन व प्रेरण ही कार्ये कमी-अधिक प्रमाणात चाललेली असतात अनुभवाचे जणू हे तीन घटकच आहेत व त्याचे कमीअधिक प्रमाण ध्यानात घेऊन अनुभवाचे तीन प्रकार मानण्यात आले आहेत

(१) बोधनात्मक अनुभव—वर्गात कोणत्याहि विषयाचे अध्ययन-अध्यापन चालू असता, विद्यार्थ्यांच्या मनात त्या विषयाचे ‘ ग्रहण ’ करणे हाच भाग महत्वाचा असतो अर्थात् हा विषय समजून घेताना अध्यापन-पद्धतीमुळे म्हणा किंवा तत्कालीन मनःस्थितीमुळे म्हणा, एखाद्या विद्यार्थ्याच्या मनात त्या विषयाबद्दल थोडासा तिटकारा उत्पन्न होईल किंवा एखाद्याच्या मनात आवड उत्पन्न होईल ही भावनशक्तीची कार्ये होत; पण ही कार्ये या वेळी प्रमुख समजली जात नाहीत. पुढे त्या विषयासंबंधी होणारी कृतिहि आवड किंवा नावड यावरच अवलंबून राहील असे असले तरी या अनुभवात ‘ बोधना ’ वरच अधिक भर आहे हे खरे

काही अनुभव ‘ भावन ’ शक्तीनेच भारलेले असतात उदाहरणार्थ, अनपेक्षित रीतीने आपली आवडती व्यक्ति आपणास भेटली आपण तिला चटकन् ओळखतो (बोधन). आपला आनंद स्मित रूपाने चेहेऱ्यावर दिसू लागतो त्या आनंदाचा प्रभाव एवढा असतो की इतर अत्यंत महत्त्वाचीं कार्ये मुद्दा बाजूला टाकून आपण आपल्या प्रिय व्यक्तीकडे त्वरेने जातो हे प्रेरण आपल्या आनंदाच्या भावनावर अवलंबून असते खरे; पण या घटनेंत ‘भावना’चाच भाग अधिक असतो. मानवीजीवनात भावनात्मक अनुभवाला फार मोठे महत्त्व आहे.

काही अनुभवात ‘ प्रेरण ’ हेंच महत्त्वाचें असतें घोडयाची शर्यत व या सारखे स्पर्धात्मक खेळ या घटनांत बोधनभावन असतात. पण प्रेरणामुळे होणाऱ्या हालचालीचा प्रमुखपणाच अधिक डोळयात भरणारा असतो.

मनाच्या या शक्तीचा विचार करताना काही शास्त्रज्ञ 'प्रेरण' हा फार महत्त्वाचा घटक आहे असे मानतात. मानवाच्या गुतागुतीच्या जीवन-क्रमात परिस्थितीला तोड देण्याची जी सारखी धडपड चाललेली दिसते त्या धडपडीत 'प्रेरणा'चीच जाणीव सारखी मनात राहते. प्रेरणाने निर्माण होणारी कार्यप्रवृत्ति मानवासारख्या उच्च दर्जाच्या प्राण्याच्या बाबतीत बोधपूर्वक (Conscious) असते, कित्येकदा अबोधपूर्वक (Unconscious) होणाऱ्या त्याच्या शारीरिक हालचालीतहि ही प्रवृत्ति दिसून येते सामान्यत: खालच्या दर्जाच्या प्राणिमात्राच्या अबोधपूर्वक आचरणात ही प्रवृत्ति आढळते. सर पर्सी नन् या विख्यात शिक्षणशास्त्रज्ञाने या प्रवृत्तीला 'horme' हा स्वतत्र पारिभाषिक शब्द वापरला आहे प्राणीमात्राच्या सर्व हेतुगर्भ (porposive) प्रक्रियाना 'horme' हा शब्द त्याने निश्चित केला प्रेरणाने होणारी क्रिया 'horme' चा पोटभेद असून ती क्रिया बोधपूर्वक होते, जाणिवेने होते एवढेच तिचे वैशिष्टय *

याचबरोबर सर पर्सी नन् याने योजलेल्या दुसऱ्या एका पारिभाषिक शब्दाचा विचार करणे सोईचे होईल ग्रहणशक्ति, सलग्नताशक्ति या मनाच्या शक्तीचा विचार आपण मागे केला आहे. स्मरणशक्तीच्या मुळाशी या शक्ति आहेत. नन्च्या मते स्मृति ही दोन प्रकारची असू शकते. एक बोधपूर्वक व दुसरी अबोधपूर्वक. आपण सामान्यत. बोधपूर्वक स्मृतीचा विचार करतो, त्या वेळी अबोधपूर्वक असणाऱ्या स्मरणाचा या स्मृति शब्दात समावेश

---

* To this element of drive or urge, whether it occurs in the conscious life of men and the higher animals, or in the unconscious activities of their bodies and (presumably) unconscious behaviour of lower animals, we propose to give a single name–*horme*. In accordance with this proposal all the purposive processes of the organism are hormic processes, conative processes being the sub-class whose members have the special mark of being conscious. Sir Persey Nunn-Education, Its Data and First Principles. 1949 P. 28.

होत नाही. म्हणून या दोन्ही प्रकारच्या स्मृतींना लागू पडावा म्हणून नन्ने mneme* या नवीन शब्दाची योजना केली.

मनाच्या विविध शक्ति, त्यांची नावें व कार्ये यांचें आतापर्यंत विवेचन झाले या शक्तींच्या साहाय्याने होणारे मनोव्यापार जीवनात अत्यंत महत्त्वाचे आहेत किंबहुना त्या व्यापाराच्या बरेवाईटपणावर प्राण्यांच्या आयुष्यातील सुखात्मता किंवा दु खात्मता, जीवनाची प्रगति वा अधोगति बऱ्याच अंशी अवलंबून असते. शिक्षणक्षेत्रात या गोष्टीचा बराच विचार झाला पाहिजे योग्य अनुभव मुलांना प्राप्त व्हावे अशी परिस्थिति निर्माण करणे हे शिक्षणाचे महत्त्वाचे अंग आहे अनुभाव्य वस्तु एकच असते; पण व्यक्तिगत भेदामुळे त्या वस्तूच्या अनुभवाने निर्माण होणाऱ्या भावना निरनिराळ्या असू शकतील भावनाभेदामुळे प्रेरणभिन्नता निर्माण होईल. म्हणून या सर्व शक्ति योग्य मार्गाने आपापले कार्य करतील व मुलाच्या मनाचा विकास घडवून आणतील अशी अध्यापनपद्धति व शालेय वातावरण आवश्यक असतात ही गोष्ट शिक्षकांनी नित्य ध्यानात ठेवावी



---

* Similarly we shall bring together under a common designation all the varied phenomena referred by Butler to memory, conscious or unconscious. We shall speak of such phenomena as *mnemic* and shall give the name 'mneme' to the character of living things which they exemplify. Memory, then, is conscious mneme just as conation is conscious horme. Sir Percy Nunn-Education, Its Data and First Principles 1949 p. 28.

## प्रकरण ४ थें

# सहजप्रवृत्ति (Instincts)



शरीर व मन याच्या अन्योन्य सबधाविषयी शास्त्रज्ञात कशी मत-मतातरे आहेत हे आपण मागील प्रकरणात पाहिले. प्रत्येक पक्ष आपल्याच मतप्रणालीला चिकटून बसणारा आहे त्यामुळे मानसशास्त्रातील प्रमुख गृहीतकाच्या (Postulates) विवेचनातहि आपणास निरनिराळे दृष्टि-कोन आढळून येतात. प्राणिमात्राकरवी जी जी क्रिया केली जाते ती ती सहेतुक असते यात शका नाही. मात्र कित्येक क्रिया हेतुगर्भ असतात तर कित्येक हेतुपूर्ण होतात. मतातराला अवकाश मिळतो तो हेतुगर्भ क्रियाच्या विवे-चनातच कित्येकदा आपणास असें वाटते की आपण जे काही करतों तें आपोआप होते. त्या कृतीच्या मागे पूर्ण जाणीव नसते. त्या कशा कराव्या, हे आपणास कोणी शिकवावे लागत नाही जन्माला आल्याबरोबर रडावें, आईने स्तनपानासाठी जवळ घेतले म्हणजे दूध प्यावे, इत्यादि क्रिया मुलाला कोणी शिकविल्या आहेत ? अशा क्रिया करताना अमुक एक हेतु मुलाच्या मनात आहे असे आपण म्हणू शकतो का ? या व अशा प्रकारच्या अनेक क्रिया नित्यशः होत असतात. हे ध्यानात घेऊन मानसशास्त्रज्ञानी या क्रियाचे सहजत्व मान्य केले व ज्यामुळे अशा क्रिया होतात त्याना सहजप्रवृत्ति असें नाव दिले.

वर्तनवादी पक्ष या गृहीतकाच्या पूर्णपणे विरुद्ध आहे. आज कुणी एखाद्या वर्तनवाद्याला म्हणाले की अमुक क्रिया सहजप्रवृत्त आहे तर तो एकदम खवळून उठेल त्याच्या मते सहजप्रवृत्त नावाच्या क्रिया अस्तित्वातच नाहीत. आपण जें जें करतो त्यातील प्रत्येक गोष्ट पूर्णतया अगर अल्पांशाने आपण शिकतो आणि मग करतों.

सहजप्रवृत्ति मानणाऱ्या पक्षामध्ये तरी कुठे एकवाक्यता आहे ? वुइल्यम् जेम्सच्या मते इतर प्राण्यापेक्षा मनुष्यात अधिक सहजप्रवृत्ति असतात. अशा प्रवृत्तीची त्याने एक भली मोठी यादीच दिली आहे सवयीने सहज-प्रवृत्ति बदलू शकतात असेहि त्याचे मत आहे.

सहजप्रवृत्तीचा मोठा पुरस्कर्ता म्हणजे वुइल्यम मॅग्डूगल् हा होय. व्यक्तिगत वर्तन असो अगर सामाजिक वर्तन असो, सर्वांच्या मुळाशी सहज-प्रवृत्ति असतात हा त्याचा सिद्धान्त. एखाद्या चेतकाची प्रतीति-बोधन होणे, त्यामुळे सुखदुःखात्मक भावना निर्माण होणे व त्यानतर एखाद्या विशिष्ट तऱ्हेने प्रवर्तन होणे या क्रियानी युक्त अशा सहजप्रवृत्ति मनुष्यमात्राच्या जीवनात नेहमी दृष्टीस पडतात यापैकी बोधन व प्रवर्तन हे घटक शिक्षणाने वा अन्य रीतीने बदलता येतात, पण ‘ भावन ’ या मनोवस्थेत अत्यत अल्प बदल होतो मानसशास्त्राच्या प्रान्तात मॅग्डूगल्चे मत प्रमाण मानणारे आज पुष्कळ विद्वान् आहेत.

१९२४ साली ल्यूथर एल् बरनार्ड नावाच्या लेखकाने “सहजप्रवृत्ति ” नावाचे एक पुस्तक लिहिले सुमारे चारशे लेखकाची पुस्तके वाचून त्याने असे दाखविले आहे की ज्याना हे लोक ‘ सहज-प्रवृत्त क्रिया ’ म्हणतात त्याची सख्या ६००० च्या जवळपास आहे ही गोष्ट फारच विलक्षण आहे हे खरे; **पण त्यामुळे सहजप्रवृत्ति मानूं नयेत असें सिद्ध होत नाही** म्हणून वर्तनवादी पक्षाचे मत जरा बाजूला ठेवून आपण सहजप्रवृत्तीचा विचार करू

वनस्पतीपासून सुरुवात करून माणसापर्यंत विकास-श्रेणीतील निर-निराळ्या थराचे निरीक्षण करू गेल्यास असे दिसून येते की प्रत्येक जीवजातीत काही क्रिया नैसर्गिक प्रेरणेनुसार होत असतात ही नैसर्गिक प्रेरणा त्या जीवात उपजतच आलेली असते अशा नैसर्गिक प्रेरणेनुसार घडणाऱ्या क्रियाचा व प्रतिक्रियाचा खोल अभ्यास करू लागल्यास असे आढळून येते की या क्रिया तीन प्रकारच्या असतात.

(अ) अगदी कनिष्ठ वर्गाच्या जीवजातीत ज्या यात्रिक स्वरूपाच्या प्रतिक्रिया दिसून येतात त्यास बीजभूत प्रवृत्ति (Tropism)* असे म्हणतात.

* Tropism is the simplest form of adaptive reaction.

उदाहरणार्थ, (१) एकाद्या झाडाचे बी जमिनीत पुरल्यास मुळे खालच्या दिशेने जमिनीत वाढतात व खोडाचा भाग जमिनीवर सूर्यप्रकाशाच्या दिशेने वाढत जातो. (२) काही वनस्पतीची फुले सूर्य-प्रकाशाकडे सतत आकर्षिलीं जातात. सूर्याची दिशा बदलेल तसतशी ही फुलेहि आपली तोंडे त्या दिशेकडे वळवितात. (३) आद्यजीवाचे (Protozoa) निरीक्षण केल्यासहि असे आढळून येते की काही प्रकारचे जीव सूर्याच्या किरणाकडे वळतात व काही सूर्यकिरणापासून दूरदूर पळतात

अशा तऱ्हेच्या क्रिया बीजभूत प्रवृत्तीची उदाहरणे म्हणून सागतां येतील; पण वनस्पतीहून वरच्या दर्जाच्या कीटकाच्या क्रिया-प्रतिक्रियाचे निरीक्षण केल्यास त्या बीजभूत प्रवृत्तीच्या (Tropism) आधाराने स्पष्ट करता येत नाहीत. कारण थोड्याफार प्रमाणात का होईना, कीटक, पक्षी वगैरे प्राण्याच्या क्रियात अधिक गुतागुत दिसून येते.

(**ब**) प्राण्याच्या प्रतिक्रियात आणखी एक तऱ्हा आढळते. या क्रियाना प्रतिक्षेप क्रिया (Reflex actions) असे म्हणतात अगावर माशी बसल्यास ती उडविणे, शिकणे, उजेडाच्या प्रमाणात डोळ्याच्या बाहुलीचा आकार कमीजास्त होणे, खाजविणे, धूळ उडाल्यास डोळे मिटणे, आबट पदार्थ पाहिल्यास तोंडास पाणी सुटणे, खोकणे या सर्व क्रिया प्रतिक्षेप क्रियेची उदाहरणें म्हणून सागता येतील प्रतिक्षेप क्रिया करीत असताना प्राणी विचार करीत नाही. या क्रियात जाणूनबुजून एखादा विचार मनात धरलेला नसतो. या क्रियासाठी प्राण्याला अवधान केन्द्रित करावे लागत नाही. अनुभवाने प्रतिक्षेप क्रियेत फारसा फरक घडून येण्याची शक्यता नसते व ध्येय साध्य होईपर्यंत निरनिराळ्या तऱ्हेने धडपड करून पाहण्याची चिकाटीहि या क्रियात आढळत नाही. ही सर्व वैशिष्टये ध्यानात घेऊन प्रतिक्षेप क्रियेची व्याख्या खालीलप्रमाणे करता येईल. प्रतिक्षेप ही एक साधीसुधी जन्मजात प्रतिक्रिया आहे. तिच्यामुळे उपयुक्त असें कार्य होतें. अभिगामी आणि बहिर्गामी नसासंस्थांच्या संबंधाची एक विशिष्ट पद्धति अशीहि काही शास्त्रज्ञ प्रतिक्षेपाची व्याख्या करतात.

बीजभूत प्रवृत्ति व प्रतिक्षेप क्रिया याच्यात फरक असा की प्रतिक्षेप क्रिया घडतांना संवेदना मेंदूकडे नेणाऱ्या व मेंदूकडून प्रतिक्रियेची संवेदना

घेऊन येणाऱ्या ज्ञानततूची गरज असते बीजभूत प्रवृत्तीनुसार होणाऱ्या क्रियेंत अशा तऱ्हेच्या ज्ञानततूची गरज नसते दैनदिन जीवनात आपणास ज्या प्रतिक्षेप क्रिया दिसतात त्या अनेकविध लहान लहान प्रतिक्षेप एकत्र येऊन तयार झालेल्या असतात उदाहरणार्थ, बेडूक माशी पाहतो. जीभ बाहेर काढून तिला टिपतो व गिळतो

**(क)** सर्व उच्च दर्जाच्या प्राण्यात दिसून येणाऱ्या व नैसर्गिक प्रेरणेने घडणाऱ्या तिसऱ्या तऱ्हेच्या क्रिया म्हणजे सहजप्रवृत्त क्रिया होत सहज-प्रवृत्ति दर्शविणाऱ्या कितीतरी क्रिया आपणास दाखविता येतील

(१) पक्ष्याची घरटी बाधण्याची क्रिया

(२) मादीला आकर्षित करण्यासाठी मनधरणी करताना नराकडून होणाऱ्या क्रिया (Courting)

(३) पिलाच्या पालनपोपणासाठी मादीकडून होणाऱ्या क्रिया

(४) स्वसरक्षणार्थ चालणारी प्राण्याची धडपड (Combative Instinct) या सर्व सहजप्रवृत्तीनुसार घडणाऱ्या क्रिया होत

गाधील माशी (Wasp) नावाचा प्राणी सुरक्षित स्थळी घरटे बाधून अडी घालतो त्याच्या रक्षणासाठी सतत पहारा करीत राहतो पक्ष्याच्या सर्व कृतीत सहजप्रवृत्ति फार स्पष्टपणे दिसते त्याचे निरनिराळ्या ऋतूत निरनिराळ्या ठिकाणी हिडणे, घरटी बाधणे, ठराविक काली लैंगिक सबध व प्रजोत्पादन करणे, आनदाने गाणे, पिलाना अन्न देणे, अन्नशोधनार्थ निर-निराळ्या ठिकाणी हिडणे या सर्व क्रिया सहजप्रवृत्त असल्या तरी प्रत्येक जातीचे वैशिष्टचहि त्यात दिसून येते एकाच जातीतील सर्व पक्ष्याच्या कृतीत मात्र विलक्षण साम्य दिसून येते

वरील विवेचनावरून प्राण्यात काही कृतीसाठी आवश्यक त्या प्रेरणा निसर्गानेच निर्माण केलेल्या असतात हे स्पष्ट दिसून येते वरील क्रियाच्या परीक्षणावरून नैसर्गिक प्रवृत्तीनुसार प्राणी ज्या क्रिया करतात त्याची वैशिष्टचे आपणास सागता येतील

(१) सहजप्रवृत्त क्रिया हेतुगर्भ (Purposive) असते शत्रू-पासून व थडीवाऱ्यापासून पिलाचे व स्वतःचे रक्षण करण्याच्या हेतूनेच ठराविक काली पक्षी घरटी बाधतात

(२) नैसर्गिक प्रवृत्तीनुसार घडणाऱ्या कृतीत प्राण्याचे अवधान विशिष्ट गोष्टीकडे आपोआपच वेधले जाते (Selective attention). एखाद्या खोलीत माजराला सोडल्यास त्याचे लक्ष इतर कोणत्याहि वस्तुपेक्षा त्याचे आवडते खाद्य जे उदीर त्याकडेच लवकर वेधेल

(३) दृष्टीसमोर ठेवलेले खाद्य मिळविण्यासाठी कृतीत जरूर ते फेरफार प्राणी करतो असेहि दिसून येते. भक्ष्य पकडण्याचे वेळी तयारीने बसणे, योग्य सधीची वाट पाहणे, एका तऱ्हेने पकडणे न जमल्यास दुसऱ्या रीतीने प्रयत्न करून पाहणे वगैरे

(४) ध्येय गाठीपर्यंत चिकाटीने ती कृति करीत राहणे हेहि सहज-प्रेरणेनुसारच प्राणी करीत असतो एकदा पक्ष्याने बाधलेले घरटे आपण मोडून टाकले तर तो परत बाधतो घरट्यासाठी लागणारे साहित्य जर आपण त्यास मुद्दाम मिळू दिले नाही, तर तो योग्य असे दुसऱ्या तऱ्हेचे साहित्य घेऊन घरटे पुरे करू शकतो

(५) पूर्वानुभव ध्यानात घेऊन क्रियेंत इष्ट तो बदल घडवून **आण**-ण्याची पात्रताहि प्राण्यात असलेली दिसून येते आपल्याला घरटे बाधण्यास एखादे स्थळ सुरक्षित नाही असे एकदा आढळून आल्यास पक्षी जागा बदलतो.

(६) इष्ट ध्येय गाठल्याबरोबर सहजप्रवृत्त क्रिया थाबते

वरील सर्व वैशिष्टचे ध्यानात घेतल्यास आपणास असे दिसून येईल की, प्रतिक्षेप क्रिया व सहजप्रवृत्त क्रिया ह्या एक नव्हेत **सहजप्रवृत्त क्रियेंत बुद्धिमत्तेचा जो थोडाफार भाग दिसून येतो तो प्रतिक्षेप क्रियेंत मुळीच दिसून येत नाही.** जो जो आपण विकास-श्रेणीत वरवर जावें तो तो आपणास सहजप्रवृत्त क्रियाचे तयार दुवे कमी कमी सापडतील व बुद्धिमत्ता जास्त जास्त वाढत गेलेली दिसून येईल. **अनुभवाने कृति बदल-ण्याची शक्यताहि** वरच्या दर्जाच्या प्राण्यात खालच्या दर्जाच्या प्राण्यापेक्षा

अधिक आढळते. खालच्या दर्जाच्या प्राण्यात बुद्धिमत्ता कमी असल्याने सहजप्रवृत्तीचे वळण बदलण्याची शक्यता फारच कमी असते मुग्याच्या सहजप्रवृत्त कृतीत ९/१० भाग नैसर्गिक असतो व १/१० भाग फक्त बुद्धिमत्तेने बदलता येतो असे फोरेलने प्रयोगाने सिद्ध केले आहे दिवा पाहिल्याबरोबर पतग त्यावर उडी घेतो भाजून मरण्याची कल्पना येऊन तो आपली कृति बदलू शकत नाही **सहजप्रवृत्त कृतीचा लवचिकपणा** (Plasticity) **मोठ्या मेंदूच्या वाढीवर सर्वस्वी अवलंबून असतो.** रानकोबडीचे घरटें बाधण्याचे साहित्य आपण जर नाहीसे केले तर दुसऱ्या तऱ्हेच्या साहित्याने ती आपले घरटे बाधते लिनेट पक्ष्यातहि हा गुण आढळून येतो वरच्या दर्जाचे बुद्धिमान् प्राणी अनुभवानतर सहजप्रवृत्त क्रियाना जास्त यशस्वी रीतीने मुरड घालू शकतात आपण प्रेमाने हाक मारल्यास कुत्रा प्रथम जवळ येतो पण तो जवळ आल्यावर आपण जर त्यास काठी मारली तर दुसऱ्या खेपेला आपल्या हाकेला कुत्रा पुढे येण्यास कचरेल तो दबकत दबकत पुढे येईल व सावधानपणे आपल्या कृतीकडे लक्ष ठेवून काठी उगारताच दूर पळून जाईल अशा रीतीने अनुभवानुसार सहजप्रवृत्त क्रियात बराच इष्ट असा फरक केला जातो.

वास्तविक पाहता आत्मप्रवृत्ति हीच खरी प्रवृत्ति काहीच्या मते मूळ सहजप्रवृत्ति दोन (१) स्वरक्षण ( Self-preservation ) व (२) जाति-रक्षण ( Race-preservation ) काहीच्या मते मूळ सहजप्रवृत्ति चौदा मानाव्यात साराश गृहीत येवढेच धरावयाचे की जन्माला येताना मन कोरे करकरीत पाटीसारखे नसते त्यावर काही सस्कार उपजतच असतात व त्या सहज-सस्काराच्या दिशेने होणाऱ्या क्रिया शिकवाव्या लागत नाहीत

आता प्रमुख सहजप्रवृत्ति कोणत्या ते पाहू

(१) **वात्सल्यप्रवृत्ति ( Parental Instinct )** :—या प्रवृत्तीस मॅग्डूगल्‌ने Nature's brightest and most beautiful invention अशी सज्ञा दिली आहे. पिलाकडून स्तनपान करविणे व या क्रियेच्या वेळी परमोच्च समाधान व आनद वाटणे हे या प्रवृत्तीचे प्रमुख लक्षण होय. जगातील परमावधीच्या त्यागाचे मूळ मुलासाठी वाटेल तो त्याग करण्याची

आईची नैसर्गिक प्रवृत्ति याच प्रवृत्तीत दिसून येते बुद्धिमत्तेच्या साहाय्याने परमार्थासबंधीच्या सर्व कल्पना मनुष्यप्राण्याने याच प्रवृत्तीतून शोधून काढल्या असल्या पाहिजेत याच दृष्टीने मॅग्डूगल्ने या प्रवृत्तीस बुद्धि व नीति याची जननी "Mother of both Intellect and Morality"—असे म्हटले आहे

दूर दूर हिडून मुलासाठी अन्न जमा करणे ही क्रियासुद्धा मातृत्वाच्या सहजप्रवृत्तीतूनच प्रगट होते काही जातीच्या प्राण्यात अन्न सशोधनासाठी आई जेव्हा बाहेर पडते तेव्हा मूलहि तिजबरोबर जाते अशा वेळी ती मुलाला सारखी स्वत बरोबर बाळगते काही जातीत मूल घरट्यात गुपचूप बसून राहते व आईची वाट पाहते घरी येऊन पिलाना अगोदर भरविल्याखेरीज आई खात नाही अन्नसशोधनासाठी कितीहि दूर भटकली तरी पुन्हा ती बिनचूक घरट्याकडे येते यावरून सहजप्रवृत्त क्रियातहि थोडीफार बुद्धिमत्ता असते हेच सिद्ध होते

पिलावर सकट येणार असे दिसताच आईची विलक्षण धादल उडते व पराकाष्ठेची धडपड करून ती आपल्या पिलास सकटमुक्त करण्याचा प्रयत्न करते

जातवार पाहिल्यास, ज्या जातीत आई मुलाला अन्न देऊन त्याचे सरक्षण करण्यास जास्त समर्थ असते त्या जातीच्या बालकाचा जास्त काल खेळण्यात बागडण्यात जातो पिलू जेव्हा असहायपणे ओरडते तेव्हा मातृत्वाची भावना आईत सर्वात जास्त तीव्रतेने जागृत झालेली दिसून येते आई ज्या निरनिराळ्या तऱ्हानी मुलाची काळजी घेते किवा त्याला जपते त्या तऱ्हा पाहिल्या म्हणजे मातृत्वाची सहजप्रवृत्ति ही एक गुतागुतीची प्रतिक्षेप क्रिया आहे हा वर्तनवादी लोकाचा दृष्टिकोन अगदी चुकीचा आहे अशी खात्री पटते प्रतिक्षेप क्रियात अनुभवाने बदल होण्याची शक्यता नसते पण सहजप्रवृत्त क्रियात अनुभवाने इष्ट असा कितीतरी फरक प्राणी घडवून आणताना दिसतात.

(२) **युद्धप्रवृत्ति (Instinct of Combat)** :—सकट आले असता युद्धास तयार होणे व शक्य तेवढा प्रतिकार करून स्वसरक्षण करणे ही

सहजप्रवृत्ति बहुतेक सर्व प्राण्यात दिसून येते. याला उदीर, ससा यांसारखे काही प्राणी अपवाद आहेत पुष्कळशा प्राण्याच्या जातीना युद्धासाठी विशिष्ट अवयवाची नैसर्गिक देणगीच मिळालेली असते एकाच जातीतील सर्व प्राण्याची प्रतिकार करण्याची तऱ्हा साधारण सारखीच असते प्राणी ज्या तऱ्हेने स्वमरक्षण अगर प्रतिकार करतात ती तऱ्हा त्याना कोणीहि शिकविलेली नसते, ती कला त्यास उपजतच अवगत असते परतु या क्रियात जो बुद्धिमत्तेचा भाग दिसून येतो त्यावरून युद्धप्रवृत्ति म्हणजे ज्ञान-ततूच्या प्रतिक्षेप क्रिया असे म्हणता येणार नाही *

कोणत्याहि जातीत मादीपेक्षा नरात ही युद्धप्रवृत्ति जास्त प्रमाणात असलेली दिसते अन्नसशोधनाचे वेळी व लैंगिक सबधाचे वेळी ही प्रवृत्ति प्राणी पुष्कळ वेळा उपयोगात आणताना दिसतो ही प्रवृत्ति जागृत करणारे इतर विषयहि पुष्कळ असू शकतील जेव्हा जेव्हा प्राण्याच्या कोणत्याहि ध्येयाचे आड काही अडचण येईल तेव्हा तेव्हा ही प्रवृत्ति जागृत होते असें सर्वसामान्यत म्हणता येईल

(३) **जिज्ञासाप्रवृत्ति (Instinct of Curiosity)** :—कोणत्याहि कृतीपूर्वी प्राणी जी उत्सुकता दाखवितो त्यालाच जिज्ञासाप्रवृत्ति असे म्हणता येईल कोणताहि विषय ही प्रवृत्ति प्राण्यात निर्माण करू शकतो विषयाचे सपूर्ण आकलन व अवबोध होण्याच्या पूर्वीची पायरी म्हणजे जिज्ञासा होय जिज्ञासाप्रवृत्ति जागृत होण्यास विषयात काहीतरी नावीन्य असावे लागते समोर येणाऱ्या परिस्थितीचे सपूर्ण ज्ञान करून घेण्याच्या दृष्टीने प्राण्याला या प्रवृत्तीचा फार उपयोग होतो कारण हे ज्ञान झाल्याखेरीज त्यास प्रतिक्रिया निश्चित करता येत नाही ज्ञानेन्द्रियाच्या साहाय्याने जिज्ञासातृप्ति होते प्राण्याच्या श्रेणीत आपण जसजसे वर जाऊ तसतसे जिज्ञासाप्रवृत्तीचे स्वरूप जास्त जास्त विस्तृत होत गेलेले दिसेल

(४) **अन्नसंशोधन प्रवृत्ति ( Food-seeking Instinct )** :— अन्न शोधून खाण्याची व पचन होण्याची या दोन्ही क्रिया प्राण्यात उपजतच

* The combative act is spontaneous, persistent, varied, total, directed, anticipatory and perceptual.

असलेल्या दिसतात खालच्या दर्जाच्या प्राण्यात प्रत्येक जातीचे अन्नहि ठरलेलेच असते वाटेल तो प्राणी वाटेल तो पदार्थ अगर प्राणी खात नाही. अतिशय भूक लागली म्हणजे अन्न मिळविण्याच्या धडपडीत पक्ष्याच्या ठिकाणची भीतिसुद्धा नाहीशी होते अन्नमशोधनात मदत करणारे प्राण्यात एखादेच इन्द्रिय फार तरबेज असते काही जनावराना शिकार शोधताना घ्राणेन्द्रियाचा फार उपयोग होतो झाडात किवा गवतात लपून शिकार करताना शरीराच्या रगाची खूप मदत होते गवताचा व अगाचा रग सारखा असल्याने शत्रूला दिसण्याची शक्यता कमी होते भूक नसताना केलेल्या शिकारीपेक्षा भूक लागली असताना शिकार करून नतर ती खाण्यात जास्त समाधान व आनद असतो व यावरूनच as hungry as a hunter हा वाक्प्रचार रूढ झाला असावा

(५) **जुगुप्साप्रवृत्ति (Instinct of Repulsion)** :—आपले अन्न कोणते हे निश्चित ठरविण्यापूर्वी प्रयोग म्हणून काही प्राणी निरनिराळ्या पदार्थाच्या चवी घेतात व जी चव आवडत नाही तो पदार्थ आपोआपच ते दूर सारतात कित्येक पदार्थ काही वेळा आकर्षक वाटतात तर काही वेळा तिरस्करणीय वाटतात भूक असेल तेव्हा खाण्याचे पदार्थाचा वास आवडतो व तोडाला पाणी सुटते पण भूक नसेल किवा पचनक्रिया बिघडलेली असेल तर तेच पदार्थ पाहून किळस येते

(६) **विमोचनप्रवृत्ति (Instinct of Escape)** —हिच्या जागृतीला विविध कारणे सभवतात पण त्यातल्या त्यात अनपेक्षितपणे धाडकन् मोठा आवाज होणे, हे प्रधान कारण आहे एखादी मोठी वस्तु अकस्मात् हालली, कोणी तरी भिऊन मोठ्याने ओरडलें, असह्य शारीरिक वेदना उत्पन्न झाली, तरी सुद्धा स्वसरक्षणासाठी एखाद्या आश्रयस्थानी पळण्याची प्रवृत्ति दिसून येते

(७) **संघप्रवृत्ति (Herd Instinct)** —ज्या प्राण्यामध्ये ही प्रवृत्ति बलवत्तर असते, तो प्राणी एकटा राहू शकत नाही एकटेपणा त्याला मरण-प्राय वाटतो हरणासारखे प्राणी स्वसरक्षणार्थ कळप करून राहतात लाडग्या-सारखे प्राणी शत्रूवर हल्ला करण्यासाठी एकत्र जमतात मधमाशाचे जीवन

पाहिले म्हणजे परस्पर सहकार्याने एखादा जीवसमूह किती आश्चर्यकारक कार्य करू शकेल याची आपणास प्रतीति होते स्वसरक्षकवृत्ति, आक्रमकवृत्ति आणि सहकार्यवृत्ति या तिहींचा सुदर समन्वय मानवी समाजात झालेला आपण पाहतो.

(८) **आत्मविधानप्रवृत्ति** (**Instinct of Self-assertion**) —संघप्रवृत्तीने एकत्र झालेल्या समूहात कनिष्ठ प्रकारचे घटक दृष्टीस पडले म्हणजे ही प्रवृत्ति जोर करते आपल्या शारीरिक अगर मानसिक मोठेपणाचा आविष्कार हे या प्रवृत्तीचे मोठे लक्षण होय

(९) **आत्मसमर्पणप्रवृत्ति** (**Instinct of Self-Submission**) :—समूहात आपणापेक्षा कोणत्याहि प्रकारे बलवत्तर घटक दृष्टीस पडला म्हणजे दुर्बलाकडून या प्रवृत्तीचा अवलब केला जातो

(१०) **संभोगप्रवृत्ति** (**Instinct of Sex**) —प्राणिमात्राच्या विशिष्ट वयोमानातच ही प्रवृत्ति जागृत होते योग्य असा आपल्या आवडीचा भिन्न-लिंगी घटक दृष्टीस पडल्याबरोबर ही प्रवृत्ति निर्माण होते समाजधारणेच्या दृष्टीने या प्रवृत्तीचे महत्त्व फार मोठे आहे

(११) **सपादनप्रवृत्ति** (**Instinct of Acquisition**) —स्वत च्या उपजीविकेसाठी किंवा घरासारखे आश्रयस्थान सिद्ध करण्यासाठी या प्रवृत्तीची आवश्यकता असते या प्रवृत्तीचा उच्चबिंदु कजूष माणसाच्या वर्तनात दिसून येतो

(१२) **निर्माणप्रवृत्ति** (**Instinct of Construction**) —घरटी बांधण्याची साधने दिसली म्हणजे त्यातून विशिष्ट तऱ्हेची आश्रयस्थाने निर्माण करावी असे प्राण्याना वाटते त्या वेळी या प्रवृत्तीची कार्यक्षमता आपण पाहू शकतो लहान मुलातहि ही प्रवृत्ति बलवत्तर असते.

(१३) **याचनाप्रवृत्ति** (**Instinct of Appeal**) —युद्धप्रवृत्तीचा जोर ओसरला, प्रतिपक्षापुढे आपले काही चालत नाही हे स्पष्ट झाले म्हणजे अत.करणात ही प्रवृत्ति निर्माण होते. दुसऱ्याकडून साहाय्य मिळावे म्हणून प्राणी याचनेस प्रवृत्त होतो

(१४) **हास्यप्रवृत्ति (Instinct of Laughter)**.—मनुष्यप्राण्याचे वैशिष्टय म्हणून या प्रवृत्तीकडे बोट दाखविता येते आचार, विचार अगर उच्चार याच्यामधील विसगति अनुभवावयास मिळाली म्हणजे हास्य अपरिहार्य असते दुसऱ्याच्या दु खाने समाधान पावून हसणे हाहि एक हास्यप्रवृत्तीचा तामसी प्रकार आहे रागाचा पारा फार चढला तर त्याला उतारा म्हणूनहि हास्याचा केव्हा केव्हा उपयोग होतो कित्येक प्रसगी दु खाचा भाग हलका करण्यासाठी हास्य साहाय्यक ठरते

मॅग्डूगल्च्या मताप्रमाणे वरील चौदा सहजप्रवृत्तींचे थोडक्यात वर्णन केले आहे मात्र एक गोष्ट विसरता कामा नये, की या चौदा प्रवृत्ति स्वतत्र नसून सर्व प्राणिमात्रात दिसून येणारी जी एकमेव आत्मप्रवृत्ति तिची ही सोईसाठी मानलेली रूपे आहेत सर्व शाखा व मूळ खोड मिळून जशी आपण वृक्ष ही सज्ञा वापरतो तद्वतच मूळ आत्मप्रवृत्ति-वृक्षाच्या या अनेक शाखोपशाखा आहेत वर उल्लेख आलाच आहे की सहजप्रवृत्तीच्या सख्येबद्दल शास्त्रज्ञात एकमत नाही वरील चोदाखेरीज स्तनातून दूध चोखणे, लाजरेपणा, काळोखाची भीति, असूया इतकेच काय पण स्वत च्या बागेतील फळे न तोडणे, बारीक बारीक फटीतून अगर झाडाच्या ढोलीत लपलेल्या प्राण्याना हुसकवण्यासाठी फटीत अगर ढोलीत हाताची बोटे खुपसणे इत्यादि क्रियाहि सहजप्रवृत्त आहेत असे काही शास्त्रज्ञ मानतात

सहजप्रवृतीच्या विवरणावरून एक गोष्ट स्पष्ट होते की या क्रियाचा हेतु जाणिवेत स्पष्ट नसतो आपण असे का करतो याचे एकदम उत्तर देता येत नाही एवढ्याचसाठी या क्रियाच्या मुळाशी सहजप्रवृत्ति मानाव्या लागतात. मॅग्डूगल्ने केलेले सहजप्रवृत्तीचे लक्षण वर आलेच आहे, वुइल्यम् जेम्स् हीच गोष्ट पुढील शब्दात सागतो सहजप्रवृत्ति म्हणजे एक प्रकारची आचरणशक्ति त्यात अतिम साध्याची कल्पना नसते, पण ते विशिष्ट साध्य सिद्ध होते, तसेच ते विशिष्ट आचरण आधी शिकविलेहि जात नाही

बेन्थॅम्च्या मते सहजप्रवृत्ति म्हणजे बहिर्गामी नसासस्थेमार्फत होणारी जन्मजात प्रतिक्रिया ही क्रिया गुतागुतीची असते, विशिष्ट परिस्थितीला साजेशी व उपयुक्त असते वशिष्ट प्राणिसमूहात ही क्रिया एका विशिष्ट पद्धतीनेच केली जाते.

वरील सहजप्रवृत्तीखेरीज प्राण्याच्या जीवनात सर्वसाधारण स्वरूपाच्या काही सामान्य वृत्ति आहेत सूचना, सहानुभति, अनुकरण, क्रीडा,तालबद्धता, विधिनिष्ठता या प्रमुख वृत्ति होत या मबधीचे विवेचन योग्य स्थळी पुढे येणारच आहे

सहजप्रवृत्तीचे प्रेरक हेतु ध्यानात घेऊन काही शास्त्रज्ञ त्याचे निराळ्या रीतीने भाग पाडतात ते असे ––

(१) **आत्मनिष्ठ सहजप्रवृत्ति** ––अन्नसशोधन जिज्ञासा, युद्ध, विमोचन, जुगुप्सा, निर्माण, मपादन

(२) **लैंगिक सहजप्रवृत्ति** ––मभोग, वात्सल्य

(३) **सामाजिक सहजप्रवृत्ति** ––सघ, आत्मविधान, आत्मसमर्पण, याचना, हास्य.

## प्रकरण ५ वें

# भावना—मनोविकार (Emotions)



सहजप्रवृत्तीने प्रतीत होणाऱ्या अनुभवात बोधन, भावन व प्रेरण हे प्रमुख घटक असतात हे आपण पाहिले. त्या घटकाच्या कमीअधिक प्रमाणावर अनुभवाचे तीन प्रकार मानण्यात येतात.

(१) बोधनात्मक अनुभव :—कोणत्याहि नवीन विषयाचे अध्ययन-अध्यापन चालले असता जिज्ञासातृप्तीचा अनुभव या प्रकारात येतो.

(२) प्रवर्तनात्मक अनुभव —यात प्रत्यक्ष वर्तनाचा भाग मोठ्या प्रमाणात असतो

(३) भावनात्मक अनुभव —हा प्रकार प्राणिमात्राच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचा आहे. सुखदु:खात्मकता ही प्राण्याच्या जीवनात पूर्णतेने दृष्टीस पडते. किंबहुना सुखावाप्ति आणि दु:खपरिहार यासाठीच प्राणी अहोरात्र धडपडत असतो, म्हणूनच सहज प्रवृत्तीच्या बरोबरीचे महत्त्व भावनाना मानसशास्त्रात प्राप्त झाले आहे

आपल्यासमोर एखादा अक्राळविक्राळ प्राणी आल्यास आपणास भीति वाटते व म्हणून आपण तेथून दूर पळतो. एखाद्याने आपला अपमान केल्यास आपल्याला राग येतो, व त्याला आपण मारण्यास धावतो आईचे मुलावर पराकोटीचे प्रेम असते व म्हणून ती त्यास सारखी जपत असते. आपल्यापेक्षा श्रेष्ठ व्यक्तीसमोर मनुष्य विनीत होतो कारण त्यास स्वत:च्या अज्ञानाबद्दल न्यूनगंड वाटत असतो. सभोगासाठी ठराविक कालात प्राणी धडपड करतात कारण त्याच्या मनात त्या वेळी लैंगिक आकर्षण उत्पन्न होते मनुष्य संघ करून राहण्याची इच्छा करतो कारण एकलेपणाची जाणीव

त्यास फार अस्वस्थ करते नवीन एखादी वस्तु पाहिल्यास आपणास आश्चर्य वाटते व त्यातूनच त्या वस्तूसंबंधी ज्ञान करून घेण्याची उत्सुकता उत्पन्न होते.

वरील सर्व उदाहरणांत भीति, राग प्रेम, लैंगिक आकर्षण, एकलेपणाची जाणीव व आश्चर्य या गोष्टी मनाची विषयाकडे पाहण्याची एक विशिष्ट वृत्ति दाखवितात, व यासच आपण भावना असे म्हणतो. भावनेची व्याख्याच करावयाची झाल्यास असे म्हणता येईल की एखाद्या वस्तूबद्दल 'भावन' युक्त अशी जी मनाची विशिष्ट ठेवण तिला भावना असे म्हणतात मॅग्डुगल्ने भावनेची लक्षणे पुढीलप्रमाणे दिली आहेत --प्राण्याच्या ठिकाणी अशी एक विशिष्ट वृत्ति असते, की जीमुळे विविष्ट वस्तूची प्रतीति झाल्याबरोबर त्याच्या ठिकाणी काही तऱ्हेच्या भावनाचा प्रक्षोभ उत्पन्न होतो आणि त्या प्रक्षोभाच्या आवेशात त्या वस्तूबाबत त्याच्याकडून एका ठराविक तऱ्हेचे आचरण होते मॅग्डूगल्ने प्रत्येक सहजप्रवृत्तीच्या जोडीला एकेक स्वतंत्र भावना गृहीत धरली आहे

| प्रवृत्ति व | तिच्या जोडीने प्रगट होणारी भावना |
|---|---|
| १ विमोचन | भीति |
| २ युद्ध | राग |
| ३ जुगुप्सा | तिटकारा कटाळा |
| ४ वात्सल्य | मृदुभाव |
| ५ याचना | आर्तभाव |
| ६ संभोग | कामभाव |
| ७ आत्मसमर्पण | हीनभाव |
| ८ जिज्ञासा | आश्चर्य |
| ९ आत्मविधान | अहंभाव |
| १० संघ | एकाकीभाव. |
| ११ अन्नसंशोधन | क्षुधा, वखवख |
| १२ निर्माण | कर्तृभाव |
| १३ संपादन | स्वाम्यभाव |
| १४ हास्य | विनोदभाव |

भावनेच्या सर्वसामान्य स्वरूपाचे वर्णन करावयाचे झाल्यास खालील गोष्टी सागता येतील

१ भावनेचा प्रात फार व्यापक आहे प्रत्यक्ष वस्तुबोधाप्रमाणेच काल्पनिक विषयहि भावना जागृत करू शकतात

२ भावनेत गुणात्मक फरक असतो समोरचा हाडाचा तुकडा काढून घेतल्याने कुत्र्यास येणारा राग, व जगात श्रीमताकडून गरिबावर होत असलेला अन्याय पाहून एखाद्या साधुमतास येणारा राग हे दोन्ही एकाच मापाने मोजता येणार नाहीत समोरून एखादा मवाली मनुष्य येताना पाहून कुलीन स्त्रीस वाटणारी भीति व उदराला वाटणारी माजराबद्दलची भीति यात गुणात्मक फरक आहे आईचे मुलाविषयीचे प्रेम व एखाद्या सुदर तरुणीविषयी तरुण पुरुषास वाटणारे आकर्षण ही दोन्ही एकाच स्वरूपाची आहेत असे आपणास म्हणता येणार नाही

३ भावना जागृत करण्यास जरी एखादी विशिष्ट व्यक्ति किवा वस्तू कारणीभूत झालेली असली तरी तिचा परिणाम मात्र सर्व वातावरणावर होतो. उदाहरणार्थ, आपण कोणत्याहि कारणाने जरी सतापलो असलो तरी पुढे दिसेल, त्या सर्वावर आपण तो राग काढीत असतो. 'वड्याचे तेल वाग्यावर' ही म्हण याच अर्थाने रूढ झालेली दिसून येते. एखाद्या विशिष्ट प्रसगात जरी आपल्याला एखाद्या व्यक्तीची चीड आली तरी त्या व्यक्तीबद्दल आपणास कायमचाच तिरस्कार उत्पन्न होतो.

४ मनोविकार अगर भावना दोन तऱ्हानी निर्माण होऊं शकते (१) प्रत्यक्ष वस्तूमुळे अगर कल्पनेमुळे जागृत झालेल्या मनोविकाराने व (२) शारीरिक फरकामुळे अगर अस्वास्थ्यामुळे निर्माण झालेल्या मनोविकाराने. रक्तदाब वाढल्याने छातीत धडधडते व भीति हा मनोविकार निर्माण होतो.

५ कोणतीहि भावना अगर मनोविकार निर्माण होण्यासाठी काही इच्छा व वासना याचे अस्तित्व गृहीत धरावें लागते. स्वाभिमान राखण्यासाठी मनुष्य जपतो ही गोष्ट गृहीत न धरल्यास स्वाभिमान दुखावल्यामुळे चीड अगर राग येण्याची शक्यताच नाही. परीक्षा पास होण्याची इच्छाच नसेल तर ''तीत नापास झाल्याचे दुःखहि नाही. मोठेपणा

मिळविण्याची आकाक्षाच नसेल तर तो न मिळाल्यास निराशा उत्पन्न होण्याचा प्रश्नच उरत नाही मनोविकाराच्या या गुणधर्मास ‘ मनोविकाराचे परभृतत्व ’ (Parasitical character of emotion) असे नाव देतात.

भावनाचे दर्शन आपल्याला चेहरा व इतर शारीरिक फेरफार याचे साहाय्यानेच होतें हातपाय लटपटणे, जीभ कोरडी पडणे, चेहऱ्यावर भेदरलेला भाव दिसणे, ही व अशा तऱ्हेची लक्षणे दिसली म्हणजेच आपण माणसास भीति वाटली आहे असे ओळखतो त्याचप्रमाणे डोक्यावरच्या शिरा ताठ फुगणे, डोके गरम होणे, छातीचे ठोके जलद पडणे, डोळे लाल होणे, वगैरे शारीरिक चिन्हावरूनच आपण रागाचे अस्तित्व जाणतो यावरून येवढी गोष्ट निश्चित दिसून येईल की शारीरिक हावभाव हा भावना-दर्शनाचा फार मोठा भाग आहे हाच सिद्धान्त अगदी टोकास पोचवून जेम्स् व लँग् यानी भावनाविषयक सिद्धान्त तयार केला आहे

## वुइल्यम् जेम्स् व सी. लँग् यांचा भावनाविषयक सिद्धान्त

भावना या मानसशास्त्रीय घटनेचे सूक्ष्म निरीक्षण करताना जेम्स्ला असे आढळून आले की आपण भावनेचे अस्तित्व फक्त चेहऱ्यावरील व इतर शारीरिक फेरफाराच्या आधारानेच सिद्ध करू शकतो कोणतीहि भावना विचारात घेतल्यास तिचे दर्शन घडवून आणणारी सर्व शारीरिक चिन्हे जर वगळून टाकली तर ‘ भावना ’ या नावाने सबोधण्याजोगे असे काही शिल्लकच राहात नाही मग जेम्स्च्या मते भावना या नावाचा स्वतत्र मानसिक घटक मानण्याचे कारणच काय ? म्हणून त्याने असा निर्णय दिला की आपण ज्या अवस्थेला भावना असे म्हणतो ती एक प्रकारची शारीरिक व्यापारामुळे निर्माण होणारी शारीरिक सवेदनाच होय *

भावनाचे स्पष्टीकरण करताना त्याने आपल्या Principles of Psychology या पुस्तकात असे म्हटले आहे की आपण भावनाचे स्वतत्र अस्तित्व मान्य केले व भावना उद्दीप्त झाल्यावर घडणाऱ्या शारीरिक क्रिया-विक्रिया भावनातून वेगळ्या काढल्या तर स्वतंत्र अशी काही मनोवस्था शिल्लकच रहात नाही.

* Emotion is simply organic sensation and nothing else.

चार्लस् डार्विन्‌चा भावनाविषयक ग्रन्थ १८७२ साली प्रकाशित झाला चेहऱ्याचे बदल व शारीरिक हालचाली याचा मागोवा काढण्याचा प्रयत्न केल्यास आपणास असे आढळेल की, त्याच्या मुळाशी एकाकाळी उपयुक्त झालेली अशी एखादी सहचरित क्रिया असते समाजाच्या बाल्यावस्थेत मनुष्य पशूसारखाच नखाच्या साहाय्याने दुसऱ्याशी लढे तोडानेहि चावे घेई राग आला म्हणजे आपण दातओठ चावतो, हात पिरगळतो, ही वरील क्रियाची अवशिष्ट लक्षणे होत या बाबतीत सामाजिक परपरा विलक्षण परिणाम-कारक ठरते आपले हात बाधले जावे म्हणून जित व्यक्ति जेत्यासमोर हात उभारी, त्यातूनच हात जोडून नमस्कार करण्याची पद्धति आली अनेक प्रयोग करून डार्विन्‌ने वरील प्रकारचे सिद्धान्त माडले आहेत

इ स १८८५ त सी लँग् यानेहि अशाच तऱ्हेची भावनाविषयक उपपत्ति प्रसिद्ध केली भावना कशा निर्माण होतात, याचे स्पष्टीकरण आपण सामान्यत दोन तऱ्हानी करतो (१) बाह्य वस्तु किवा व्यक्ति याच्या-मुळे भावना निर्माण होते व (२) शारीरिक फेरफारामुळेहि भावना निर्माण होते पण लँग्‌च्या दृष्टीने भावनाविषयक उपपत्तीचे हे प्रकार चुकीचे आहेत तो म्हणतो, " शरीरनिर्मित भावना व मनोनिर्मित भावना या भेदाला काही अर्थच नाही " *

अशा रीतीने जेम्स् व लँग् या दोघाचेहि भावनाविषयक स्पष्टीकरणा-बाबत एकमत आहे पण हा सिद्धान्त सामान्य विचारसरणीला पूर्णपणे पटण्यासारखा नाही जेम्स् व लँग् याची विचारसरणी खोडून काढण्यासाठी खालील मुद्दे देता येतील

१ शारीरिक हावभाव हा भावनादर्शनाचा एक महत्त्वाचा भाग आहे याचा अर्थ शारीरिक हावभावापलीकडे भावनेला काही अस्तित्वच नाही असा नव्हे उदाहरणार्थ, **अ** नेहमी **ब**च्या बरोबर असतो याचा अर्थ **अ** व **ब** हे एकच आहेत, असा करता येणार नाही अथवा **अ** व **ब** हे समान आहेत असाहि होणार नाही प्रत्यक्ष अनुभवात आपणास असे दिसून येते की,

---

* The distinction between physically aroused and mentally aroused ( emotions ) is meaningless.

भावनादर्शक शारीरिक हावभाव मनुष्य प्रयत्नाने दाबू शकतो. याचा अर्थ त्याला भावनाच नाहीत असा करता येत नाही रडू आले नाही म्हणजे दु:खच झाले नाही असे म्हणता येणार नाही चवताळून उठून मनुष्य मारावयास धावला नाही म्हणजे त्याला रागच आला नाही असे म्हणणे चुकीचे होईल

२ शेरिग्टन् या शरीरव्यापारशास्त्रज्ञाने कुत्र्याच्या शरीरातील मेंदूकडे वेदना नेऊन पोचविणारे सर्व ज्ञानतंतु काढून टाकले तरीसुद्धा भावना निर्माण होऊ शकतात असे त्यास आढळून आले

३ भावनांचे परभृतत्व (Parasitical Character) जेम्स्-लॅग् सिद्धान्ताच्या आधाराने स्पष्ट करता येत नाही भावना निर्माण होण्यास काही इच्छा-आकांक्षांचे अस्तित्व गृहीत धरावे लागते. शारीरिक फेरफार होण्यास अशा तऱ्हेच्या इच्छा वा आकांक्षांचे अस्तित्व गृहीत धरण्याचे काही कारण नाही

४ पुष्कळ वेळा विकार उत्पन्न होण्यास काही विशिष्ट कारण असावे लागते उदाहरणार्थ, रागवावयाचे झाल्यास त्या रागाचा विषय म्हणून एखादी वस्तु अगर व्यक्ति असावी लागते दु.ख होण्यास कारणीभूत अशी एखादी घटना मान्य करावी लागते भीति ही भावना निर्माण होण्यासहि कोणत्यातरी विषयाचे अस्तित्व गृहीत धरावेच लागते

जेम्स्-लॅग् सिद्धान्तासबधी येवढेच म्हणता येईल की ज्यावेळी औषधाने किंवा शारीरिक अस्वास्थ्याने भाव निर्माण होतो तेव्हाच त्याचे स्पष्टीकरण लागू पडते.

भावना शोधून काढण्याच्या बाबतीतील प्रयोग इतक्या कोटीला येऊन पोचले आहेत की माणूस बोलतो ते खरे की खोटें हे दाखविणारी सुद्धा यंत्रे तयार झाली गुन्हेगार शोधून काढण्यासाठी या यंत्राचा उपयोग होऊं लागला. पण या यंत्रावर सर्वस्वी अवलंबून राहता येत नाही असेहि अनुभवास आले आहे व्यापारी पेढ्याकडून या यंत्राचा उपयोग केला जातो. कीलर्‌ने एका प्रयोगाचे वर्णन केले आहे. एका पेढीवरील नोकराची भावनामापक यंत्राच्या साहाय्याने परीक्षा घेण्यात आली. बहुतेकांनी चोरीचा आरोप

कबूल केला. ही चोरी फार मोठ्या रकमेची नव्हती. लहानसहान वस्तूची उचलेगिरी होती. तिकिटें, पेन्सिली, कागद वगैरे किरकोळ गोष्टी बहुनेकानी लाबविलेल्या होत्या. ज्याच्या बाबतीत चोरी सिद्ध झाली त्याना शिक्षा वगैरे काहीहि केले नाही. एक वर्षानंतर परत अशाच तऱ्हेची परीक्षा घेण्यात आली तीत शेकडा दोन किंवा तीन इतकेच गुन्हेगार निघाले. त्यांना कामावरून काढून टाकण्यात आले

भावनाची उपपत्ति लावताना जरी अनेक मतमतातरे दिसून आलीं तरी त्याच्या महत्त्वाबद्दल अगर परिणामाबद्दल कोणीहि साशक नाही. मानवी जीवनाला तर भावनामुळेच एक प्रकारची लज्जत आली आहे. भावना मुळीच नसत्या तर जीवितात एक प्रकारचा 'तोचतोचपणा' आला असता आणि जीवित कटाळवाणे वाटले असते. सत्तात्मक भावनेच्या जोरावर आपण वाटेल ते कार्य करण्यास तयार होतो आजपर्यंत ज्या ज्या महत्त्वाच्या व क्रान्तिकारक घटना जगाच्या इतिहासात नमूद झाल्या आहेत त्याच्या मुळाशी भावनाचाच अभिनिवेश आहे मात्र अतिरेक हा कोणत्याहि बाबतीत वाईटच. भावनाचा अतिरेक हा तितकाच हानिकारक ठरेल. वर्तनवादी दृष्टिकोनाने विचार केल्यास असे दिसून येते की भावनाच्या अतिरेकाचे वेळी शरीरातील विशिष्ट ग्रथीतून फार मोठ्या प्रमाणावर स्राव होतो, व ह्यामुळे काही व्याधि उद्‌भवतात. कित्येकदा काही माणसें अशा स्रावामुळे कायमची अधू झाल्याचे दिसून आले आहे. भावनाविष्काराच्या अतिरेकाप्रमाणे भावनाचे अतिनियत्रण हेहि धोक्याचे आहे. बळजबरीने भावना दाबून अगर मारून टाकल्याने विपरीत परिणाम होतात. भावनाचे उदात्तीकरण हेच खरेखुरे मानवी जीवनाचे साफल्य होय. आज उपलब्ध असलेल्या सर्व शास्त्रीय शोधाच्या मुळाशी जिज्ञासाप्रवृत्तीचे उदात्त स्वरूपच आपणांस दिसून येईल क्रिकेटसारख्या सामुदायिक खेळात युद्धविषयक सर्व शब्दाचा आपण वापर करतोच ना ? मूळच्या युद्धप्रवृत्तीचें सात्त्विक समाधान खेळाने होत नाही का ?

---

प्रकरण ६ वें

# स्थिरभाव ( Sentiments )



एखाद्या वस्तूबद्दल अगर व्यक्तीबद्दल वेळोवेळी अनुभवलेल्या भावना एकत्रित होऊन एक स्थिरभाव तयार होतो उदाहरणार्थ, (१) एखाद्या शिक्षकाच्या प्रथम परिचयाचे वेळीच **भीति** उत्पन्न होते. शिक्षक फारच कडक व सहानुभूतिशून्य आहे असा अनुभव आल्यानंतर हळहळ भीतीतून **सुडाची** भावना निर्माण होते **राग** येतो **वीट** येतो या सर्व भावना त्या शिक्षका-भोवती एकत्र होऊन **द्वेष** हा स्थिरभाव तयार होतो (२) एखाद्या व्यक्तीच्या प्रथम परिचयातच तिच्याविषयी **चांगलें मत** होते परिचयानंतर त्या व्यक्तीने वेळोवेळी केलेल्या मदतीमुळे तिजविषयी **कृतज्ञता** वाटू लागते तीतूनच तिच्यासाठी कोणताहि **त्याग** करण्याची प्रवृत्ति निर्माण होते व्यक्ति संकटात सापडलेली पाहून **काळजी** वाटते तिच्या सुयशाने **आनंद** होतो. अशा तऱ्हेने कृतज्ञता, त्याग, काळजी, आनंद वगैरे भावना त्या व्यक्तीच्या कल्पनेभोवती कायमच्या एकत्र होऊन या एकत्रीकरणातून **आदर** हा स्थिर-भाव तयार होतो स्थिरभावाचे स्वरूप वर्णन करावयाचे झाल्यास आपणास असे म्हणता येईल की एखाद्या वस्तूविषयी अगर व्यक्तीविषयी वाटणाऱ्या निरनिराळ्या भावनांचे एकत्रीकरण होऊन तिजविषयी एक जो सामान्य भाव मनात कायम होतो त्यास **स्थिरभाव** असे संबोधिता येईल स्थिरभाव म्हणजे प्रत्यक्ष विशिष्ट अनुभव नव्हे तर अनुभवाने तयार झालेली मानसिक ठेवण (Mind-set)

भावना ही सर्व वातावरणातून निर्माण होते स्थिरभाव मात्र विशिष्ट व्यक्तीभोवती किंवा वस्तूभोवतीच केन्द्रित झालेला असतो स्थिरभावाची घडण अगदी सावकाश होत असते व एकदा अशा तऱ्हेने तयार झालेला स्थिर-

भाव सहसा बदलत नाही एखाद्या व्यक्तीत कोणकोणते स्थिरभाव आहेत, हे समजले म्हणजे तो मनुष्य एखाद्या विशिष्ट प्रसगी कसा वागेल याचा सहज अदाज करता येतो रस्किन्‌ने असे म्हटले आहे की, तुमच्या आवडीनिवडी मला सागा म्हणजे तुम्ही कोणत्या तऱ्हेचे माणूस आहात हे मी साग शकेन!

स्थिरभावाची यादी जरी तरीच मोठी असली (प्रेम, तिरस्कार, आदर, मैत्री वगैरे) तरी स्वत विषयीचा स्थिरभाव हाच सर्व स्थिरभावाचा मुकुटमणी आहे असे म्हणता येईल आत्मत्वाविषयीचा जो स्थिरभाव प्रत्येक व्यक्तीत वसत असतो तो फार महत्त्वाचा आहे या स्थिरभावाच्या घडणीला अगदी लहानपणापासूनच सुरवात होते मूल साधारण दीड ते दोन वर्षांचे झाले म्हणजे त्याच्या नावाशी त्याचा पक्का परिचय होतो कोणत्याहि वस्तूवर मूल साधारण याच वयापासून सत्ता दाखवू लागते "हे माझे आहे", "ते माझे आहे" ही त्याची भावना दिवसेदिवस वाढीस लागते मुलाचा आत्मभाव जास्तीतजास्त खूप ठेवतील अशीच मडळी त्यास प्रिय होतात हळहळू या "मी" च्या आवडीनिवडी स्थिर होत जातात भावनानाहि निश्चित स्वरूप येत जाते शतकानुशतके चालत आलेल्या नीति-अनीतीच्या, धर्म-अधर्माच्या, स्वकीय-परकीयाच्या सर्व कल्पनाचे सकलन होऊन एक विकसित स्वत्व तयार होते आपापल्याचा दृष्टिकोन तयार होतो मते पक्की होतात. अशा रीतीने 'मी' या सर्वनामाला जास्तजास्त व्यापक अर्थ येत जातो; व 'अस्मिता' निर्माण होते.

'स्व' त्वात पुष्कळ गोष्टीचा समावेश केला जातो माझा देश, माझे कुटुब, माझी शाळा, माझे कॉलेज, माझा गाव, माझा धदा वगैरे वगैरे. किबहुना सर्व जीविताविषयीचा दृष्टिकोन या स्वत्वात सामावलेला असल्याने स्वत्वा-विषयीचा स्थिरभाव हा इतर सर्व स्थिरभावाहून फार महत्त्वाचा असा मानला गेला आहे

**नैतिक स्थिरभाव** (Moral Sentiment) —सर्वसामान्य माणसाच्या मनोव्यापाराचा अभ्यास केल्यास असें दिसून येते की प्रत्येक व्यक्तीच्या मनात 'चागले' व 'वाईट' अशा अर्थाच्या कल्पना असतातच. अमुक एक विशिष्ट कृति चागली की वाईट यासंबंधी निरनिराळ्या जातींतल्या

लोकाच्या व निरनिराळ्या देशातल्या लोकाच्या कल्पना परस्परविरुद्ध असू शकतील; पण ' चागले ' व ' वाईट ' या सबंधीच्या सामान्य कल्पना सर्वच माणसात असतात. थाऊलेस्ने नैतिक व अनैतिक या कल्पनाचे स्पष्टीकरण असे केले आहे की जे चागले व कधीहि न टाळता येण्याजोगे विचार व आचार याना ' नैतिक ' अशी सज्ञा दिली जाते, उलट जे वाईट व नेहमी टाळलेच पाहिजे अशा तऱ्हेचे आचार व विचार याना ' अनैतिक मानण्यात येते.

मनुष्याच्या मानसिक विकासात नैतिक स्थिरभावाचे महत्त्व फार आहे. सत्य व न्याय याची आवड, निर्दयपणा व अप्रामाणिकपणा याजविषयी चीड, अशा निरनिराळ्या भावना मिळूनच आपले ' नीतिविषयक' स्थिरभाव तयार होतात.

नैतिक स्थिरभावाची घडण करण्यास कोणकोणत्या गोष्टी कारणीभूत होतात याचा विचार करू लागल्यास असे दिसून येते की बऱ्याचशा नीतिविषयक कल्पनाचा वारसा एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे आपोआपच येत असतो आपले पूर्वज ज्या ज्या गोष्टी अनैतिक मानीत आले त्याच आपणहि अनैतिक मानतो फक्त काही असामान्य व्यक्ति सोडल्यास सर्वसामान्य मनुष्याचे नैतिक स्थिरभाव समाजातील परपरागत कल्पनाच्या अनुकरणानेच तयार होत असतात.

ज्या व्यक्तीबद्दल आपल्याला नितात आदर आहे त्या व्यक्तीच्या नैतिक कल्पनाचे अनुकरण आपण फार मोठ्या प्रमाणात करीत असतो. वाङ्मय व कला या दोन गोष्टीहि नैतिक स्थिरभावाच्या घडणीला बरीच मदत करीत असतात

नैतिक स्थिरभावाचे आणखी एक वैशिष्टय असें की ते द्विकेंद्रित असतात. याचा अर्थ असा की वरवर परस्परविरुद्ध दिसणारे दोन नैतिक स्थिरभाव एकाच वेळी पक्व होत असतात. उदा., (१) देशावर प्रेम करावयास शिकत असतांनाच आपण देशाच्या शत्रूचा द्वेष करावयास शिकतो. (२) न्यायाच्या आवडीबरोबरच अन्यायाबद्दलची चीड वाढत असते. (३) दयाळूपणाबद्दलची आवड वाढत असतानाच निर्दय कृतीबद्दल नावड वाढत असते.

मनुष्याने नीतितत्त्वांचीं बंधने ओलांडू नयेत म्हणून समाज निरनिराळे उपाय योजीत असतो व ते फारच परिणामकारक असतात. त्यामुळे मनुष्य

सहसा अनैतिक वर्तन करण्यास धजत नाही. एखाद्या इसमाने पर-धर्मीय मुलीशी लग्न करणे समाजास 'पसत' नसल्यास व त्या मनुष्याने हट्टाने तसे लग्न केल्यास समाज त्याचे सर्व सबध तोडून टाकतो समाजाच्या सहकार्याखेरीज व्यक्तीला जीवन जगणे अत्यत कठीण असल्यामुळे व्यक्ति सहसा सामाजिक इच्छेविरुद्ध जात नाही त्याचप्रमाणे 'स्तुति' हे सुद्धा व्यक्तींना नैतिक मार्गावर ठेवण्यास फार मोठे साधन असते. प्रामाणिक-पणाबद्दल लोक आपल्याला वाखाणतात, हे समजून आल्यावर प्रामाणिकपणा काटेकोर पाळण्याची मनुष्य आपोआपच अधिक दक्षता घेतो

नैतिक स्थिरभावाबाबत आणखी एक मुद्दा विचारात घेणे जरूर आहे. मुलाच्या बाल्यावस्थेत नैतिक व अनैतिक या सबधीच्या कल्पना फारच पुसट असतात व व्यक्तिमत्त्वाची पूर्ण वाढ झाल्यावरच हे स्थिरभाव मनात पक्व होऊ लागतात. असे असूनहि हे स्थिरभाव सर्व सवयी, सहज-प्रवृत्ति व भावना याना ताब्यात ठेवू शकतात व सर्व आयुष्याचा दृष्टिकोन निश्चित करू शकतात हे कसे ? या प्रश्नाचे उत्तर देण्याचा आतापर्यंत बऱ्याच जणानी प्रयत्न केला आहे.

(१) प्लेटो व इतर काही नीतिशास्त्रज्ञ याच्या मते दैवी बुद्धि (Divine Reason) या नावाची एक आध्यात्मिक शक्ति आपल्यात उपजतच असते व ती सर्व प्रवृत्तीवर ताबा चालवू शकते

(२) काहीचे म्हणणे असे की मृत्यूनतर मिळणाऱ्या स्वर्गाच्या आशेने व नरकाच्या भीतीने माणसे अनैतिक वर्तन करण्यास धजत नाहीत

(३) शॅफ्ट्सबरीच्या मते आपणात सदभिरुचि ही उपजतच असते व म्हणून आपण नैतिक कल्पना सोडण्यास सहजासहजी तयार होत नाही.

(४) बिशप् बट्लर्च्या मते दैवी बुद्धीचा अर्थ सदसद्विवेकबुद्धि (Conscience) असा लावावा. ह्या बुद्धीतूनच सर्व नैतिक कल्पनाचा उगम होत असल्याने ती सर्व शक्तिमान् असते.

(५) अॅडम् स्मिथ्च्या मते प्रत्येक व्यक्तीच्या हृदयात त्याच्या कृतीचे मूल्यमापन निरपेक्षबुद्धीने करणारा एक निःपक्षपाती द्रष्टा आहे. (The

Impartial Spectator within the breast ) व याच्या भीतीनेच आपण नैतिक मार्गास चिकटून राहतो.

(६) मॅग्डूगल्ने आपल्या Social Psychology या पुस्तकात या प्रश्नाचे जे उत्तर दिले आहे ते बरेच समाधानकारक वाटते. तो म्हणतो सामाजिक कल्पनाचा पगडा व स्वत्वाबद्दलचा स्वाभिमान या दोहोतून नीतिविषयक स्थिरभावाचा उदय होतो. व आत्मत्वाच्या भावनेला कमीपणा येईल अशी कोणतीहि गोष्ट करण्यास मनुष्य सहसा तयार होत नाही

सर्वसामान्य मनुष्य समाजाच्या निंदेला घाबरून समाजाने पिढ्यान्-पिढ्या घालून दिलेले नीतिनियम मुकाट्याने पाळतो पण ज्याचा स्वत.-वरील विश्वास अमर्याद असतो तो वेळेनुसार सर्व समाजाला धिक्कारून स्वत ला पटणारी नीतितत्त्वे प्रस्थापित करतो

**धर्मविषयक स्थिरभावांच्या** घडणीविषयी विचार केल्यासहि असेच दिसून येते की समाजाने दाखवून दिलेला धर्म सामान्य मनुष्य शकाकुशका न काढता पाळीत असतो फक्त ज्याचे आत्मिक बळ असामान्य असेल तोच स्वत:चा धर्म स्वत निर्माण करू शकतो इतकेच नव्हे तर हजारो लोक त्याच्या धर्मकल्पना प्रमाण मानू लागतात (उदा बुद्ध, येशू ख्रिस्त)



## प्रकरण ७ वें

# नैसर्गिक सामाजिक वृत्ति



विकासश्रेणीतील निरनिराळ्या पातळीवरच्या प्राण्यात दिसून येणाऱ्या **सहजप्रवृत्ति** व त्याच्या समवेत प्रकट होणाऱ्या भावना याच्याबद्दलची चर्चा आपण मागील दोन प्रकरणात केली आता संघप्रिय प्रवृत्तीच्या प्राण्यात ज्या आणखी काही विशिष्ट प्रवृत्ति दिसून येतात त्याची ओळख या प्रकरणांत करून घ्यावयाची आहे आतापर्यंत ज्या सहजप्रवृत्तीचा अभ्यास आपण केला त्याना एकप्रकारचे व्यक्तिगत स्वरूप आहे म्हणजे गटातील कोणत्याहि एका प्राण्याच्या कृतीत त्या स्वतंत्रपणे प्रतीत होताना दिसतात पण काही नैसर्गिक वृत्ति अशा असतात की त्याचे अस्तित्व दिसून येण्यास गटातील अगर जातीतील कमीतकमी दोन व्यक्ति तरी एकत्र असाव्या लागतात मनुष्य हा इतर काही प्राणि-जातीप्रमाणेच समाजप्रिय प्राणी आहे इतकेच नव्हे तर समाजाखेरीज त्याला जगणेच अशक्य आहे मनुष्याचा पुष्कळसा विकास त्याच्या सामाजिक जीवनावरच अवलंबून असतो या विकासास मदत करणाऱ्या काही वृत्ति त्याच्यात निसर्गतःच असलेल्या दिसून येतात या वृत्ति मुख्यत तीन आहेत—

(१) सूचनात्मक वृत्ति (Suggestion)
(२) सहानुभवन वृत्ति (Sympathy)
(३) अनुकरण वृत्ति (Imitation)

वरीलपैकी प्रत्येक वृत्तीचा स्वतंत्र व अधिक विचार करणे जरुरीचे आहे

**सूचनात्मक वृत्ति** —मनुष्याच्या सूचनात्मक वृत्तीकडे मानस-शास्त्रज्ञाचे लक्ष प्रथम वेधण्याचे कारण म्हणजे मोहनिद्रेसंबंधीचे (Hyp-

notism) प्रयोग हे होय. काही एका विशिष्ट कमकुवत अशा मनाच्या अवस्थेत मनुष्य दुसऱ्याने सांगितलेल्या प्रत्येक गोष्टीवर विश्वास ठेवतो. त्याची प्रत्येक आज्ञा शिरसामान्य करतो व पराकोटीचे मानसिक पारतंत्र्य प्रकट करतो. यालाच सूचनात्मक वृत्ति असे म्हणतात.

सूचना करणारा जो मनुष्य असतो तो ती इतक्या जोरदार रीतीने करतो की ऐकणारा त्यावर लगेच संपूर्ण विश्वास ठेवतो त्या सूचनेसंबंधीची तर्कशास्त्रदृष्टया शक्यता किंवा अशक्यता, असंबद्धता वगैरे विचारात घेण्याची त्यास जरूरच भासत नाही सूचनात्मक वृत्तीनुसार आपण सर्वसामान्य माणसे कितीतरी प्रसंगी वागतो उदाहरणार्थ दारावर आलेल्या बहुरूप्याच्या भविष्यकथनावर भोळ्याबापड्या कित्येक बायका विश्वास ठेवतात. भुताखेताच्या गोष्टी जर एकाद्याने खूप खात्रीच्या आवाजात व रंगवून सांगितल्या तर त्यावर आपणास विश्वास ठेवावा असे वाटू लागते स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, ख्रिश्चन धर्मातील Doom's day ची कल्पना या सर्वांवर जेव्हा सामान्य माणसे विश्वास ठेवतात, तेव्हा त्यांच्या शक्याशक्यतेचा तर्कशास्त्रदृष्टया मुळीच विचार केला जात नाही काही असामान्य व्यक्तींचे व्यक्तिमत्त्वच इतके दांडगे व प्रभावी असते की त्यांच्या तोंडून कोणताहि शब्द बाहेर पडला तरी आपण त्यावर लगेच विश्वास ठेवतो मोठ्या माणसापेक्षा लहान मुले **सूचनाग्रहण** फार लवकर करतात. बागुलबुवाची भीति दाखविल्यास मूल भिते याचे कारण त्याची सूचनाग्रहणवृत्तिच होय.

एखाद्या माणसात सूचनाग्रहण करण्याची वृत्ति किती प्रमाणात असेल हे त्याच्या मानसिक शक्तीवर अवलंबून आहे जितका मनुष्य मनाने अधिक कमकुवत, तितकी त्याची सूचनाग्राहकता अधिक. एकाच माणसाची सूचना-ग्रहणशक्ति सर्वकाळी सारखी नसते. शिक्षणाचा सूचनाग्राहकतेवर बराच परिणाम होतो जसजसे शास्त्रीय ज्ञान वाढत जाईल तसतसे कोणत्याहि घटनेच्या कार्यकारणभावासंबंधीचे ज्ञानहि वाढत जाते व त्यामुळे सूचनाग्राहकत्वहि आपोआप कमी होते

कोणतीहि व्यक्ति सूचनाग्रहण करील की नाही व केल्यास किती प्रमाणात करील या गोष्टी मुख्यत चार तत्त्वांवर अवलंबून असतात.

(१) अपरिमित थकव्याने मेंदू कार्य करण्यास असमर्थ होणे, मोहनावस्था (Hypnosis), उन्माद (Hysteria) वगैरे परिस्थितीत मनुष्याची सामान्य तर्कबुद्धि व विचारशक्ति कामच करीत नाही व त्यामुळे एखाद्या असहाय माणसाप्रमाणे तो मनुष्य दुसऱ्याने हवे ते सागितले तरी विश्वास ठेवतो व दुसऱ्याने करावयास सागितलेली कोणतीहि कृति करतो

(२) ज्ञानाची उणीव—कोणत्याहि गोष्टीविषयी मपूर्ण शास्त्रीय ज्ञान नसले म्हणजे दुसऱ्याने सागितलेल्या गोष्टीवर चटकन् विश्वास बसतो

(३) सूचना देणाऱ्याचे प्रभावी व्यक्तिमत्त्व —सूचना देणाऱ्याचे मानसिक सामर्थ्य, सामाजिक दर्जा, व्यक्तिमत्त्व व ज्ञान जितके अधिक तितका तो सूचना जास्त यशस्वी रीतीने देऊ शकतो

(४) सूचनाग्रहण करणाऱ्याचा नैसर्गिक कल —(Native disposition of the Subject) काही माणसे निसर्गत च कमकुवत मनाची व दुर्बल असतात, कितीहि शास्त्रीय ज्ञान मिळविले तरी त्याची सूचनाग्राहकता कमीच होत नाही अशी माणसे व्यवहारात फार भित्री ठरतात आत्मविश्वास कमी असल्याने मोठमोठी जबाबदारीची कार्ये त्याच्या हातून कधीच पार पडणे शक्य नसते व नित्याच्या व्यवहारातहि ती मूर्ख व बावळटच ठरतात

## सूचनावृत्तीचे प्रकार

(१) **स्वयसूचना** (Auto-suggestion) —काही माणसे दुसऱ्याने दिलेल्या सूचना चटकन् मानीत नाहीत, पण स्वत कडून मिळालेली सूचना मात्र ताबडतोब मानतात "अमुक एक गोष्ट तू का केलीस ?" असा प्रश्न विचारल्यास "मनाने तशी निश्चित सूचना दिली म्हणून केली" असे उत्तर ज्याच्याकडून मिळते. त्याच्यात दाडगी आत्मप्रेरणा असते असे समजावे. महात्मा गाधींचा "आतला आवाज" म्हणजे सपूर्ण विकसित अशी आत्मप्रेरणाच होय

(६) **विरुद्धसूचना** (Contra-suggestion) —काही मुलात विरुद्ध सूचना फार परिणामकारक झालेली दिसून येते. जशी सूचना आपण त्यास देऊं त्याच्या अगदी विरुद्ध क्रिया करण्याची त्याची प्रवृत्ति असते

म्हणून त्याच्याकडून इष्ट कृति घडवून आणण्यासाठी त्याना उलट सूचना द्यावी लागते त्यानी पूर्वेस जावे अशी आपली इच्छा असल्यास त्यास "पश्चिमेस जा" असे सागावे लागते मोठेपणी समजूतदारपणा आल्यावर ही प्रवृत्ति कमी होते

(३) **प्रतिष्ठागत सूचना** ( Prestige-suggestion ) —ज्याचे व्यक्तिमत्त्व व सामाजिक दर्जा मोठा आहे त्याबद्दल सामान्य माणसाच्या मनात इतका दरारा असतो की त्याची सूचना तो लगेच मान्य करतो

सूचना यशस्वी होण्यास तीन गोष्टीची जरुरी असते (१) पुनरावृत्ति ( Frequent repetition ) (२) सूचना देणाऱ्याचा आत्मविश्वास (Confident tone or voice of the suggestor. (३) सूचना देणाऱ्याचे समाजात स्थान व वजन ( The position or prestige of the person suggesting ).

स्वत च्या समाजाकडून आलेल्या सूचना मनुष्य फार लवकर ग्रहण करतो उदाहरणार्थ, सामाजिक रूढी व चालीरीतीवर विश्वास सामान्य माणसाची राजकीय, धार्मिक वगैरे मते त्याच्या आवडत्या पुढाऱ्याच्या-सारखीच असतात स्वत विचार करून बनविलेली नसतात

**सहानुभवन** (Sympathy) —ज्या ज्या जीव-जाति सघप्रिय आहेत, त्याच्यात सहानुभवाची प्रवृत्ति स्पष्टपणे दिसून येते दुसऱ्यामध्ये जे विकार उत्पन्न झाले असतील तेच आपल्या मनात होणे म्हणजे सहानुभवन एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीच्या दु खाने दु खित होणे व दुसऱ्याच्या आनदाने आनदित होणे हा समाज-जीवनातील एक फार मोठा महत्त्वाचा भाग आहे. सर्व माणसात सहानुभूतीचे प्रमाण सारखेच असेल असे नाही एखादा इसम दुसऱ्याचे दु.ख पाहून रडेल एखाद्याला थोडेसेच वाईट वाटेल. एखादा वरवर तोंडदेखली सहानुभूति दाखवील, तर एखादा दुसऱ्याच्या दु.खात आसुरी आनद मानण्याइतका राक्षसी वृत्तीचा असेल

लहान मुलात सहानुभूति उपजतच असते एक मूल रडू लागले की इतरहि रडू लागतात. एक मूल आनदाने टाळ्या वाजवून नाचू लागले की इतरहि मुले तशाच तऱ्हेने आनंद व्यक्त करतात. उत्तम शिक्षकाला

मुलाच्या या प्रवृत्तीचा फार चागला उपयोग करून घेता येतो मुलामध्ये गरीबाबद्दल, आंधळ्या-पागळ्याबद्दल, म्हाताऱ्याबद्दल व सकटग्रस्ताबद्दल सहानुभूति जागृत करता येते व यातूनच नि स्वार्थबुद्धि व परोपकार हे गुण वाढीस लागतात

जिज्ञासा व भीति याबाबत सहानुभूतीचा प्रभाव ताबडतोब दिसून येतो एखाद्या ठिकाणी आग लागली की स्वयस्फूर्तीने माणसे तिकडे धावतात एकाच जातीच्या किंवा एकाच धर्माच्या लोकामध्ये सहानुभूति बऱ्याच प्रमाणात असलेली दिसते

**अनुकरणवृत्ति** ( Imitation) :—सामाजिक जीवनाच्या दृष्टीने अनुकरणवृत्तीचे महत्त्व फार आहे मुलाच्या शिक्षणाचा तीनचतुर्थांश भाग अनुकरणानेच पुरा होत असतो बोलणे, चालणे, हसणे, खेळणे, बसणे वगैरे क्रिया घरातील मोठ्या मडळीच्या अनुकरणानेच मूल करीत असते मुलाच्या आवडी-निवडी स्वच्छतेच्या व इतर सवयी, ध्येये वगैरे सर्व गोष्टी आजूबाजूच्या माणसाच्या आवडी-निवडीवर सवयीवर व ध्येयावरच आधारलेल्या असतात म्हणून मुलाना इष्ट वळण लावावे असे वाटत असल्यास मोठ्या माणसानी त्याच्यासमोर फार जपून व काळजीपूर्वकच वागले पाहिजे तुम्ही ओरडूनच नेहमी बोलत असाल तर तुमच्या घरातील लहान मुले तसेच ओरडून बोलतील तुमच्या तोंडात अचकटविचकट शिव्या असतील, तर त्यांचे ऐकून मुलेहि तशाच शिव्या देऊ लागतील बाप डॉक्टर असेल तर मुलगा स्टेथॅस्कोप वगैरे घेऊन दवाखान्याचे खेळ खेळेल समुद्रकाठावरील नावाड्याच्या मुलाचे खेळ, शहरी मुलाचे खेळ, शेतकरी लोकाच्या मुलाचे खेळ हे नेहमी बापाच्या धंद्याच्या अनुकरणावरच आधारलेले असतात मुले वागतात ती आपण वागतो त्याप्रमाणे आपण सागतो त्याप्रमाणे नव्हे मुलाच्या विचारात, कल्पनात व कृतीत पुष्कळसा भाग समाजाच्या अनुकरणाचाच असतो त्याचप्रमाणे रूढी, नीतिकल्पना, स्वदेशाविषयीच्या कल्पना, याबाबतहि मुले मोठ्याचेच अनुकरण करतात ज्या व्यक्तीबद्दल आदर वाटेल तिच्या कृतीचे अनुकरण आपण नकळतच करतो म्हणून चागलाच आदर्श नेहमी मुलापुढे ठेवल्यास ती त्याचेच अनुकरण करतील. समाजाची प्रगति किंवा अधोगति अनुकरणामुळेच होते उदा पाश्चात्याच्या

अनुकरणाने हिंदू समाजाचे झालेले फायदे व तोटे. जीवनाच्या विकासास आधारभूत अशा ज्या काही प्रवृत्ति आहेत त्यात अनुकरणवृत्तीचे स्थान फार मोठे आहे.

**पुनरावर्तनवृत्ति** ही सर्व अध्ययनाचा आधार आहे. सर्व प्रकारच्या क्रीडात व नृत्यासारख्या कलातून या वृत्तीमुळेच एक प्रकारचा आनद होतो. पुनरावृत्तीबरोबरच **तालबद्धता** निर्माण होते पाण्याच्या लहरी, वाऱ्याने हलणारी पाने, सूर्योदय, सूर्यास्त इत्यादि सृष्टिगत व्यवहारात पुनरावृत्ति व तालबद्धता दृग्गोचर झाल्याविना राहात नाही तालबद्धतेने कठीण कामहि सुकर होते शेतकऱ्याची, कामकऱ्याची गाणी किती उपयुक्त आहेत हे यावरून स्पष्ट होईल सगीत आणि नृत्य या कला तर परिपूर्ण तालबद्ध आहेत

सामान्यवृत्तीत **विधिनिष्ठेलाहि** एक प्रकारचे विशेष महत्त्व आहे. विधीचा मानसिक परिणाम जोरदार असतो केव्हा केव्हा प्रत्यक्ष विधीत काही अर्थ नसतो, कित्येकदा त्या विधीकडे कर्त्याचे लक्षहि नसते पण ही गोष्ट विधिपूर्वक झाली यातच त्याला समाधान मिळते. विधीचा सामाजिक परिणामहि उपयुक्त ठरतो



## प्रकरण ८ वें

# सहजप्रवृत्ति व आधुनिक शिक्षणपद्धति



निरनिराळ्या आधुनिक शिक्षणपद्धति कोणत्या आहेत, त्याचा विचार करण्यापूर्वी मुलाच्या कोणकोणत्या सहजप्रवृत्तीवर त्या पद्धति आधारलेल्या आहेत ते प्रथम पाहिले पाहिजे लहान मुलात खालील प्रवृत्ति बलवत्तर असलेल्या दिसून येतात

(१) **कृतिप्रेम** —आपल्या नित्याच्या अनुभवात नेहमीच आपणांस असे आढळते की मोठी माणसे ज्याप्रमाणे तासन्तास एका जागेवर स्वस्थ बसून राहतात त्याप्रमाणे लहान मुले पाच मिनिटेहि गप्प व स्थिर अशी एका जागी बसून रहात नाहीत. त्याच्या आवडत्या गोष्टीत उलगडून पाहणे, तोडणे, मोडणे, आपटणे, तोंडात घालून पहाणे, फेकून देणे वगैरे कृतीबद्दल विशेष प्रेम असलेले उघड दिसून येते सर्वसामान्य आईबाप या कृतिप्रेमास अवखळपणा, उच्छृंखलपणा, मस्ती, दांडगाई अशा सदरात घालून याबद्दल मुलावर वेळोवेळी खूप रागावतात व शिक्षाहि करतात. पण मुलात या गोष्टीची प्रवृत्ति उपजतच असते, अशी ज्या आईबापास कल्पना असते, ते मुलाकडे जास्त सहानुभूतीने पाहतात. पण नुसत्या सहानुभूतीच्या दृष्टीने मुलातील कृतिप्रेमाच्या प्रवृत्तीचे संपूर्ण चीज होत नाही. या कृतिप्रेमास जास्त पद्धतशीररीतीने मार्गदर्शन केल्यास मुलाचे निम्मेअधिक शिक्षण या प्रवृत्तीच्या साहाय्यानेच पुरे करून घेतां येईल. ही गोष्ट १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात हरबार्ट, पेस्टॅलोझी, फ्रॉएबेल वगैरे शिक्षणशास्त्रज्ञानी उघडकीस आणली व तेव्हापासूनच मुलाच्या सहजप्रवृत्तीवर आधारलेल्या अशा नवीन शिक्षणपद्धति उदयास येऊं लागल्या.

(२) **जिज्ञासा** —भडक रंगाच्या, चकचकणाऱ्या, आवाज करणाऱ्या अशा वस्तु मुलाचे लक्ष लवकर वेधून घेतात व त्या हातात पडल्यास आपल्या अल्पबुद्धीप्रमाणे मुले त्यासंबधी अधिक ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करीत राहतात त्याचप्रमाणे कित्येक पदार्थ पुढे आल्याबरोबर "हे काय आहे?" "ते काय आहे?" अशा तऱ्हेचे प्रश्न विचारून मुले मोठ्या माणसास सारखे सतावून सोडीत असतात त्याच्या या प्रश्नांना जर योग्य ती उत्तरे मोठ्या माणसांना देता आली तर मुलांना कितीतरी गोष्टींचे सामान्य ज्ञान लहान वयात आपोआप होईल पण बऱ्याच वेळा अज्ञानामुळे मोठ्या माणसांना लहान मुलांच्या प्रश्नास समर्पक उत्तरेच देता येत नाहीत व त्यामुळे मुलाच्या चौकसबुद्धीचा ऱ्हास होत जातो

(३) **संचयप्रवृत्ति** —ही प्रवृत्ति म्हणजे जिज्ञासाप्रवृत्तीचेच एक अंग आहे असे म्हटले तरी चालेल नानाप्रकारच्या शिंपल्या, पोस्टाची तिकिटे, गारगोट्या, पक्ष्यांची पिसे, निरनिराळ्या रंगाचे खडे वगैरे गोष्टी जमा करून ठेवण्याचे मुलांना वेडच असते त्याचप्रमाणे जरा मोठी झाल्यावर मुले चुटके, कविता, गद्य उतारे, सुभाषिते, इतिहासप्रसिद्ध पुरुषांची चित्रे वगैरे गोष्टींचा संग्रहहि मोठ्या हौसेने करतात या संग्रहप्रवृत्तीतूनच एखाद्या विषयाची आवड मुलांत निर्माण करता येणे शक्य असते त्या आवडीला योग्य मार्गदर्शन मिळाल्यास त्या विषयात मूल सहज हसत-खेळत प्रावीण्य संपादन करते कोणत्याहि वस्तूचा पद्धतशीर रीतीने संग्रह कसा करावा हेंहि एक शास्त्र आहे ते मुलांना समजावून देऊन त्यांच्या संग्रहांतील गोष्टींना व्यवस्थित स्वरूप आणून देणे हे मोठ्या माणसाचेच काम असते

(४) **स्तुतिप्रियता** —मुलाची स्तुति केली की ते खूष होते ही प्रवृत्ति मुलात अगदी लहानपणापासूनच दिसू लागते "आमचा बाबा किती शहाणा आहे!" येवढ्या एका वाक्याने मुलाकडून कितीतरी कामे आपणास करून घेता येतात "तू शहाणा आहेस ना? मग असे करू नये" अशा गोड शब्दांनी मुलांना कितीतरी अनिष्ट कृतीपासून परावृत्त करता येते जी स्तुति प्रमाणाबाहेर झाली असता मोठेपणी गर्व आणते व नाशास कारणीभूत होते, तीच स्तुति प्रमाणात केली असता लहानपणी

कोणतेहि काम करण्यास उत्तेजन येते बक्षिसासाठी धडपड करताना मुलाना त्रास वाटत नाही, उलट उत्साह वाटतो तो यामुळेच

(५) **भीति** —अनिष्ट गोष्टी मुलानी करू नयेत म्हणून त्याना आपण अधाराचे, बागुलबुवाचे, पापाचे अगर माराचे भय दाखवतो शरीराला दुखापत होईल म्हणून मुले प्रथम प्रथम या गोष्टीना फार भितात बक्षिसाप्रमाणे शिक्षेची भीतिहि पुष्कळ वेळा परिणामकारक होते यात शका नाही पण वयाच्या वाढीबरोबर वस्तूच्या खऱ्या स्वरूपाचे जसजसे यथार्थ ज्ञान होऊ लागते तसतशी मुलाची भीति कमी होऊ लागते भुताखेताच्या गोष्टी, बागुलबुवा, अक्राळविक्राळ स्वरूपे याची भीति मलास दाखविणे तात्पुरते जरी बरे वाटले तरी परिणामी वाईटच असते मोठेपणी फीटस् येणे, वेड लागणे, वगैरे गोष्टीचा सबध लहानपणच्या भीतीकडेच पोचतो असे मनोविश्लेषणशास्त्रज्ञाना आढळून आलेले आहे पिसाळलेले कुत्रे अगावर धाऊन येणे व चावणे, विहिरीत अगर नदीत पडणे आगगाड्याच्या टकरीसारखे भयकर देखावे प्रत्यक्ष डोळ्यासमोर घडणे, वगैरे लहानपणात घडलेल्या प्रसगाचे धागे तमासस्थेच्या कायमच्या विकृतीपर्यंत येऊन पोचतात असे पुष्कळ उदाहरणात दिसून येते मुलाना नैसर्गिकरीत्या ज्या गोष्टीचे भय वाटते त्याची कारणमीमासा व स्पष्टीकरण सागून त्याची भीति नाहीशी करण्याबाबत जपानचे उदाहरण कित्ता गिरविण्यासारखे आहे बक्षिसाच्या लालुचीने मुद्दाम अधारातून निरोप पोचवावयास लावणे, निर्जन प्रदेश, स्मशान, अशा ठिकाणाहून तेथे जाऊन आल्याची खूण पटविण्यासाठी एखादी वस्तु आणावयास लावणे, भयानक वस्तूचे सत्यस्वरूप दाखवून देऊन त्याच्याबद्दलची भीति नाहीशी करणे, विषारी प्राण्यापासून वाटणाऱ्या भीतीचे खरे कारण काय व त्यावर उपाय काय हे त्यास शिकवणे इत्यादि गोष्टीकडे जपानमध्ये मुद्दाम अधिक लक्ष देण्यात येते पूर्वी शाळामधून मुलाना शिस्त लागावी म्हणून क्रूर शिक्षाची भीति दाखविण्यात येई ज्याप्रमाणे समाज कितीहि सुसस्कृत झाला तरी पोलीस खाते, न्यायखाते व लष्कर याची जरूर नाहीशी होणार नाही त्याचप्रमाणे मुलाना वळण लावताना केव्हातरी चौदाव्या रत्नाचा मर्यादित उपयोग करावा लागतो; ही गोष्ट जरी खरी असली तरी शिक्षेच्या धाकाचा मुलाच्या मनावर कायमचा परिणाम होता कामा नये.

(६) **अनुकरण**.—यासबंधी विवेचन मागे आले आहे.

(७) **स्पर्धा व चढाओढ**.—कोणत्याहि स्थळी आपण इतरापेक्षा कमी आहोत असे वाटू नये म्हणून मनाची जी सतत धडपड सुरू असते तिलाच चढाओढ असे म्हणतात अशा ईर्षेनेच मुलाच्या हातून कितीतरी कार्ये यशस्वी रीतीने तडीस जातात चढाओढीची प्रवृत्ति नसल्यास अंगीकृत कार्यात जिवतपणाच वाटणार नाही एखाद्या निवडणुकीत विरुद्ध पक्षाचा उमेदवार उभाच राहिला नाही म्हणून बिनविरोध निवडून येणाऱ्यास निवडणुकीचा खरा आनंद मिळत नाही वर्गात हुशार मुले बरीच असली म्हणजे पहिला नबर मिळविण्यात विशेष मौज असते अशा रीतीने गुणाच्या विकासास चढाओढ ही उपजत प्रवृत्ति काही अंशी फारच उपयुक्त ठरते हे निश्चित. पण चुरशीतच कलहाचे बीज साठविलेले असते असे काही जणाचे म्हणणे आहे. त्याच्या मते लहानपणी मुलास चढाओढीस खप प्रोत्साहन दिल्यास पुढे कायमचे शत्रु निर्माण करण्यात त्याचा शेवट होतो पण चढाओढीबरोबरच खेळकर वृत्ति व विशाल समजस दृष्टिकोन मुलाच्या मनावर बिबवित गेल्यास चढाओढीचे दुष्परिणाम टाळता येतील लहान मुले जात्या मत्सरी नसतात तेव्हा चढाओढीचे उदात्त स्वरूपच नेहमी त्याच्या मनावर ठसवीत गेल्यास चागले परिणाम दिसणारच नाहीत असे म्हणणे दुराग्रहीपणाचे होईल. खेळात जर चढाओढ नसेल तर खेळात मजाच येणार नाही जग हे चढाओढीच्या प्रवृत्तीवरच आधारलेले असल्याने लहानपणी मुलाना या प्रवृत्तीपासून सर्वस्वी अलिप्त ठेवणे इष्टहि नाही व शक्यहि नाही.

(८) **मानीपणा**.—अनुकरण व चढाओढ याच्यापुढील पायरी म्हणजे मानीपणा ही प्रवृत्ति सर्व मुलात सारख्याच प्रमाणात असते असे नाही. काही मुले जन्मापासूनच फार मानी स्वभावाची असतात, तर काही मुले परावलबित्वातहि कमीपणा न मानता आनदात राहणारी असतात. पण पुढील आयुष्यातील सर्व कर्तृत्व या मानीपणावरच अवलबून असल्याने प्रथमपासूनच हा गुण वाढीस लावण्याची खबरदारी शिक्षकाने घेतली पाहिजे. लहानलहान गोष्टी दुसऱ्याची मदत न घेता करण्याची संवय मुलास लावीत गेल्याने ही प्रवृत्ति हळूहळू वाढते. या दृष्टीने हल्लीचे शिक्षण थोडेफार जनानी बनत चालले आहे असे वाटते. शिक्षणात मनोरजकता यावी म्हणून

प्राथमिक व दुय्यम शाळांतून साधनाचा व उपकरणाचा सुळसुळाट इतका झाला आहे की त्यामुळे शिक्षण म्हणजे थोडेफार तरी कष्ट करून साध्य करून घेण्याची एक कला आहे ही गोष्टच मुले विसरतात. त्यांच्यात धडपड करण्याची वृत्ति कमी होते.

वर वर्णन केलेल्या सर्व प्रवृत्तीचा एकमेकीशी फार जिव्हाळ्याचा सबध आहे ही गोष्ट केव्हाहि नजरेआड करता कामा नये. कृतिप्रेम जिज्ञासा उत्पन्न करते, जिज्ञासा सचयप्रवृत्तीला जन्म देते, मानीपणा व स्तुतिप्रियता याचाहि जवळचा सबध आहे. ममत्व भीति जागृत करते अनुकरण, चढाओढ, मानीपणा, महत्त्वाकाक्षा याचे संबध एकाच कुटुबातील नातेवाइकासारखे आहेत

## बालोद्यान पद्धति

आता या सहजप्रवृत्तीवर आधारलेल्या निरनिराळ्या आधुनिक शिक्षणपद्धतीचा थोडक्यात विचार करु

प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ फ्रॉयबेल याने मुलाच्या सहजप्रवृत्तीवर व विशेषत. मुलाच्या खेळकर प्रवृत्तीवर आधारलेली जी शिक्षणपद्धति लहान मुलाना शिक्षण देण्यासाठी शोधून काढली तिलाच बालोद्यान-पद्धति असें सबोधण्यांत येतें. या शिक्षण-पद्धतीच्या बुडाशी खालील तत्त्वें प्रामुख्याने असलेली दिसून येतात

(१) मुलाचे पुढील सर्व आयुष्य त्यांच्या अगदी बालपणातील शिक्षणावरच अवलंबून असते.

(२) मुलाच्या खऱ्याखुऱ्या शिक्षणास त्यांच्या तिसऱ्या वर्षापासूनच सुरवात होते.

(३) लहानपणापासूनच मुलाना एकत्र येऊन खेळण्याची व काम करण्याची सधि दिल्याखेरीज त्याच्यात सामाजिक जीवनास जरूर अशा गुणांचा विकास होत नाही.

वरील तीन तत्त्वांवर आधारलेली एक लहानशी शाळा फ्रॉयबेलने १८३७ साली काढली. यांतील नवीन उपक्रम म्हणजे मुलांचे खेळ, खेळणीं

व अभिनयगीते याच्या साह्याने मनोरंजनाबरोबरच निरनिराळ्या रेखीव कृतीना जरूर असणारा स्नायूंचा ताबा कसा मिळवावा याचे शिक्षण देणे या शाळेतील मुलाना लहान लहान देणग्या व बक्षिसे देऊन त्याच्यात उत्साह निर्माण केला जाई मुलाना योग्य असे व्यवसाय निवडून त्यातून त्याच्या इंद्रियास योग्य ते शिक्षण देण्यात येई खेळ व शिक्षण याच्यात विरोध तर नाहीच, पण मुलाचे बरेचसे शिक्षण खेळातूनच होत असते ही गोष्ट फ्रॉयबेलनेच प्रथम शिक्षणशास्त्रज्ञाच्या नजरेस आणून दिली

## माँटेसरी पद्धति

मादाम मॉटेसरी या बाईनी प्रथम रोममध्ये जी शाळा काढली, ती शारीरिक व मानसिक दृष्टीने सामान्य मुलापेक्षा दुर्बल अशा मुलाना शिक्षण देण्यासाठी उपयुक्त अशा साहित्याचा शिक्षणात उपयोग केल्यास व शिक्षकाने जास्तीत जास्त कौशल्य दाखविल्यास ही दुर्बल मुलेहि सामान्य मुलाइतके ज्ञान संपादन करू शकतात, असे मॉटेसोरीस दिसून आले मात्र-ज्ञान मिळविण्यास त्यास सामान्य मुलापेक्षा जरा अधिक काल लागतो अशा रीतीने मानसिक दुर्बलता असणाऱ्या मुलाना शिकविण्यासाठी या रोममध्ये काढलेल्या शाळेला कल्पनेबाहेर यश आले या शाळेत ३ ते ६ वर्षाची मुले घेतली जात पुढे सामान्य मुलाच्या शिक्षणासाठी उपयुक्त असे फेरफार या पद्धतीत करण्यात आले

प्रत्येक मुलातील विशिष्ट प्रवृत्ति शोधून काढून तिचा विकास करणे हे मॉटेसोरी पद्धतीचे ध्येय आहे मॉटेसोरी बाई मुलाचे सर्वसामान्य आरोग्य व शारीरिक तपासणी या गोष्टीस फार महत्त्व देतात मुलाला संपूर्ण स्वातंत्र्य देऊन त्याच्या विशेष प्रवृत्तीचे निरीक्षण करणे हीहि गोष्ट या शिक्षण-पद्धतीत फार महत्त्वाची मानली जाते मुलाला पूर्ण स्वातंत्र्य दिल्याने ते अधिक स्वावलंबी बनते अशी समजूत या पद्धतीच्या बुडाशी आहे

मॉटेसरीबाईनी आखलेल्या शिक्षणक्रमात वर्गपद्धति त्याज्य समजली जाते प्रत्येक मुलाच्या स्वाभाविक प्रवृत्ति भिन्नभिन्न असल्याने त्याला स्वतंत्र रीतीनेच शिक्षण मिळाले पाहिजे मुलाच्या स्वयंशिक्षणास जरूर ते सर्व

साहित्य पुरविणे व त्याच्यावर देखरेख करणे हे शिक्षकाचे मुख्य काम बालो-द्यान-पद्धतीत खेळ, गाणी, गोष्टी वगैरेस अधिक महत्त्व दिले जाते, तर या पद्धतीत इन्द्रिय-शिक्षणास व शालेय विषयास अधिक महत्त्व दिले आहे

## मॉंटेसरी शिक्षणपद्धतींतील दोष

(१) अतिशय खर्चाची (२) प्रथमपासून एकटे स्वयशिक्षण घेत राहिल्याने मुलाच्या सामाजिक प्रवृत्तीच्या प्रकर्षास मिळावा तेवढा वाव मिळत नाही (३) भावनाच्या विकासासहि फारसा अवकाश मिळत नाही (४) मूल आत्मकेन्द्री बनण्याची भीति असने

## डाल्टन पद्धति

मिस् पार्क्हर्स्ट् या बाईनी डाल्टन या खेडेगावी डाल्टन-पद्धति या नावाने ओळखल्या जाणाऱ्या पद्धतीची पहिली शाळा काढली स्वयशिक्षण व स्वातत्र्य या दोन तत्त्वाचा उपयोग करून हायस्कूलच्या मुलाना शिक्षण देणे हा डाल्टन्-शिक्षण-पद्धतीचा विशेष होय या शिक्षण-पद्धतीतील वैशिष्टचे खालीलप्रमाणे सागता येतील.

(१) इतर सामान्य शाळाप्रमाणे या शाळात मुलाचे वर्ग नसतात प्रत्येक विषयाच्या अभ्यासासाठी एक स्वतत्र खोली असते मुलाने आपल्या आवडीचा विषय निवडून त्याचा अभ्यास शिक्षकाच्या मार्गदर्शनाने करावयाचा असतो विषयाला जरूर तेवढी सर्व पुस्तके या खोल्यातून ठेवलेली असतात

(२) विद्यार्थी व शिक्षक दोघाचेहि काम जास्त सुरळीत तऱ्हेने होऊन शक्तीचा अपव्यय होत नाही

(३) अभ्यासाला एक प्रकारच्या करारनाम्याचे स्वरूप आल्याने तो वेळेवर पुरा न झाल्यास कमीपणा येईल म्हणून मूल अभ्यास करण्यासाठी आपोआप झटने.

(४) साहित्य व खर्च याच्यात बरीच बचत करता येते

(५) नावडते विषय शिकण्याची मुलावर सक्ती केली जात नाही

## व्यवसाय पद्धति

शालेय विषयात शिकलेल्या गोष्टींचा मुलाना व्यवहारात फारसा उपयोग करता येत नाही ही उणीव भरून काढण्यासाठी सहकार्याने काम करण्याची संधि या पद्धतीत मुलाना दिली जाते. एका वर्गांतील सर्व मुलानी मिळून एखाद्या व्यवसायाची निवड करावयाची (शेती, घर बांधणे, मशीन तयार करणे वगैरे) प्रत्येक मुलाने कामाचा योग्य वाटा उचलावयाचा व सर्वांनी मिळून तो व्यवसाय एका ठराविक वेळात पुरा करावयाचा. अशा तऱ्हेच्या प्रत्यक्ष कृतीने पुढील आयुष्यात निवडावयाच्या व्यवसाया-संबधीचे व्यवहारातील ज्ञान मुलास चांगल्या तऱ्हेने मिळतें अशी या पद्धतीच्या पुरस्कर्त्यांची समजूत आहे.



प्रकरण ९ वें

# अनुवंश आणि परिस्थिति

महजगत्या मुलाकडे पाहिल्यास असें दिसून येते की विशिष्ट कलाकडे किंवा विद्येकडे काही मुलाचा अगदी लहानपणापासून अधिक कल असतो. प्रत्येक मुलाच्या स्वभावात एक प्रकारची नैसर्गिक भिन्नता असते. मुलामध्य जी वैगुण्ये अगदी लहानपणापासूनच दिसू लागतात त्याला कारण शालेय शिक्षणापेक्षा आनुवंशिकता हेच आहे प्रत्येक मुलाच्या नैसर्गिक आवडी-निवडी समजून घेऊन त्याप्रमाणे योग्य अशा पद्धतीनें त्यास शिक्षण देता यावे यासाठी अनुवंशशास्त्राचा अभ्यास करणे जरूर आहे.

**आनुवंशिकता म्हणजे काय ?** आईबाप व मूल याच्यात जे साम्य आढळते ते आईबापाकडून मुलाकडे आलेल्या बीजद्रव्यात असते प्रत्येक पिढीत दिसून येणाऱ्या पिढीजात गुणालाच आपण आनुवंशिक गुण असे म्हणतो ज्या बीजपेशी मुलाचा पिंड तयार होताना एकत्र येतात. प्रत्येक वेळी त्या एकाच तऱ्हेच्या असतात असें नाही म्हणून एकाच आईबापाच्या मुलात वेगवेगळी वैशिष्टचें दिसून येतात. मूळ बीजद्रव्य हे एका पिढीतून दुसऱ्या पिढीत जाताना त्यात काहीच बदल होत नाही. म्हणून मूल आपल्या मूळ पूर्वजाइतकेच म्हातारे आहे असे म्हणण्याची पद्धत आहे

## वंश-संस्काराचे प्रमुख नियम

शरीरसाधर्म्याच्या दृष्टीनें आईबाप व मुले याच्यात साम्य असते. एका जातीपासून सजातीयच सतति होते. घोड्यापासून गाढव होत नाही किंवा बाजरी पेरली तर गहूं उगवत नाही

संपादित गुणाचें संक्रमण होत नाही. (ही कल्पना प्रथम प्रथम रूढ होती; पण सर्व जीवसृष्टीकडे पाहिल्यास हे तत्त्व सिद्ध होत नाही.)

**मेंडेल्चे प्रयोग** —इ स १९०० साली अनुवंशासबंधी एक विलक्षण शोध शास्त्रज्ञाच्या पुढे आला ग्रेगर् मेंडेल् नावाच्या एका ऑस्ट्रियन धर्म-गुरूने एका विशेष प्रसिद्ध नसलेल्या शास्त्रीय नियतकालिकात फार वर्षापूर्वी लिहिलेला एक लेख काही शास्त्रज्ञाच्या वाचनात आला मेंडेल्ने आपल्या बागेत वाटाण्याची झाडे लावून व त्याच्या काही पिढ्याचे निरीक्षण करून अनुवंशासबंधीचे सर्वसामान्य नियम बसविण्याचा प्रयत्न केला होता. सुरुवातीला एक गोल व एक सुरकुतलेला असे दोन वाटाणे एकत्र पेरले त्याच्या सयुक्ताधानाने ( Cross breeding) तयार झालेली पहिली पिढी पाहिली तेव्हा ४ १ अशा प्रमाणात गोल व सुरकुतलेले वाटाणे निपजलेले दिसले या पिढीतील वाटाणे पेरले तेव्हा एकूण वाटाण्यापैकी $\frac{1}{4}$ सुरकुतलेले, $\frac{1}{4}$ गोल व $\frac{1}{2}$ गोल असून सुरकुतलेलेहि असे प्रमाण त्यास दिसून आले चवथ्या पिढीत गोल वाटाण्यापासून गोल, सुरकुतलेल्यापासून सुरकुतलेले व गोल-सुरकुतलेल्या अशा मिश्र स्वरूपाच्या वाटाण्याच्या एका बीजापासून ३ · १ गोल-सुरकुतलेले या प्रमाणात वाटाणे तयार झालेले दिसून आले नतर उदीर, ससे, कुत्री वगैरे प्राण्यावर प्रयोग करूनहि त्याला असेच दिसून आले की मागील पिढीतील आनुवंशिक गुण पुढील पिढीत काही प्रमाणातच उतरतात. मेंडेल्च्या या प्रयोगावरून असे सिद्ध झाले की आईबापाचे स्वभावसिद्ध गुणदोष मुलामध्ये उतरू शकतात एवढाच निर्णय मेंडेल्ने जगापुढे माडला

मेंडेल्च्या या प्रयोगाचा इतका बोलबाला झाला की अनेक शास्त्रज्ञ निरनिराळ्या देशात अशा तऱ्हेच्या प्रयोगात निमग्न झाले बीजद्रव्य-विषयक मते प्रसृत झाली विशिष्ट बीजद्रव्याच्या मिश्रणाने विशिष्ट गुण व्यक्तीच्या ठायी निर्माण होतात असे सिद्ध करण्याचा प्रयत्न झाला कोणते गुण आनु-वंशिक असतात याचा उलगडा करताना डोळे, केस, चामडी, डोक्याच्या कवटीचा आकार, ठेंगूपणा, उंची हे गुण आनुवंशिक असतात असे आढळून आले वर्णांधत्वासारखे काही शारीरिक दोष याच कक्षेत पडले मधुमेहा-( Diabetes ) खेरीज इतर रोग पुढच्या पिढीत उतरत नाहीत; पण अशा रोगाचा प्रतिकार करण्याची शक्ति रोग्याच्या मुलात कमी असते म्हणून आन्तरव्रण, क्षय, इत्यादि रोग आनुवंशिक नसूनहि पुढील पिढ्यात आलेले दिसतात बौद्धिक दुर्बलत्वहि पुढील पिढीतून काही बाबतीत दिसून आले.

विकासवाद जर खरा मानला तर संपादित गुणहि एका पिढीतून दुसऱ्या पिढीत उतरतात असे मानावे लागेल म्हणून लॅमार्क् या शास्त्रज्ञाने असे सिद्ध केले की प्रत्येक जीव जगण्याची धडपड करीत असतो त्यासाठी आवश्यक ते गुण अंगी आणणे व परिस्थितीशी मिळते घेणे या दोन गोष्टी त्याला कराव्या लागतात जीवनाच्या झगडयात उपयोगी अशा ज्या गोष्टी प्राणी आपल्या अंगात आणील त्या पुढील पिढीसहि तो देऊ शकतो अशाच तऱ्हेने प्राण्याचा खरा विकास झाला असला पाहिजे नवीन गुणधर्म हळहळू संकलित केले जाऊन काही पिढ्यानंतर मूळ जातीपासून भिन्न अशी एक नवीन उपजाति तयार होते (उदाहरणार्थ, घोड्यापासून जिराफ) लॅमार्कच्या सिद्धान्ताचे महत्वाचे भाग दोन (१) जीवनाच्या झगडयात यशस्वी होण्याची प्राण्याची निश्चयशक्ति व (२) संपादित गुणाचे संक्रमण होणे. (पण लॅमार्कचे मत आता मागे पडले आहे)

डार्विन्ने विकासवादाचे स्पष्टीकरण खालीलप्रमाणे केले आहे जगातील प्रत्येक प्राण्याला खूप संतति होत असते पण एवढ्याच्या पोषणाला पृथ्वी अपुरी पडते त्यामुळे जीवन जगण्याला लायक असे प्राणी जगतात व बाकीचे मरतात जीवनाच्या झगड्यात काही माणसाची सरशी होण्याचे कारण त्याच्या जीवविद्तील सहजभेद (Inborn Variations) हे होय. हे सहजभेद पुढील पिढीत उतरतात जीवनसमर्थ प्राणी निवडून काढण्याच्या सृष्टीच्या या क्रियेला नैसर्गिक निवड (Natural Selection) असे म्हणतात.

संपादित गुण पुढील पिढीत उतरतात की नाही या प्रश्नावर शास्त्रज्ञात बराच तीव्र मतभेद आहे बाप गणिती असला तर मुलगा गणिती असतोच असे नाही व नसतोच असेहि नाही सामान्यत असे म्हणता येईल की बापाचे गुण मुलात उतरलेले दिसतात व ते आनुवंशिकतेमुळे नसून बापाच्या सहवासात मुले वाढतात व त्याच्यावर त्या परिस्थितीचा परिणाम होतो. समाजातील एका पिढीने मिळविलेले गुण दुसऱ्या पिढीने जसेच्या तसे घतले नाहीत, तरी ते मिळविण्याची पुढील पिढीत सुलभता दिसून येते यावरून सामाजिक संस्कार (Social Heredity) नाकबूल करता येत नाही. शास्त्रीय शोध, भाषा, चालीरीती, थोडक्यात सर्व संस्कृति म्हणजे पुढील

पिढीस मागील पिढीपासून मिळणारे भाडवलच होय. आनुवशिकतेत जर काही उणीव राहिली असेल तर तीसुद्धा भरून काढण्यास सामाजिक परंपरा मदतच करील

अनुवशाचा अभ्यास करण्यास जुळी मुले फार उपयोगी पडतात. कारण त्याच्याबाबत वशसस्कार अगदी सारखा असतो एकाच गर्भाशयात या दोन मुलाची वाढ झाली असल्याने त्याच्या इन्द्रियाची एकूण ठेवण, शरीरातील ग्रंथीची रचना या सर्व गोष्टीत त्याच्यात फार सादृश्य असते इतकेच नव्हे तर जन्मानतर होणाऱ्या त्याच्या प्रत्येक अवयवाच्या वाढीतहि अत्यंत सारखेपणा आढळतो अर्थात् अशा दोन मुलास जर निरनिराळचा प्रकारचे शिक्षण दिले तर एकच अनुवश असून परिस्थितीमुळे होणाऱ्या फरकाचा अभ्यास फार चागल्या रीतीने करता येईल दोन जुळचा मुलीवर एका मानसशास्त्रज्ञाने प्रयोग करून पाहिले दोघीपैकी एकीला ११ महिन्याची असताना जिन्याच्या पायऱ्या चढण्यास शिकविले व दीड महिन्यात ती उत्तम रीतीने जिना चढू लागली दुसरीला काही शिक्षण न देता एकदम जिना चढण्यास लावले तेव्हा तिने एका आठवडचात आपल्या बहिणीइतके नैपुण्य दाखविले यावरून शिक्षणाचा फारसा परिणाम होत नसून जी शारीरिक वाढ होते त्यातच बुद्धिमत्तेची वाढहि आपोआप होत जाते असे दिसून आले. दोन जुळचा मुलाना जरी निरनिराळचा हवामानाच्या जागी ठेवले तरी त्याच्या शारीरिक वाढीत विशेष काहीच फरक होत नाही.

प्राण्यावर आजपर्यंत जेवढे प्रयोग झाले त्यावरून असे दिसून येते की प्राण्याची बुद्धिमत्ता पुष्कळ अशी अनुवशावरच अवलबून असते विशेषत: काही नवीन गोष्टी ध्यानात घेऊन त्या करताना काही प्राण्यात बुद्धिमत्ता तर काहीत मठ्ठपणा दिसून येतो बुद्धिमान् व निर्बुद्ध असे दोन प्राणी घेऊन जर त्याच्या काही पिढचाचा अभ्यास केला तर हुशारापासून हुशार व मठ्ठापासून मठ्ठच प्रजा निर्माण झालेली दिसते मनुष्याबाबतहि सर्वसामान्यत: असे दिसून येते की पुष्कळशा आनुवशिक गोष्टीवर त्याची बुद्धिमत्ता अवलंबून असते

स्त्रीबीजपेशी व पुबीजपेशी याच्या सयोगाने प्राणी जन्मास येतो. अशा प्राण्याच्या शरीराच्या प्रत्येक पेशीत अनेक ततुस्वरूपी बीजमणिमाला

(Chromosomes) असतात, व या माला त्यास त्याच्या उभय पितराकडून वंशदाय म्हणून सक्रमित झालेल्या असून त्याच्या घटकास बीजमणि (Genes) म्हणतात प्रत्येक व्यक्तीस पित्याकडून चोवीस व मातेकडून चोवीस अशा अठ्ठेचाळीस बीजमण्याचा लाभ होतो या बीजमणिमाला व त्यातील बीजमणि हे खरे वशगुणाचे वाहक होत

दोन भावडात साम्य असत नाही याचे कारण आईबापाकडून आलेले बीजद्रव्याचे घटक प्रत्येक मुलांत सारख्याच स्वरूपाचे असत नाहीत ज्या मानाने आई व बाप याच्या घराण्यात फरक असेल त्या मानाने हा भेद वाढत जातो सामान्यत. दोघाच्या गुणाच्या सरासरीने गुण मुलात यावेत हे अनुवशाच्या नियमाला धरून झाले पण एखादे वेळी मूल व आईबाप याच्यात खूप फरक जो आढळतो त्याचे कारण अनुवश हा एकाच पिढीवर अवलबून नाही. आईबापाच्या मागील काही पिढचाचाहि मुलाच्यावर परिणाम होणे अशक्य नसते मुलाच्या सर्व वैशिष्टचाचा अभ्याम करण्यास त्याच्या मागील आठ-दहा पिढचाचे सशोधन करणे जरुरीचे आहे

मनुष्यप्राण्याबाबत असे दिसून येते की त्याची बुद्धिमत्ता ही काही अंशी मागील पिढचावर व काही अशी भोवतालच्या सामाजिक परिस्थितीवर अवलंबून राहील शारीरिक वाढीबरोबरच मनाची जी वाढ होतें त्याला पुष्कळ अंशी समाजच कारणीभूत असतो म्हणून कोणत्याहि व्यक्तीचा मानसशास्त्रदृष्टचा अभ्यास करण्यास त्याच्या भोवतालच्या व्यक्ति व त्याचे त्या व्यक्तीशी सबध याचाहि अभ्यास करणे तितकेच जरुरीचे आहे म्हणून शरीरशास्त्रदृष्टचा मनुष्याच्या विकासाचा केलेला अभ्यास व सामाजिक दृष्टीने मनुष्याच्या विकासाचा केलेला अभ्यास यात फार फरक दिसतो नुसत्या शारीरिक दृष्टीने पाहिल्यास मनुष्याच्या भावनाचे स्वरूप त्याच्या अन्त.स्रावी ग्रथीच्या वाढीवर अवलबून असते, असे म्हणावें लागेल. पण मर्व सृष्टीतील लोकाकडे पाहिल्यास असे दिसते की कालमानाप्रमाणे व देशमानाप्रमाणे माणसाच्या शारीरिक वाढीत फरक दिसतो या वाढीस अनुसरून त्याचे सामाजिक जीवन, रूढी व चालीरीति तयार होतात. व सर्वांचा परिणाम परत शरीरावर होत असतो

काहीहि असले तरी आनुवंशिक वैशिष्ट्ये लक्षात घेतल्याखेरीज मानस-शास्त्राचे चालणार नाही [नॉर्डिक व मेडिटरेनिअन् या दोन वंशात वयात (Puberty period) येण्याचा सुरवातीचा काळ वेगळा असल्याने त्याच्या भावनाप्रधानतेवरहि त्याचा परिणाम होतो असे दिसून येते ] अन्न, भोवतालची भौगोलिक परिस्थिति या दोहोमुळेहि मानसिक घडणीवर परिणाम होतो तेव्हा या सर्वांचा अभ्यास केल्याखेरीज मानसशास्त्राला गत्यतर नाही दोन निरनिराळ्या वंशाचे लोक जर एकाच देशात राहिले तर त्याच्यात त्याच्या पूर्वजाची वैशिष्ट्ये विशेष प्रमाणात दिसून येत नाहीत. आफ्रिकेतील नीग्रोची सर्व वैशिष्ट्ये जन्मापासून उत्तर-अमेरिकेत राहणाऱ्या नीग्रोत तितकीशी आढळत नाहीत ज्या गोष्टी एक पिढी गरजेमुळे मिळविते त्या गोष्टी पुढील पिढीत थोड्याफार आपोआपच उतरतात

काही नीग्रो व युरोपियन मुले याच्यात कोणत्या रगाबद्दल विशेष आकर्षण दिसते याचा शोध केला. तेव्हा ज्या रगाबद्दल विशेष आवड निग्रो मुले दाखवितात त्या रगाबद्दल युरोपियन मुले विशेष आकर्षण दाखवीत नाहीत असे दिसून आले पण याला अनुवंश हे कारण सागण्यापेक्षा परि-स्थिति हेच कारण सागणे योग्य ठरेल

जीवशास्त्रीय आनुवंशिकतेची ( Biological inheritance ) निश्चित उदाहरणे सापडणे कठीण आहे अर्थात् मनुष्याची घडण ही त्याच्या भोवतालच्या सास्कृतिक, भौगोलिक व शैक्षणिक परिस्थितीनुसार होते, असे समजणे जास्त सोयीचे होते एस्किमो व जुने जपानी पर्वतवासी लोक यात अशी समजूत आहे की मुलाला शिस्त लावणे म्हणजे निर्दयपणा होय त्याला जे मागेल ते देणे याचेच नाव त्याचे हित करणे याच्याविरुद्ध स्पार्टन्स् व रोमन या लोकात अशी समजूत होती की, अगदी लहानपणापासून मुलाला कडक शिस्त लावल्यावाचून ते चागले होणे शक्य नाही यावरून या दोन तऱ्हाच्या मुलात कोणते भेद दिसून येतील हे स्पष्ट आहे

वरील उदाहरणावरून असा निर्णय करता येईल की मुलाच्या व्यक्ति-मत्त्वाचा विकास हा सर्वस्वी मुलावर होणाऱ्या सास्कृतिक व सामाजिक सस्कारावर अवलबून असतो नॉर्वेजिअन् लोकात जीवशास्त्रीय आनुवंशिकता (Biological heredity) असा उल्लेख कोठेहि केलेला आढळत नाही

मानवी स्वभाव बहुताशी संस्कृतीने निश्चित होतो सामाजिक परिस्थिती बदलली तर लोकसमुहाच्या स्वभावात फरक पडेल *

१८०० सालापर्यंत र्‍हाईनलॅंडमधील लोकाना त्याच्या काव्यप्रियते-बद्दल व अव्यवहारीपणाबद्दल युरोपातील इतर लोक हसत पण १९०० सालात देशात ज्या क्रान्त्या घडल्या, त्यात हेच लोक सर्वात आघाडीला होते व जे लोक हसत होते तेच त्याना भिऊ लागले

बुद्धिमत्ता ही आनुवशिक आहे की शिक्षणाने मिळविण्यासारखी गोष्ट आहे यासबधी विशेष अभ्यास आतापर्यंत बऱ्याच शास्त्रज्ञानी करून पाहिला आहे व गणितागत पद्धतीने बुद्धीचा गण्यक काढण्याची पद्धतिहि निश्चित बसविली गेली आहे बिने स्टफर्ड, स्पिअरमन वगैरे लोकानी सर्वसामान्य मुलाला जितके कमीतकमी ज्ञान अपेक्षित आहे ते ध्यानात घेऊन काही प्रश्न-मालिका तयार केल्या ३ ते ४ वर्षाच्या मुलापासून २५–३० वर्षाच्या तरुणापर्यंत प्रत्येक वयाच्या व्यक्तीच्या बुद्धीची चाचणी घेता येईल इतक्या प्रश्नमालिका सिद्ध करून त्याच्या साहाय्याने शेकडो मुलाच्या चाचणीपरीक्षा घेण्यात येऊ लागल्या शारीरिक वय जेवढे असेल तेवढयाच वयाच्या मुला-साठी तयार केलेली चाचणीपरीक्षा जर त्या मुलाला यशस्वी रीतीने पास होऊन दाखविता आली तर त्याची बौद्धिक वाढ शारीरिक वाढीइतकीच झाली आहे असे समजावे ज्या वयाच्या मुलाची अगर व्यक्तीची चाचणीपरीक्षा एखादे मूल अगर व्यक्ति उत्तीर्ण होईल तितके त्या मुलाचे अगर व्यक्तीचे मानसिक (Mental age) वय आहे असे समजण्यात येते शारीरिक वय जन्मवर्षावरून आपणास कळतेच म्हणून

$$\text{बुद्ध्यक I. Q.} = \frac{\text{मानसिक वय (mental age)}}{\text{शारीरिक वय (chronological age)}} \times १००$$

अशा रीतीने हजारो मुलाचा बुद्ध्यक (I. Q ) काढून त्याच्या बौद्धिक वाढीवर परिस्थितीचा व अनुवशाचा कितपत परिणाम होतो याचे निरीक्षण पाश्चात्य शास्त्रज्ञानी केले आहे

* Much of the human nature is culturally determined Even national temperament may change as social conditions change.

अमेरिकेत राहणाऱ्या शेकडो नीग्रो लोकांच्या बौद्धिक चाचणीपरीक्षा घेतल्या त्यात मुद्दाम सर्व दर्जाचे व वयाचे लोक घेतले होते. स्त्रियाहि होत्या पण सर्व प्रयोगात असे सिद्ध झाले की नीग्रो लोकांची बुद्धिमत्ता गोऱ्या लोकाहून कमी प्रखर असते हा कशाचा परिणाम असावा ? अशा तऱ्हेच्या प्रयोगात जी नीग्रो माणसे निवडावयाची त्याना गोऱ्या लोकाप्रमाणेच सर्व वातावरण, शिक्षण व संधि मिळाली असती तरच त्या तुलनेतून खरे निर्णय मिळतील पण असा नीग्रो मिळणे कठीण म्हणून ज्याना शहरी आयुष्य व शिक्षण मिळाले आहे अशी नीग्रो मुले व ज्याना या दोन्ही गोष्टी कमी प्रमाणात मिळाल्या आहेत अशी मुले घेऊन प्रयोग करून पाहिल्यास शिक्षण मिळालेली मुले बुद्धीची प्रखरता अधिक प्रमाणात दाखवितात. यावरून असे दिसून येते की शिक्षणाचा अवधि अधिक वाढविला तर बुद्धीची वाढ अधिक होते *

एकाच शाळेत जाणाऱ्या गोऱ्या व नीग्रो मुलाच्या बौद्धिक चाचणी-परीक्षा घेतल्या तर त्याची बुद्धिमत्ता थोड्या फरकाने एकाच पातळीवर असलेली दिसते

दुसऱ्या एका प्रयोगात मध्य व पश्चिम युरोपातील निरनिराळ्या देशातील मुलाचे गट घेऊन त्याच्या कृति-कसोट्या (Performance Tests) घेतल्या तेव्हा असे आढळून आले की खेड्यात राहणारी मुले शहरी मुला-पेक्षा कमी चलाख असतात पण निरनिराळ्या देशातील असूनहि ज्याना सारख्याच तऱ्हेचे शहरी वातावरण लाभले आहे, त्याच्यात बुद्धिमत्तेचा फरक दिसला नाही

वरील निरीक्षणावरून असे निश्चित विधान करता येईल की वांशिक किंवा वैयक्तिक आनुवंशिकतेवर सर्व काही अवलबून नसते विशिष्ट काळी आणि विशिष्ट स्थळी जी सांस्कृतिक परिस्थिति असते तीप्रमाणे त्या त्या व्यक्तीला शिक्षणाची संधि मिळत जाते आणि या संधीचा फायदा ज्या प्रमाणात ती व्यक्ति घेते त्या प्रमाणाने बहुतांशी बुद्धीची वाढ होत असते

---

* The longer the period of good schooling, the higher the score of intelligence.

अमेरिकेत केलेल्या काही प्रयोगात बुद्ध्यक भोवतालच्या परिस्थिती-पेक्षा अनुवंशावरच अवलबून असतो असेहि आढळून आले आहे यावरून असे दिसते की काही ठिकाणी अनुवंश व काही ठिकाणी परिस्थिति ह्या दोन्ही गोष्टी मानसिक वाढीवर परिणाम करीत असतात व त्यामुळे दोन्ही बाजूना थोडेफार महत्त्व द्यावे लागते अमेरिकेत बाळगलेल्या मुलावर प्रयोग करून पाहिले तेव्हा असे दिसून आले की ज्या वातावरणात मूल वाढत असेल त्या वातावरणाने बुद्ध्यकात पाच ते दहा टक्के फरक पडतो चागल्या किवा वाईट घराण्यातून मुले निवडण्यावरहि बुद्ध्यक बऱ्याच प्रमाणात अवलबून असतो जेथे घराणे व परिस्थिति दोन्ही उत्तम असतील ते मूल इतरापेक्षा निश्चित चागले असते मुलाच्या आयुष्यात एकदम जरूर त्या सधि आणून दिल्या तर बुद्ध्यकात ३० टक्के फरक पडू शकतो

धंद्यातील बुद्धिमत्ता ही काही अशी आनुवंशिक व काही अशी भोव-तालच्या परिस्थितीवर अवलबून असते कॅलिफोर्नियातील एक हजार चागली बुद्धिमान् मुले निवडून त्याच्या आईबापाच्या परिस्थितीचा अभ्यास केला तेव्हा असे आढळून आले की या मुलाचे बापहि देशाच्या आर्थिक झगडयात चागल्या तऱ्हेने यशस्वी झालेले होते एखाद्या कुटुबातील मडळी प्रामुख्याने जो धदा करीत असतात त्या धद्याची प्रवृत्ति मुलांत उपजतच असलेली दिसून येते बापाचा धदा जितका उच्च तितके मूलहि अधिक बुद्धिमान् असे दिसते

शालेय शिक्षणाचाहि बुद्धिमत्तेवर फार परिणाम होत असतो इंग्लड-मध्ये समुद्रकिनाऱ्यावर राहणारी खलाशाची मुले अगदी लहानपणीं बऱ्यापैकी बुद्धिमान् असतात. पण जर वाढत्या वयानुसार योग्य असें शिक्षण त्याना मिळाले नाही, तर साधारण १४ वर्षांच्या पुढे त्याची बुद्धि मंद होत चाललेली दिसते.

व्हर्जिनियातील एका निवात ठिकाणी काही मुले अगदी लहानपणी नेऊन ठेवली व त्याना कोणत्याहि तऱ्हेचे शिक्षण दिलें नाही. इतकेच नव्हे, तर इतर कोणी मनुष्यहि त्याच्या दृष्टीस पडणार नाही अशी व्यवस्था केली. नंतर त्याना वयाच्या ८ व्या, १० व्या व १२ व्या वर्षी बौद्धिक कसोटया

( Intelligence Tests ) लावून पाहिल्या तेव्हा असे आढळून आले की त्या मुलाच्या बुद्धीची मुळीच वाढ झाली नाही व जो जो वय वाढेल तो तो बुद्ध्यक खाली येत चालला

गेल्या महायुद्धाचे वेळी नीग्रो लोकाना बौद्धिक कसोट्या लावून पाहिल्या तेव्हाहि काही सामान्य व बाकीचे सामान्यापेक्षाहि कमी असलेले आढळून आले.

एकदरीने आतापर्यंत केलेल्या सर्व प्रयोगावरून असे दिसून आले आहे की शेकडा ६० ते ७० माणसे ९० ते ११० इतक्या बुद्ध्यकाची असतात. याना जर चागली परिस्थिति व चागले शिक्षण मिळाले तर नैसर्गिक गुणाच्या दिशेने ती खूपच प्रगति करतील मनुष्याने आयुष्यात मिळविलेल्या यशाची मोजदाद करण्यासाठी काही वेळा परिस्थितीकडे धाव घ्यावी लागते, तर काही वेळा अनुवंश बाजूला करून चालत नाही सामान्यत असे म्हणता येईल की ज्या सर्व मुलाचा अनुवंश सारखा असेल त्याच्यात बुद्धिमत्तेचा जो फरक आढळून येतो तो निव्वळ भोवतालच्या परिस्थितीच्या भिन्नतेमुळे. याच्या उलट ज्या सर्व मुलाना एकाच तऱ्हेची संधि मिळूनहि त्याच्या प्रगतीत फरक आढळून येतो, याचे कारण आनुवशिकता हेच म्हणावे लागेल

मानसिक विकृति झालेल्या मुलाबाबत मात्र आनुवशिकता महत्त्वाची ठरते येथे विकृतीचा अर्थ इतकाच की ज्याचा बुद्ध्यक सामान्य माणसाच्या बुद्ध्यकाच्या बराच खाली असतो बुद्धिमत्तेत उतरती श्रेणी खालीलप्रमाणे लावतात

बुद्ध्यक ६० ते ७०—दुर्बलबुद्धि Feeble-minded.
बुद्ध्यक ४५ ते ६०—जडबुद्धि Morons.
बुद्ध्यक २० ते ४५—क्षीणबुद्धि Imbeciles.
बुद्ध्यक ० ते २०—वेडसर Idiots.

स्टॅन्फर्ड व बिने यानी तयार केलेल्या चाचण्यात बुद्धिमत्तेची पूर्ण वाढ होण्याचे वय १६ धरलेले आहे. सामान्य मुलाइतकाच विकल ( Defective ) मुलाचा बुद्ध्यकहि कायम ( Constant ) असतो.

बुद्धिदौर्बल्य ( Feeble-mindedness ) हा गुण मुलात असल्यास तो अगदी लहानपणीच प्रगट होतो बऱ्याच विकृत मुलाच्या वंशातील मागील पिढ्याचा अभ्यास जो आतापर्यंत करण्यात आला आहे यावरून असे सिद्ध झाले आहे, की बुद्धिदौर्बल्य हे आनुवंशिक आहे जेव्हा एका पिढीतील सर्वच मुले दुर्बल बुद्धीची असतात तेव्हा बीजपेशीतच हा गुण असला पाहिजे असे म्हणावे लागते

शरीराच्या काही भागाची वाढ जर पूर्ण झाली नसेल तरीहि बुद्धिदौर्बल्य येते (उदा, Epileptic feeble-minded child ) अनुवंशाखेरीज इतरहि काही कारणानी मानसिक विकृति निर्माण होते मेंदूला झालेल्या एखाद्या रोगामुळे किंवा दुखापतीमुळे काही भागाची वाढ थांबते मेंदूच्या आकारावर व वजनावरहि बुद्धिमत्तेची वाढ अवलंबून असते पूर्ण वाढ झालेल्या मेंदूचे वजन साधारणत ३ पौंड असते ज्याच्या मेंदूचे वजन १ पौंडाच्यावर जातच नाही ती मुले मनाने विकृत असतात हाहि प्रकार आनुवंशिकच असलेला आढळून येतो

कंठग्रंथि (Thyroid Gland) जर पाहिजे तशी वाढलेली नसेल तरीहि शारीरिक वाढीत उणीवा उत्पन्न होतात व त्यामुळे बुद्धिमत्तेची वाढ होत नाही काही वेळा असेहि दिसते की शरीराची पूर्ण वाढ होऊनहि बुद्ध्यंक फार कमी असतो

अनुवंश व परिस्थिति हा एक मोठा वादाचा प्रश्न ठरला आहे एकाच व्यक्तीचा अभ्यास सूक्ष्म रीतीने करूनहि या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देता येत नाही

दोन व्यक्तींचे सूक्ष्म निरीक्षण करून, त्या दोघामधील फरक आपण जाणू शकतो, व त्या व्यक्तीचा पूर्वेतिहास जाणून घेऊन ते फरक आनुवंशिक आहेत की परिस्थितिजन्य आहेत हे सांगता येणें शक्य आहे अनुवंशाने आलेल्या गोष्टी एका पिढीत काढून टाकता येत नाहीत जननशास्त्राचे नियम पाळून योग्य दक्षता घेतली तर काही पिढ्यानंतर आपले प्रयोग यशस्वी होतील असे शास्त्रज्ञाना वाटते

प्रकरण १० वें

# क्रीडा व काम

---

प्रसिद्ध शास्त्रज्ञ सर पर्सी नन् याचे असे म्हणणे आहे की मानवी क्रियाचें पृथक्करण केले तर त्यात काही ठिकाणी नित्यक्रमाला, परिपाटीला चिकटून राहण्याची मानवाची वृत्ति आढळते तर काही क्रिया विधायक सर्जनात्मक असतात आवर्तनप्रवृत्तीत परिपाटीचे महत्त्व स्पष्ट दिसून येते उलट क्रीडेत निर्मितीचे प्रमाण अधिक असते इतर कोणत्याहि प्राण्यापेक्षा मनुष्याचे मूल हे अधिक परावलंबी असते पण शिकण्याची पात्रताहि मनुष्याच्याच मुलात अधिक असते असा एक सामान्य नियम सागता येईल की उपजल्याबरोबर जो प्राणी अधिक परावलबी असतो त्याच्यात शिकण्याची म्हणजेच अनुभवाने आपली वागणूक बदलण्याची पात्रता जास्त, व त्याच्या सहजप्रवृत्ति व आनुवशिक सस्कारहि जास्त लवचिक.

**क्रीडेची पात्रता** —सर्व सस्तन प्राणी कमीअधिक प्रमाणात खेळताना दिसतात. ज्याची वागणूक सर्वस्वी सहजप्रवृत्तीवरच अवलबून आहे, असे पक्षी, मासे, कीटक व सरपटणारे प्राणी हे सहसा खेळताना दिसत नाहीत. खेळणाऱ्या प्राण्यात जिज्ञासा व प्रयोग करून पाहण्याची प्रवृत्ति असते. ज्या प्राण्यात शिकण्याची पात्रता जास्त त्या प्राण्यात खेळण्याची प्रंवृत्तिहि अधिक दिसून येते मनुष्याला विकासदृष्टचा अगदी जवळ असणारा प्राणी जो माकड त्याची खेळण्याची प्रवृत्ति मोठेपणीहि नाहीशी होत नाही. सर्व प्राण्यात जास्त खेळकर माणसाचेच मूल असते मुलामधील खेळण्यात जी कल्पकता, तन्मयता व मोकळेपणा दिसून येतात, ते गुण इतर कोणत्याहि प्राण्यात दिसून येत नाहीत

यावरून प्राण्याच्या शिक्षणाशी व विकासाशी खेळाचा काहीतरी जिव्हाळ्याचा संबंध असावा असे दिसून येईल खेळ म्हणजे मुलाच्या शिक्षणाची निसर्गाने केलेली व्यवस्थाच होय. मुलाच्या खेळावरच त्याची वाढ व विकास अवलंबून असतो. खेळ हे मनाच्या व शरीराच्या निरोगी-पणाचे लक्षण होय मूल खेळत नसेल तर त्याच्यात जन्मत च काहीतरी विकृति आहे असे समजावे.

**क्रीडेचें बदलणारे स्वरूप**—भोवतालच्या परिस्थितीशी मिळते घ्यावयाचे असल्याने जरुरीप्रमाणे मुलाच्या खेळाचे स्वरूप सारखे बदलत असते एक वर्षाचे मूल निरनिराळे आवाज काढून खेळण्याचा प्रयत्न करते. त्यातूनच त्याला बोलावयास शिकावयाचे असते जरा मोठी झाल्यावर धावणे, पळणे, मस्ती करणे वगैरे खेळ मुले खेळतात त्यातूनच त्याच्या हाता-पायाचे स्नायु बळकट होत जातात प्रत्येक वस्तूबद्दल नवीन ज्ञान मिळ-विण्याची त्याची जी जिज्ञासा असते ती खेळातूनच भागते

मुलाच्या खेळात मोठ्या मंडळींचे अनुकरण व पुष्कळ वेळा कल्पनेच्या भराऱ्याहि दिसून येतात उदाहरणार्थ, काठीचा घोडा करून खेळणे, राजा चोर वगैरे खेळ खेळणे अनुकरणप्रवृत्तीमुळे जगाचे व्यवहार समजण्यास व ते आचरणात आणण्यास त्याला पुष्कळ मदत होते

मुले खेळली नाहीत तर त्याचा मुळीच विकास होणार नाही प्रत्येक वस्तु उसकटण्यात त्याची तीव्र जिज्ञासा व्यक्त होते मुले सारखी प्रश्न विचारीत असतात त्याचे ज्ञान वाढण्याकडे या विचारणेचा उपयोग झाला पाहिजे अर्थात् मुलाच्या धडपडीचा व खेळण्याचा मोठ्या माणसांना फारसा त्रास न होईल अशीहि व्यवस्था व्हावयास हवी

मुलाचे शरीर ज्याप्रमाणे हळूहळू वाढत असते त्याचप्रमाणे त्याचे मनहि वाढत असते अगदी लहानपणापासून मुलाचे मन विचार करू शकते, ही गोष्टच पुष्कळ वेळा मोठ्या माणसाच्या लक्षात येत नाही. मूल तीन-चार वर्षांचे झाले की त्याला बोलता येते म्हणून मोठ्या माणसाप्रमाणे त्याला सारासार विचार व चांगले वाईट कळण्याची पात्रता येते असे मानणें चुकीचे आहे निव्वळ अनुकरणाने मूल बोलू लागते. पण प्रत्येक उच्चारलेल्या

शब्दाचा पूर्ण अर्थ त्याला कळण्यास कितीतरी वेळ जावा लागतो अगदी सुरवातीपासून मुलाला मन असते हे जितके खरे आहे, तितकेच लहान मुलाचे मन व मोठ्या माणसाचे मन यात फार फरक आहे हेहि खरे आहे मुलाच्या विकासाला मदत करावयाची असल्यास त्याच्या भूमिकेवर येऊन त्याच्या मनाचा ठाव घेतला पाहिजे

**क्रीडेची उपयुक्तता** —शरीरात जरुरीपेक्षा जास्त असलेल्या शक्तीचा व्यय करण्याचा क्रीडा हा एक मार्ग आहे क्रीडेच्या हालचालीपासून गभीर असे कोणतेहि ध्येय गाठावयाचे नसते खेळणे व त्यापासून आनद घेणे हेच खेळाचे साध्य असते ज्या कृति मूल लहानपणी खेळ म्हणून करते त्याचा पुढे पुढे त्याला उपयोगहि होतो कुत्र्याचे लहान पिलू खेळताना पजा मारण्यास, दोन पजात वस्तु धरण्यास, झडप घालण्यास वगैरे ज्या ज्या कृति शिकते त्याचा पुढच्या आयुष्यात शिकार करताना, सरक्षण करताना वगैरे बाबतीत उपयोग होतो आयुष्यात पुढे कराव्या लागणाऱ्या शारीरिक हालचालीची रगीत तालीमच खेळात होत असते असे म्हणता येईल खेळताना निरनिराळ्या स्नायूना आपोआप बळकटी येते.

मानसिक बाजूने पाहिल्यास मनाला उल्हसित करण्यास जरूर असणारा आनद खेळापासून मिळतो.

## क्रीडाविषयक विविध मतें

(१) मानसिक व शारीरिक दृष्टीने पुढील आयुष्याची अजाणता तयारी करणाऱ्या ज्या पूर्वआयुष्यातील हालचाली त्यानाच खेळ असे नाव देता येईल, असे कार्ल् ग्रूस्चे म्हणणे आहे इतर कोणत्याहि प्राण्याच्या मुलापेक्षा मनुष्यप्राण्याच्या मुलाच्या खेळात युद्ध व शिकार ह्या प्रवृत्ति तर अधिक असतातच, पण आणखीहि कित्येक प्रवृत्ति खेळातून प्रतीत होत असतात हातात मिळालेल्या प्रत्येक वस्तूचे तुकडे करून ती उलगडून पाहण्यास मुलास गमत वाटते । या प्रकाराला ग्रूस्ने पृथक्करणात्मक क्रीडा ( Analytical play ) असे नाव दिले आहे पत्त्याचा बगला करण्यात, मातीची चित्रे करण्यात किवा निरनिराळे ठोकळे घेऊन ते एकत्र माडून त्याच्या आकृत्या तयार करण्यात मुलाच्या ज्या खेळकर कृति होतात त्यास ग्रूस्

सकलनात्मक क्रीडा ( Synthetic play ) असे नाव देतो यात मुलाची जिज्ञासा व रचनात्मक प्रवृत्ति दिसून येते

ग्रूसने केलेल्या वरील वर्णनात सर्व तऱ्हेचे खेळ आले नाहीत काही खेळात जी आराधना प्रवृत्ति ( Courtship ) आढळते तिचे वर्णन ग्रूसने कोठेहि केले नाही या आराधनेच्या कृतिहि पुढील तरुण आयुष्यातील आराधना-प्रवृत्तीचीच तयारी करतात असे म्हणता येईल

(२) समावर्तन सिद्धान्त (Recapitulation Theory) —या सिद्धाताप्रमाणे मूल लहानपणी आपल्या खेळात मागे होऊन गेलेल्या सर्व पिढ्यातील माणसाच्या प्रगतीची पुनरावृत्ति करते हा सिद्धात स्टॅन्ले हॉल्ने माडला आहे *

उदाहरणार्थ, प्रत्यक्ष बोलू लागण्यापूर्वी मूल खाणाखुणा करते या खाणाखुणा म्हणजे भाषेच्या विकासातील एक जुनी पायरीच होय प्रत्यक्ष बोल लागण्यापूर्वी वेडेवाकडे आवाज काढणे, धनुष्यबाण घेऊन खेळणे, लैगिक जिज्ञासा वगैरे कृतिहि या मताच्या पुष्ट्यर्थ पुढे केल्या जातात

(३) **मनोविश्लेषणवादी मत** — (Psycho-analytic view ) मानसोपचार-शास्त्रज्ञानी क्रीडेचे स्पष्टीकरण असे केले आहे की मुलाच्या खेळात त्याच्या मनात चाललेल्या भावनाच्या व विचाराच्या झगड्याचे प्रतिबिब दिसत असते लहान मुलगी बाहुली घेऊन खेळताना ती ज्या तऱ्हेच्या कृति करते, ज्या तऱ्हेने बोलते, त्या सर्वातून तिच्या आईची तिच्याशी वागणक व त्या वागणकीला तिच्याकडून मिळणाऱ्या प्रतिक्रिया याचेच चित्रण झालेले दिसून येते

या मतातहि फारसा सत्याश नाही काही वेळा मुलाच्या खेळातून त्याच्या मनातील झगडा दिसेल हे जरी खरे असले तरी सामान्य मुलाच्या शेकडा नव्वद खेळात असा झगडा सहसा दिसणार नाही मनातील

* 'I regard play as the motor habits and spirit of the past of the race, persisting in the present as rudimentary organs.'

झगडयाचा आभास उपन्न करणारा खेळ विकृतमज्ज (neurotic) मुलाच्या बाबतीतच अधिक शक्य आहे पण क्लीन्‌ने असे म्हटले आहे की विकृतमज्ज मुले सामान्य मुलाप्रमाणे खेळूच शकत नाहीत

**काम** —तात्कालिक सुख देणाऱ्या कृति करून फक्त मनुष्यप्राणी थाबत नाही तर प्रथम खूप कष्टप्रद व त्रासदायक वाटणाऱ्या पण त्यापासून दूरच्या भविष्यकाळात फायदा होणाऱ्या किंवा सुखप्रद होणाऱ्या बऱ्याच कृति करण्यात तो गुतलेला आढळतो अशा कृतींना काम ही संज्ञा देता येईल काम करण्यास प्रवृत्त करणारी पुष्कळ कारणे असू शकतील (१) काम न केल्यास होणारी शिक्षा टाळण्यासाठी काम करावेसे वाटते पाठीवर चाबूक बसेल या भीतीने घोडा अगर बैल धावतो (२) पुढे मिळणाऱ्या सुखाच्या आशेने मनुष्य कष्टप्रद काम करण्यास तयार होतो दिवसाच्या शेवटी मिळणाऱ्या मजुरीच्या आशेने मनुष्य दिवसभर काम करतो

कटाळवाणे काम असले तरी ते बराच वेळ करण्याची चिकाटीहि फक्त मनुष्य प्राण्यातच असू शकते जनावरे काम करतात, ती फक्त शिक्षेच्या भीतीने कोणत्याहि मानवी समाजाची सुधारणा त्या समाजात कटाळवाणी कामे चिकाटीने करणाऱ्या माणसाच्या सख्येवरच अवलबून असते

कामाच्या सुरवातीला स्फूर्तीची जरुरी असते पण एकदा कामाची सवय झाली की मग प्रलोभनाची जरूर नसते घोडयाला रोज बराच वेळ कामाला जुपले की पुढेपुढे तो आपोआप सवयीनेच ते काम करू लागतो

क्रीडा व काम याच्यामध्ये भेद दाखविणारी एक स्पष्ट रेषा काढतां येणार नाही कारण लहानपणी ज्या तऱ्हेच्या हालचाली फक्त मौजेच्या दृष्टीने आपण करीत असतो, त्याच तऱ्हेच्या कृति जर पुढे जीवन जगण्यासाठी आवश्यक म्हणून कराव्या लागल्या तर त्यात श्रम असे काही वाटतच नाहीत. रानटी लोकाची मुले लहानपणी गमत म्हणून धनुष्यबाण कसा वापरावा हे शिकतात. पण पुढे पोटाचा धदा म्हणून जरी शिकार करावी लागली तरी त्यात त्याना त्रास वाटत नाही कारण एक तर त्या आवडीच्या कृति असतात व दुसरी गोष्ट म्हणजे सवयीने त्या अगवळणी पडतात.

सुधारलेल्या समाजात तर नुसते बसून राहणे व कष्टप्रद काम करणे या गोष्टीना मारखीच विलोभने असतील, तर कामाची आवड दाखविणाऱ्या माणसाचेच प्रमाण अधिक दिसून येईल आवडणारी आनददायक हालचाल अशीच जर खेळाची व्याख्या करावयाची असेल, तर कामाकडेसुद्धा खेळा-इतक्याच आवडीने पाहणारी माणसे भेटतील म्हणूनच काम व खेळ याच्यात भेद दाखविणारी एक रेपा काढता येणार नाही

कामामुळे मिळणारे फळ जर तत्कालिन नसेल तर कामात उत्साह वाटणार नाही व कटाळा येईल हे खरे आहे पण सामान्य माणसाच्या बाबतीत जसजशी विचारशक्ति वाढेल तसतशी विलोभने न दाखविता काम करण्याची सवय समाजाला लावली पाहिजे माराच्या भीतीनेच जर एखाद्या मुलाला अभ्यासाला लावण्याचा प्रयत्न केला तर तो कधीहि यशस्वी होणार नाही

सुधारलेल्या समाजात व्यक्तीच्या निरपेक्ष कामावरच प्रगति अवलबून असल्याने काम कसे व कोणत्या पद्धतीने करावे यासबधीचे वळण लहान-पणापासूनच मिळणे फार जरूर आहे मुलाच्या व्यवसायात काम व खेळ असा फारसा फरक नसतोच अगदी लहान मुलात शारीरिक हालचाल व त्यातून निर्माण होणारा आनद हेच त्या हालचालीचे ध्येय असते जेव्हा मुले काही रचनात्मक कृति करू लागतात त्या वेळी मात्र त्या कृतीचे ध्येय कृतीपासून भिन्न असते या तऱ्हेच्या कृतीना काम ही सज्ञा देता येईल ध्येयाची वाढ जसजशी होईल त्याप्रमाणे कामाची कुवत वाढेल अगर कमी होईल

**सवय**.—क्रीडा व काम याबद्दल आपण विचार केला या दोन्ही गोष्टी सुकर होण्याला त्यातील हालचालीची पुनरावृत्ति अनेकदा व्हावी लागते या पुनरावृत्तीचे पर्यवसान सवयीत होते तसे पाहिले तर प्राण्याचे सर्वच वर्तन सवयीनी भरलेले आहे, " We are but a walking bundle of habits " हे विधान पुष्कळ अशी खरे आहे आपले उठणे, बसणे, पोषाख करणे, खाणे,पिणे इत्यादि क्रिया इतक्या यत्रवत् होतात की त्या करताना बुद्धीला यत्किचितहि त्रास द्यावा लागत नाही सवयीचे प्रस्थ एवढे मोठें असते की ती माणसाच्या स्वभावाचा अविभक्त भाग बनते. आपले सद्गुण,

त्याचप्रमाणे दुर्गुण हे सवयीचे परिपाक आहेत व्यक्तीप्रमाणे समाजहि सवयीने बद्ध असतो हे आपल्या सहज लक्षात येईल

सवय ही मानवी आयुष्यात फार उपयुक्त आहे यात शका नाही इष्ट क्रिया यत्रवत् होऊ लागल्या, म्हणजे बुद्धीला दुसऱ्या अनेक उपयुक्त गोष्टीकडे लक्ष देण्यास अवकाश मिळतो दररोजच्या बारीक-सारीक गोष्टी करण्याकडे जर आपण रोजच्यारोज बुद्धि खर्च करू लागलो, तर नुसते जिवत राहण्या-पलीकडे आपल्या हातून काही होणार नाही म्हणून शक्य तितक्या लवकर नित्याच्या आवश्यक गोष्टी यत्रासारख्या सुरळीत व थोडक्या वेळात कशा करता येतील याकडे सुरवातीस लक्ष पुरवावे व सवयी निर्माण कराव्या. अर्थात् सवयी दोन्ही तऱ्हाच्या तयार होऊ शकतील, चागल्या व वाईट चागल्या सवयी इतक्याच वाईट सवयी लवकरच बद्धमूल होतात व त्या उखडून काढणे पुढे जड जाते

सवयी शारीरिक असतात, त्याचप्रमाणे त्या मानसिक व बौद्धिकहि असू शकतात एकदा सवयी निर्माण झाल्या म्हणजे मनाची व बुद्धीची स्वतत्रतेने सकल्प करण्याची व विचार करण्याची पात्रता कमी होते शारी-रिक सवयीमुळे नसासस्थेचा लवचिकपणाहि नाहीसा होतो या तोटयाच्या बाजू असल्या तरी सवयीमुळे होणारे लाभ अधिक असल्यामुळे सवयीना महत्त्व आहे असेच पुष्कळ शास्त्रज्ञाचे मत आहे

सवयी कशा तयार होतात हे पाहणेहि मजेचे आहे एखादी गोष्ट पहिल्यादाच करताना आपणास जड जाते, परतु जरा लक्षपूर्वक आपण ती गोष्ट परत परत करू लागलो की ती गोष्ट सुकर होऊ लागते व हाच अभ्यास जरा नेटाने चालू ठेवला की हळहळू ती गोष्ट यन्त्रवत् होऊ लागते शेवटी ती करताना मुद्दाम लक्ष देण्याचीहि आवश्यकता राहात नाही उदाहरणच पाहिजे असल्यास आपल्या केसाचे देता येईल प्रथम केसाना विशिष्ट वळण देण्यासाठी आपली किती धडपड चालते ! पण एकदा का ते वळण बसले की केस त्याच स्थितीत आपोआप राहू लागतात किवा कागदाच्या घडया पाहा. एकदा कागदाला लक्षपूर्वक आपण घडया घातल्या आणि मग तो कागद उघडला, तरी तो घडया घातलेल्या ठिकाणीच परत आपसुख दुमडतो.

आपल्या नसासस्थेच्या मार्गाचेहि असेच आहे हे मार्ग प्रथम तयार करताना फार लक्ष द्यावे लागते, पण एकदा का तयार झाले, मग ती गोष्ट करावयाची म्हटली की नसासस्थीय मार्ग आपले कार्य बिनबोभाट करतात वार्धक्यात नसासस्था क्षीण होतात म्हणूनच चागल्या सवयी लावून घेण्याला योग्य काळ म्हणजे तारुण्यापर्यंतचा होय

सवयीच्या निर्मितीत पुनरावर्तनाला किती महत्त्व आहे हे आता आपल्या ध्यानात आले असेल लक्षपूर्वक पुनरावर्तन किंवा अभ्यास, व विशिष्ट गोष्टीची सवय लावून घेणार ही मनाची तळमळ या दोन गोष्टीत सवयी मूळ धरू लागतात यालाच अभ्यासनियम (Law of Exercise) असे म्हणतात पुढे हा अभ्यास जसजसा यशस्वी होतो, तसतसा आपला आनद वाढतो व आपल्या अभ्यासाला जोर चढतो उलट या अभ्यासात कठीणपणामुळे आपणास वारवार अपयश आले तर आपण कष्टी होतो या यशापयशालाहि सवयीच्या निर्मितीत महत्त्व आहे याला परिणामनियम ( Law of Effect) म्हणतात सवयीच्या निर्मितीत आरभकालाला फार महत्त्व असते निश्चयपूर्वक व सारे मन एकाग्र करून आरभकालात आपण एखादी विशिष्ट गोष्ट अगवळणी पाडण्याचा प्रयत्न केला तर यश दुरावत नाही पहिले सस्कार जितके तीव्र तितके ते अधिक स्थिर म्हणून एखाद्या गोष्टीची सवय लावून घेताना आरभकाळी तरी आपल्या अभ्यासात अपवादाला जागा देऊ नये लागलेल्या वाईट सवयी मोडण्याचा प्रयत्न करताना तर अपवाद निश्चयाने टाळलाच पाहिजे 'आजचाच दिवस एकच प्याला, उद्या नाही " अशा सबबीवर माणूस वागला तर त्याची वाईट सवय केव्हाच नष्ट होणार नाही

सवयी निर्माण करताना अगर एखादी सवय मोडताना व्याख्यान-प्रवचनापेक्षा कृतीची किमत अधिक असते. या कृतीला निश्चयाची जोड पाहिजे हे उघडच आहे

या विवेचनावरून लहान मुलाच्या बाबतीत आईबापानी, घरच्या वडीलधाऱ्या मडळीनी, शाळेत गुरुजीनी किती काळजी व खबरदारी घेतली पाहिजे हे स्पष्ट होते. दक्षता, स्वच्छता, सदाचार, सत्य, प्रामाणिकपणा हे

शारीरिक व मानसिक सद्‌गुण मुलाच्या ठायी निर्माण करून त्याचे रूपांतर सवयीत झाले, म्हणजे त्या मुलाच्या व्यक्तित्वाच्या व व्यक्तिमत्त्वाच्या वाढीत आपण फारच मोठे साह्याय्य केल्यासारखे होईल

सवयी निर्माण कराव्या की करू नये, या बाबतीत शास्त्रज्ञात एकमत नाही काही तर एकान्तिक मताचे आहेत जेम्स् हा या निर्मितीवर आत्यतिक भर देणारा आहे रूसो, ग्रॅहॅम वालस्, ड्युई, किल्पॅट्रिक् हे दुसऱ्या टोकाला जातात त्यांच्या मते सवयी या स्वतंत्र विचार करण्याच्या क्रियेला घातक ठरतात सवयीच्या आहारी पडणे म्हणजे मनुष्याने स्वत्व घालविणे व पशु बनणे असे त्याचे मत रूसोचे एक विरोधाभासात्मक सुंदर वाक्य आहे, "तुम्हाला सवय लावून घ्यावयाची असेल, तर कोणतीहि सवय लावून न घेण्याची सवय निर्माण करा " बहात्तर रोगाला एकच औषध देणाऱ्या वैद्याची पद्धति आणि सवय याचे स्वरूप एकच!

या दोन एकांतिक मतांतून सुवर्णमध्य काढणे शक्य आहे आणि जेम्स्‌ने तो काढलाहि आहे साधीसुधी नित्याची कामे, परिपाटीने करावयाच्या गोष्टी यात बुद्धीचा वेळ जाऊ नये, या बाबतीत सवयी हव्यात एवढेच त्याचे म्हणणे आहे कारण सवयीमुळे वेळ वाचतो व तो अन्य उपयुक्त कामाकडे बुद्धि लावू शकते दुसरीहि एक गोष्ट ध्यानात ठेवावी एखाद्या गोष्टीची सवय लागली म्हणजे ती गोष्ट करताना मन मुळीच काम करत नाही असा त्याला अर्थ नाही सवयी म्हणजे प्रतिक्षिप्त क्रिया नव्हत कारण जरी एखादी क्रिया सवयीने होत असेल, तरी ती क्रिया ज्या परिस्थितीत होते, त्या परिस्थितीनुरूप तीत बदल होणे शक्य असते हा बदल करण्याला मनाची व बुद्धीची आवश्यकता, थोड्या प्रमाणात का होईना, लागतेच लागते आपणास कोणी भेटला तर जाता जाता आपली ओळख दाखविणे हा एक सदाचार आहे पुष्कळजण तो पाळतातहि पण या सदाचारात दृष्टीस पडणाऱ्या व्यक्तीमुळे कसे बदल होतात पहा एखाद्याच्या बाबतीत आपण स्मितहास्य करून नुसतीच मान हालवितो, एखाद्याला दोन्ही हात जोडतो, एखाद्याला काही प्रश्न विचारतो, एखाद्याच्या बाबतीत हस्तांदोलन करतो सदाचाराची सवय तर आहेच; पण त्या सवयीत सुद्धा किती प्रकार झाले पाहा एकंदरीत सवयी

असल्या तरी त्याच्या मागचे मन अजिवात निष्क्रिय होते असे म्हणणे सयुक्तिक वाटत नाही.

**थकवा** —याच प्रकरणात क्रीडा किंवा कार्य झाल्यावर येणाऱ्या थकव्याचा विचार करावयाचा आहे

एखादे यत्र ज्याप्रमाणे जरूर असलेल्या सर्व गोष्टीचा पुरवठा केल्यास सतत चोवीस तास काम देऊ शकते, त्याप्रमाणे मानवी शरीर व मन याची कार्यशक्ति अविरत असू शकत नाही मानवी जीवन जसे अपूर्ण आहे त्याचप्रमाणे मानवाची कार्यशक्तिहि मर्यादित आहे ज्या विषयात आपणास उपजत अभिरुचि असेल त्या विषयात आपण तासनतास मन केन्द्रित करू शकतो काही असामान्य शास्त्रज्ञ आपल्या संशोधन विषयाच्या विचारात एकदा गर्क झाले की त्याना ४८ ते ७२ तासपर्यंत तहानभूक तर राहाच, पण इतर नियमित शारीरिक विधीची आठवणहि त्यास रहात नसे, अशा तऱ्हेच्या कथा आपण ऐकतो न थकता खूप वेळ काम करण्यासाठी उत्तम शरीरप्रकृति, भरपूर कपडा, स्वच्छ व मोकळी हवा, बेताचे उष्णतामान पुरेसा उजेड वगैरे सर्व आदर्श परिस्थिति निर्माण केली तरीसुद्धा आपल्या कार्यशक्तीला कोठेतरी मर्यादा असतेच असे आपणास दिसून येते सर्व तऱ्हेची काळजी घेऊनहि एका ठराविक मर्यादेनतर आपण काम करू शकत नाही याचे कारण आपल्याला थकवा येतो हेच होय

हा थकवा दोन प्रकारचा असतो (१) मानसिक व (२) शारीरिक

ज्याला आपण मानसिक थकवा ( Mental Fatigue ) असे म्हणतो तो मेंदूला येत असतो आपला मेंदू ज्या द्रव्याचा तयार झालेला असतो त्यामध्ये कामाने होणाऱ्या फरकामुळे हा थकवा येतो म्हणून आपण त्याला मानसिक थकवा असे म्हणतो शारीरिक थकवा हा स्नायूच्या द्रव्यामध्ये कामामुळे जी झीज होते त्यामुळे निर्माण होतो व म्हणून त्यास स्नायुगत थकवा ( Muscular Fatigue ) असे म्हणतात

काम करतेवेळी होणारी झीज भरून निघण्यासाठी रक्तातून ऑक्सिजनचा सतत पुरवठा व्हावा लागतो मेंदूची व स्नायूची झीज होत असताना काही टाकाऊ विषारी वायू बाहेर टाकले जातात. हे विषारी वायू अशुद्ध

रक्तप्रवाहातून वहात जाऊन नतर कोणत्यातरी स्वरूपात शरीराच्या बाहेर पडतात आपण प्रत्यक्ष काम करीत असताना ही क्रिया फार जोरात चालू असते काही वेळाने या विषारी वायूचे प्रमाण एकसारखे वाढू लागते व त्याचे मुख्यत दोन परिणाम होतात

(१) स्नायुतनु मंदावतात, (२) टॉक्सिन नावाचे विषारी द्रव्य वाढते हीच दोन कारणे मनाला व शरीराला थकवा आणतात आपल्या मेंदूमध्ये जाणीवेचे ( Consciousness ) धारण करणाऱ्या ज्या पेशी असतात त्याच्यावर या (Toxins) विषाचा परिणाम फार लवकर होतो ही विषारी द्रव्ये शरीरात जर प्रमाणाबाहेर माजू लागली, व ती वेळेवर बाहेर पडली नाहीत तर त्याचा परिणाम मज्जातंतूवर होतो व त्यामुळे निश्चयशक्ति ( Will power ) व बुद्धि ( Intelligence ) याच्याहि कार्यावर विपरीत परिणाम होतो प्रत्यक्षात आपणास असे दिसून येते की शारीरिक थकव्याने मानसिक थकवा येतो व मानसिक थकव्याने शारीरिक थकवा येतो (१) आपण ६–७ तास खूप शारीरिक श्रमाचे काम करून घरी आलो व घरातील व्यक्तीने एखादा अप्रिय विषय काढला किंवा एखाद्या आगामी काळजीची सूचना दिली तर आपण ताबडतोब त्रासून जातो अशा वेळी मनाचा तोल लवकर सुटण्याचे कारण मनहि शरीराप्रमाणेच थकलेले असते हे होय किंवा (२) अशी कल्पना करा की तुम्ही अगदी उत्साहाने ५–६ मैलाची रपेट करावयासाठी म्हणून बाहेर निघणार इतक्यात पोस्टमनने तुमच्या हातात एखादी दु खद बातमी देणारी तार आणून दिली मन एकदम खचते. त्याचबरोबर तुमचे हातपायहि गळून जातात तुम्ही मटकन् खाली बसता व पाचच मिनिटापूर्वीचा तुमचा तो रपेटीचा उत्साह कोठल्या-कोठे निघून जातो यावरूनहि हेच दिसते की मन थकले किंवा कमकुवत झाले की शरीरहि थकते (३) ज्या माणसाला लहानपणापासूनच अत्यत मानसिक त्रासात दिवस काढावे लागतात त्याचे शरीरहि लवकर थकते याच अर्थी मराठीत अशी एक म्हण प्रचारात आहे की चिंता माणसाला चितेवर निजविते

आत्यतिक थकव्याने एखादे वेळी मृत्युहि येतो अशा रीतीने आपल्याला बराच काळपर्यंत कार्यक्षम रहावयाचे असल्यास शरीर व मन याना अति ताण पडता कामा नये.

प्रयोगिक मानसशास्त्रज्ञानी शारीरिक व मानसिक थकवा मोजण्याची साधनेहि उपलब्ध करून दिलेली आहेत मनुष्यास शारीरिक अगर मानसिक थकवा आलेला आहे की नाही हे शोधून काढण्यासाठी काही चाचणी-परीक्षा घेणे शक्य आहे या कसोट्या दोन प्रकारच्या हातील (१) शारीरिक, (२) मानसिक (१) बराच वेळ उजव्या हाताने काम केल्यानतर ते स्नायु जर थकलेले असतील तर त्यावेळी त्या माणसाला एखादी दोरी जोरात ओढण्यास सागावी किवा मुठीत एखादी वस्तु घट्ट आवळून धरण्यास सागावी. त्याचा हात कापतो यावरून हाताचे स्नायु थकलेले आहेत हे सिद्ध होते. (२) बराच वेळ डोळ्याचे काम केल्यानतर दृष्टि शिणते व अशा वेळी समोरच्या दोन वस्तूमधील सूक्ष्म भेद कळत नाही, (३) बराच वेळ अभ्यास केल्यानतर ज्या प्रश्नाचे उत्तर शोधून काढण्यास बुद्धिमत्तेची जरुरी आहे असे प्रश्न नकोसे वाटतात त्याची उत्तरेहि झटदिशी सुचत नाहीत अशा-रीतीने निरनिराळ्या कसोट्या घेऊन मनुष्य थकलेला आहे की नाही हे शोधून काढता येते अर्थात् अशा तऱ्हेच्या चाचणी-परीक्षा शभर टक्के विश्वासार्ह मानता येणार नाहीत

**थकव्याचे परिणाम**—सर्वसामान्यत असे म्हणता येईल की थकवा आल्यानतर कोणतेहि काम सुरू ठेवणे अशक्य होते हट्टाने आपण काम चालूच ठेवले तर त्यात चुका होऊ लागतात खूप वेळ गणिते करून डोके शिणल्यानतर जर हट्टाने आपण आणखी काही उदाहरणे करण्याचे ठरविले तर साध्या साध्या बेरजावजाबाक्याहि चुकतात लेखनाचे कामहि जर थकवा आल्यानतर आपण करीत राहिलो तर लिहिण्यात चुका होतात व खोडाखोड करीत बसावे लागते. थकवा अतिशय आलेला असेल तर आवडते कामहि नकोसे वाटू लागते कटाळवाण्या कामामुळे जर थकवा आलेला असला तर काम बदलावे असे वाटते. आठ तास कारकुनी करून आलेला माणूस घरी आल्यानतर चार तास ब्रिज् खेळू शकतो याचे कारण इतकेच की ऑफिसचे काम नावडते असल्याने त्यापासून त्याच्या मेंदूला अधिक थकवा येतो व ब्रीज् हा खेळ आवडता असल्याने त्यात वाटेल तितके तास डोके घालून बसले तरी त्यास थकव्याची जाणीव येत नाही. खराखुरा थकवा आलेला असताना मनुष्य झोप व विश्राति याचीच इच्छा करतो.

आतापर्यंत मानसिक व शारीरिक थकव्यासबधी केलेल्या निरीक्षणावरून शास्त्रज्ञाना असे आढळून आलेले आहे की सकाळपासून दुपारी बारा वाजेपर्यंत थकव्याचे प्रमाण हळूहळू वाढत जाते, बारा ते दोन वाजेपर्यंत ते आणखी वाढते व त्यानतर कमी कमी होऊ लागते पुन्हा सध्याकाळपर्यंत हे प्रमाण वाढत जाते काम नावडते असल्यास थकवा लवकर येतो कामाची सक्ती केल्यासहि थकवा लवकर येतो

वरील निर्णय ध्यानात घेऊन आधुनिक शिक्षणशास्त्रज्ञानी असा निष्कर्ष काढला आहे की सर्वात अवघड विषय समजावून देण्यास उत्तम वेळ म्हणजे सकाळची, त्यातल्या त्यात पहिल्या तासापेक्षा दुसऱ्या तासाला मुले जास्त तरतरीत व उत्साही असतात

केम्सीस् या नावाच्या शिक्षणतज्ज्ञाने सर्वात अधिक थकवा आणणाऱ्या विषयापासून सर्वात कमी थकवा आणणाऱ्या विषयापर्यंत उतरत्या क्रमाची एक यादी तयार केली आहे ती अशी (१) तालीम, (२) गणित, (३) प्रचलित भाषा, (४) धर्मग्रथ, (५) जन्मभाषा, (६) प्रचलित इतिहास व भूगोल, (७) इतिहास, (८) सगीत व चित्रकला पण ही यादी सर्वांनाच मान्य होईल असे नाही

क्रोन् नावाच्या शास्त्रज्ञाने ४०,००० मुलाच्या चाचणीपरीक्षा घेतल्या व दिवसातील कोणत्यावेळी स्मरणशक्ति जास्तीत जास्त ताजी असते ते पाहिले विषयाची मांडणी काळजीपूर्वक न करता सकाळी कोणताहि विषय जरी पहिल्या तासाला घेतला तरी स्मरणशक्ति ८१% असते व शेवटच्या तासाला सकाळी स्मरणशक्ति ६३% असते

दुपारी पहिल्या तासाला ,, ७५% ,,
दुपारी शेवटच्या तासाला ,, ७७% ,,

यावरून त्याने असा निर्णय काढला आहे की, शालेय शिक्षणक्रमाची शास्त्रशुद्ध योजना केली तर शे. १० ते १२ एवढ्या प्रमाणात एका दिवसाच्या कालावधीत मुलाची स्मरणशक्ति वाढते यामुळे मुलाच्या शालेय जीवनात दहा वर्षांचे काम नऊ वर्षात होते एक वर्षाची बचत होते

---

## प्रकरण ११ वें

# व्यक्तिमत्त्व (Personality)



व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास करताना परिस्थिति व अनुवंश या दोन गोष्टींचा विचार फार महत्त्वाचा आहे व्यक्तीत जन्मजात प्रवृत्ति कोणकोणत्या असतील त्यावर व्यक्तिमत्त्वाचा विकास बऱ्याच प्रमाणावर अवलंबून असतो मुलाच्या शारीरिक वाढीबरोबरच होणारी त्याची मानसिक वाढ व त्या वाढीस कारणीभूत होणाऱ्या निरनिराळ्या भोवतालच्या गोष्टी याचा विचार न केल्यासहि व्यक्तिमत्त्व स्पष्ट होणार नाही कारण मुलाच्या आयुष्यात निरनिराळ्या काळात वेगवेगळ्या आवडीनिवडी व छंद निर्माण होत असतात व वेगवेगळ्या काळात मुलाच्या कर्तृत्वशक्तीस प्रेरणा देणारे प्रेरकहि वेगवेगळे असतात.

अगदी लहान मुलाचे निरीक्षण केल्यास असे दिसून येते की त्याच्यात असणारे काही स्वभावधर्म कोणत्याच परिस्थितीचे परिणाम म्हणून म्हणता येणार नाहीत एका मानसशास्त्राने एक वर्षाच्या आतल्या मुलाचे दर चार आठवड्यानी निरीक्षण केले, तेव्हा असे दिसून आले, की त्याच्या स्वभावातील जो विशेष ३–४ महिन्यात दिसू लागतो तो वयाच्या वाढीबरोबर पक्का होत जातो जे मूल हसरे असते त्याला हसण्यास अगदी लहानसा प्रेरकहि पुरतो वाढत्या वयाबरोबर त्याची ती हसरी प्रवृत्ति वाढलेलीहि दिसून येते. जे मूल रडके किंवा किरकिरे असते ते सर्वच बाबतीत तसे असलेले दिसून येते, व त्याची ती प्रवृत्ति वाढत्या वयाबरोबर स्थिर होत जाते. यावरून मुलाच्या स्वभावातील काही प्रवृत्ति अगदी लहानपणापासूनच दिसू लागतात असे म्हणण्यास हरकत नाही. काही स्वभावविशेष एका जमातीतील सर्व व्यक्तीत पिढ्यान्‌पिढ्या कायम असलेले दिसून येतात.

काही जमाती प्रवृत्तीने गरीब व थंड असतात, तर काही अत्यंत उतावीळ व भावनाप्रधान असतात. आणखी एक गोष्ट अशी की काही मंडळी शारीरिक दृष्ट्या अगदी सारखी असतात, पण त्यांच्या स्वभावात फार भिन्नता असते. दक्षिण इंग्लंड व उत्तर फ्रान्स येथील लोकात हा विशेष दिसून येतो ज्या सामाजिक परिस्थितीत मनुष्य वाढेल त्यावर त्याचे व्यक्तिमत्त्व अवलंबून राहील, हे जितके खरे तितकेच मनुष्य जन्मत कसा आहे हेहि दृष्टोआड करता येत नाही मनुष्यातील काही स्वभावविशेष असे असतात की ते कोणत्याहि सामाजिक परिस्थितीत बदलू शकत नाहीत

निरनिराळी स्वभाववैशिष्ट्ये पक्की होण्याच्या दृष्टीने वयाची पहिली तीन वर्षे फार महत्त्वाची असतात. आरंभी मुले कोणत्याहि वेदनांना योग्य अशी एकच प्रतिक्रिया न करता अस्पष्ट अशा विविध व अयोग्य प्रतिक्रिया करीत असतात पण पुढे पुढे त्यांचे ज्ञान जसजसे वाढत जाते तसतसा या प्रतिक्रिया निश्चित होत जातात मुलाचे शिक्षण म्हणजे बाह्य जगाच्या प्रत्येक प्रेरकामुळे निर्माण होणाऱ्या वेदनास योग्य अशी प्रतिक्रिया करणे. अर्थात् अनुभव जसजसा वाढेल तसतशा अयोग्य प्रतिक्रिया आपोआपच गळतात निश्चित झालेल्या लहानलहान प्रतिक्रिया एकत्रित होऊन वर्तणुकीचे घटक स्थिर बनतात पक्क्या झालेल्या सवयी म्हणजे लहानलहान मूळ प्रतिक्षेप क्रियांचे संकलन होऊन तयार झालेले साचेच होत लहान मूल प्रथम अर्थशून्य शेकडो आवाज काढीत असते, त्यातूनच पुढे अर्थपूर्ण शब्दोच्चार पक्के होऊन अर्थशून्य आवाज गळतात

प्रेरकाचे स्वरूपात साम्य असल्यामुळे त्या अनुरोधाने मुलाचे स्थिरभावहि बनत जातात. एखाद्या मुलाला लहानपणी औषधाची धास्ती बसली की पुढे कित्येक वर्षे कोणतीहि बाटली दिसली की औषधाची कल्पना त्याच्या मनात येते व ते घाबरते. पुष्कळसे भाव मोठ्या माणसाच्या अनुकरणाने मूल संपादन करते. उदा० हिंस्र प्राण्याची भीति.

अशा रीतीने वर्तणुकीचे साचे एकीकडे पक्के होत असताना मुलाचे स्वत्वहि वाढीस लागलेले असते. वेदनातून अवबोध (Percept) अवबोधातून प्रबोध ( Apperception, ) प्रबोधातून स्थिरभाव व हे स्थिरभाव धारण करणारे स्वत्व या सर्वांतूनच व्यक्तिमत्त्व दृग्गोचर होत असते.

मुलाच्या भोवतालची मडळी सारखा सर्वनामाचा व विषेशनामाचा उपयोग करीत असतात त्यातूनच मूल स्वत व बाह्यजग ह्यात भेद करावयास प्रथम शिकते. याचवेळी त्याच्या सुखात्मक स्वाभाविक प्रवृत्तीची धडपड व या धडपडीत इतर मोकळया मटळीचा येणारा अडथळा यावरून अत सृष्टि व बाह्यजग यातील फरक मुलाला अधिक स्पष्टपणे कळतो. स्वत्व ( Self) कोठे असते, या प्रश्नाचे एक निश्चित उत्तर देता येणार नाही मेंदूचा जास्त खोल अभ्यास करण्यापूर्वी माणसाची अशी समजूत होती की स्वत्व हे हृदयात असतें नतर त्याचे ठिकाण मेंदू हे ठरविण्यात आले पण ही सर्व गृहीतकेच होत

दोनतीन वर्षाच्या मुलात आत्मकेन्द्रिता (Egocentricity) हा विशेष प्रकट होतो यावेळी स्वत्व (Self) व परत्व (Not-self) यातील मर्यादा त्याला स्पष्टपणे कळत नसतात दुसरी गोष्ट अशी की मुलाच्या सर्व कृति व भाषा ही फक्त त्याच्या स्वत.पुरतीच असतात. दुसऱ्याने काही प्रतिक्रिया करावी अशी त्याची अपेक्षा नसते.

भाषणात स्वत चेच उल्लेख प्रामुख्याने करणे, दुसऱ्याच्या भूमिकेवरून कोणतीहि गोष्ट न पाहणे अगर कोणत्याहि गोष्टीचा विचार न करणे ही आत्मकेन्द्रितेची मुख्य लक्षणे होत

अगदी लहानपणापासून मुलाच्या ठिकाणी प्राथमिक सहानुभूति ( Primitive Sympathy ) हा धर्म दिसून येतो. एक लहान मूल रडू लागले की जवळ असलेली दुसरी मुलेहि रडू लागतात ही गोष्ट नित्याचीच आपण पाहतो

एका अर्थी लहानपणी मलाचे स्वत्व फक्त त्याच्या शरीरापुरतेच मर्यादित नसते त्याच्या जवळच्या व जिव्हाळयाच्या सर्व व्यक्ति व वस्तु याचा त्यात समावेश झालेला असतो चार-पाच वर्षांचे झाल्यावर मुलाला स्वत.चा वेगळेपणा अधिक स्पष्टपणाने भासु लागतो. व स्वत्व प्रस्थापनास मदत करणाऱ्या चढाओढीच्या नैसर्गिक प्रवृत्तीकडे ते वळते.

वर सागितलेल्या सर्व बाजूनी सर्वसामान्यतः मुलाचे व्यक्तिमत्त्व

वाढत असते यानतर व्यक्तिवैशिष्टचे कशी प्रकट होतात व त्याचा एकंदर व्यक्तिमत्त्वाच्या विकासावर काय परिणाम घडतो ते पाहू.

मुलाच्यात दिसून येणारे पहिले वैशिष्टच म्हणजे काही मुले अन्तवर्ती ( Introvert ) व काही मुले बहिर्वर्ती ( Extrovert ) प्रवृत्तीची असतात. अतर्वर्ती मुलाचा सर्व कल स्वत च्या स्वतात गर्क होण्याचा असतो अशा मुलाला पुष्कळशा खेळण्याची अगर मनोरजन करण्यास इतर मुलाची जरुरी नसते वाटेल तितका वेळ ते स्वत शीच खेळ शकते पण बहिर्वर्ति मुलाला हे जमत नाही. त्याला सवगडी व बाह्य वातावरण याचे आकर्षण दाडगे असते

२ ते ६ वर्षाच्या मुलावर आतापर्यंत जे बरेच प्रयोग करण्यात आले त्यावरून असे दिसून आले आहे की प्रत्येक मुलाच्या काही प्रवृत्ति नैसर्गिक व मुळच्याच असतात काही मुले अकाडताडव करून आपलाच हेका चालविणारी असतात, तर काही अतिशय भित्री व चटकन् दडपली जाणारी असतात काहीना मुले जमवून खूप खेळावयास आवडते तर काहीना एकलकोडेपणा अधिक प्रिय असतो. या प्रवृत्ति दोन-तीन वर्षापासूनच व्यक्त होऊ लागतात

मुलाच्या नैतिक प्रवृत्ति कोणत्या तऱ्हेच्या बनतील हे मुख्यत दोन गोष्टीवर अवलबून असते. (१) त्याच्या भोवतालचे वातावरण व (२) शिक्षण आतापर्यंत बऱ्याच मानसशास्त्रज्ञानी प्रामाणिकपणा, औदार्य, आत्मसयम व चिकाटी या चार गुणाबाबत बरेच निरीक्षण केले त्यावरून त्याना असे दिसून आले आहे, की मुलाच्या अगात प्रामाणिकपणा आहे की नाही याची पारख होण्यास शाळेचा वर्ग, साघिक खेळ, व व्यक्तिगत चढाओढी याचा फार उपयोग होतो या सर्व ठिकाणी मूल खोटे बोलते का, फसविते का, किंवा चोरते का, याची चागली प्रचीति मिळते एका प्रयोगात प्रामाणिकपणाची परीक्षा घेण्यासाठी निरनिराळ्या नऊ चाचण्या घेण्यात आल्या. मुलाचे दोन गट पाडले होते. एका गटात घरगुती उत्तम वातावरण, उत्तम शिक्षण व उत्तम परिस्थिति असलेली चागल्या कुळातील मुले व दुसऱ्या वर्गात आईबाप गरीब असलेली व कोणत्याहि सुखसोयी न

मिळणारी दलित कुलांतील मुले होती. प्रत्येक वर्षी या गटांची चाचणी घेण्यात येई. काही वर्षांनतर असे आढळून आले की उच्च कुलीन मुलाचा प्रामाणिकपणा वाढत गेला व हीन कुलातील मुलाचा अप्रामाणिकपणा वाढत गेला साधिक नीतिमत्ता (Class-Room Morality) हा गुणहि शाळेत जाणाऱ्या मुलात फार तीव्रतेने असलेला आढळतो. वर्गातील पुढारी मुलगा जसे सागेल तसे इतर मुले वागत असतात अशा वेळी पुढारी मुलाचे सद्गुण अगर दुर्गुण इतर मुलात येण्याचा सभव फार असतो

प्रामाणिकपणा, औदार्य, आत्मसयमन व चिकाटी या चार गुणाची वाढ शालेय जीवनात होऊन त्यातूनच मुलाचे शील बनत असते या चारी गुणाच्या वाढीचा नकाशा पाहिल्यास असे आढळून येते की त्याची पार्श्वभूमि एकाच व्यक्तिमत्त्वाने चित्रित झालेली असते. हे व्यक्तिमत्त्व घडण्यास ज्या बऱ्याच गोष्टी कारणीभूत होतात, त्यापैकी बुद्धिमत्ता, कुटुबाचा सामाजिक व आर्थिक दर्जा, मुलाची सूचनाग्रहणशक्ति, धर्म, शरीरप्रकृति, नैसर्गिक कल, नैतिकप्रवृत्ति वगैरे गोष्टी महत्त्वाच्या म्हणून सागता येतील मुलाचे शील तयार होताना कुटुब, मित्रमडळी, शाळा, शिक्षक, खेळ या सर्वाचा भाग फार महत्त्वाचा असतो.

गेल्या काही वर्षात व्यक्तिवृत्तचिकित्सा (Case-study) निघाली. त्यात निरनिराळ्या व्यक्तीच्या आयुष्यक्रमाचा अभ्यास करून त्याच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल काही सामान्य सिद्धान्त काढता येतील की काय, हे पाहण्याचे प्रयत्न सुरू झाले अशा तऱ्हेच्या चिकित्सेत दोन भाग मुख्य असतात (१) कोणकोणत्या नियमानुसार शील अगर व्यक्तिमत्त्व तयार होते त्यासंबधीचे सामान्य नियम शोधून काढणे, व (२) कोणत्या विशिष्ट गुणामुळे ती व्यक्ति ठराविक तऱ्हेची बनली हे पाहणे इतर वेगवेगळ्या दृष्टिकोनातून मानसशास्त्राचा अभ्यास करण्यात मानसशास्त्रज्ञ गुग झाले आहेतच या निरनिराळ्या अभ्यासपद्धतीमुळे मनुष्यस्वभावाचे वेगवेगळे पैलू आपोआपच कळतात व त्यावरून एकूण व्यक्तिमत्त्व कळण्यास बरीच मदत होते. निरनिराळ्या गुणविशेषाचा एकमेकाशी काय सबध

आहे, याचा अभ्यास करतानाच व्यक्तिमत्त्वाचे सामान्य नियमहि स्पष्ट होऊ लागतात

गेल्या काही वर्षांत पाश्चात्य देशात मानसचिकित्सालये (Psychological Clinics) व बालदिग्दर्शन गृहे (Child Guidance Clinics) निघाली आहेत एखाद्या मुलातील एखादी प्रवृत्ति फार त्रासदायक असते. ती कशी सुधारावी हे पालकाना समजत नाही, असे मूल बालदिग्दर्शनगृहात पाठविले जाते तेथे प्रथम त्याची शारीरिक तपासणी होते नतर त्या मुलाला निरनिराळ्या चाचणीपरीक्षा देण्यात येतात त्याच्या सर्व दिनक्रमावर व हालचालीवर पूर्ण लक्ष ठेवले जाते त्या मुलाला हळूहळू आपल्या प्रेमात व विश्वासात घेऊन त्याच्या मनात कोणकोणत्या प्रवृत्तीची कसकशी आदोलने होत आहेत, या सबधीचे निरीक्षण करून शास्त्रज्ञ क्रमवार टिपणे तयार करतो मुलातील अनिष्ट प्रवृत्ति वेगळ्या अभ्यासून त्यावर उपाययोजना केली जाते.

व्यक्तिमत्त्वाच्या घडणीत आणखी एका शक्तीचा फार महत्त्वाचा वाटा आहे, ती म्हणजे निश्चयशक्ति. मनुष्याच्या निरनिराळ्या प्रवृत्तीना लगाम घालन त्याना ताब्यात ठेवणारी जी एक मोठी शक्ति प्रत्येकांत असते तिलाच निश्चयशक्ति असे म्हणतात. मनुष्य वयाने जो जो मोठा होत जातो तो तो प्रत्येक वेळी तो, स्वत्व एका पारड्यात व त्याला पोषक अगर मारक वर्तन एका पारड्यात घालून नेहमी तोलीत असतो निश्चयशक्ति ही इतकी दाडगी शक्ति आहे की तिच्या साहाय्याने ऐच्छिक कृतीवर तर मनुष्याला ताबा ठेवता येतोच; पण अनैच्छिक कृतीवरहि ताबा ठेवणे त्याला शक्य होते.

ज्या गुणविशेषामुळे व्यक्तिमत्त्व तयार होते ते गुणविशेष प्रयोगपद्धतीने मोजणे शक्य आहे, हेहि आता सिद्ध झाले आहे नुसता चेहरा पाहून व्यक्तिमत्त्वाची कल्पना करता येते असे काही जणाचे मत आहे पण यात फारसे तथ्य नाही व्यक्तिमत्त्व समजण्यास बराच अभ्यास करावा लागतो. बऱ्याच वर्षांच्या परिचयाने मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल केलेले निर्णय अर्थपूर्ण असतात. काही वेळा माणसाला सूचक प्रश्न विचारून त्याने दिलेल्या

उत्तरावरून व्यक्तिमत्त्वाचा थोडाफार उलगडा होऊं शकतो मोठ्या माणसांच्या व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास करण्यास वर्तननिकष (Behaviour test) हि फार उपयोगी पडतात. उदाहरणार्थ, हाताला तीव्र वेदना देणारा प्रेरक मनुष्य किती वेळ सहन करू शकतो, यावरून त्याच्या अंगातील सहनशीलता या गुणाची परीक्षा होते. व्यक्तिमत्त्व म्हणजे निरनिराळे गुणविशेष एकत्र येऊन तयार झालेली एक विशिष्ट संघटनाच होय. एका व्यक्तीत अशा अनेक संघटना म्हणजेच अनेक व्यक्तिमत्त्वे असू शकतील.

वर्तनवाद्याच्या मते प्रतिक्षेप हाच सर्व व्यक्तिमत्त्वाचा पाया होय. जेनेट् या मानसशास्त्रज्ञाचे मते निरनिराळ्या प्रवृत्ति किती प्रमाणात संघटित करता येतील, यावर सर्वसामान्य व्यक्तिमत्त्व अवलंबून आहे.

मानसोपचार-शास्त्रज्ञ असे म्हणेल की मनातील गूढ भागाचा अभ्यास जितका खोल होईल तितके व्यक्तिमत्त्वाचे अधिक पैलू स्पष्ट होतील. फ्राईडच्या मते व्यक्तिमत्त्वाच्या अभ्यासातील तीन मुद्दे महत्त्वाचे आहेत. (१) लैंगिक-प्रवृत्ति (२) मातापित्यासंबंधीचे गंड (३) मातापित्याच्या भूमिकेशी एकरूप होण्याचे प्रमाण शिक्षणाने मिळणारे वळण यावरच सर्व व्यक्तिमत्त्व अवलंबून आहे युंगच्या मते कोणत्याहि व्यक्तीत निरनिराळ्या गुणविशेषाचे साहचर्य कसे झाले हे पाहणे म्हणजेच व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास करणे होय अन्तर्वर्तिता अगर बहिर्वर्तिता या स्वभाववैशिष्ट्यावरच व्यक्तिमत्त्वाचा बराचसा भाग अवलंबून असतो. ॲड्लर्‌ने असे म्हटले आहे की सुरवातीला मूल भोवतालच्या वातावरणातील चेतकाच्या बाबतीत ज्या प्रतिक्रिया करते त्या त्याच्या अपक्वपणाच्या निदर्शक असतात. कारण त्यास अनुभव मुळीच नसतो त्याच्यात असलेल्या निरनिराळ्या प्रवृत्तीचे बळ कसे संघटित होईल हे त्याच्या कौटुंबिक व सामाजिक परिस्थितीवर आणि शिक्षणावर अवलंबन राहील जेनेट् व मार्बर्ग् याच्या मते व्यक्तिमत्त्वाचा बराचसा भाग शरीराच्या अवयवाच्या ठेवणीवर अवलंबून असतो. बांधा, उंची, अवयवाचे एकमेकाशी प्रमाण, शरीराची ठेवण वगैरे सर्व वैशिष्ट्यावर व्यक्ति कशी असेल हे अवलंबून असते. क्रेच्मर्‌ने असे नमूद केले आहे की ज्याच्या अवयवाची ठेवण लांब, सडक व किरकोळ असते ती माणसें

बहुतेक अंतर्वर्ती असतात. उलट गुटगुटीत व ठेंगणी माणसे बहिर्वर्ती, भावना-प्रधान व उथळ स्वभावाची असतात. पण या दिशेने आतापर्यंत करण्यात आलेल्या सशोधनात अजून बरेच अपूर्णत्व असल्याने हे निर्णय निश्चित मानणे योग्य नाही.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट होत आहे की व्यक्तिमत्त्वाचे बाबतीत अद्याप शास्त्रज्ञाची धडपड सुरू आहे. वरवरचे कुरतडणे झाले आहे, प्रश्नाचा मूळ गाभा अद्याप हाताला लागलेला नाही. मुलाच्या मनावर व शरीरावर ज्या अनेक गोष्टीचे परिणाम होत असतात, त्यातूनच त्याचे व्यक्तिमत्त्व बनत असते वर्तनवाद्याच्या मते शरीरातील अनेकविध ग्रथीच्या व्यापाराला या बाबतीत बरेच महत्त्व दिले पाहिजे. कुटुब, घर इत्यादीशी व्यक्तिमत्त्वाचा निकटित सबध असतोच पण त्याबरोबरच मुलाला शाळेत आलेले अनुभव त्याची मित्रमडळी, जातपात, सामाजिक व आर्थिक परिस्थिति याचाहि समावेश व्यक्तिमत्त्वाच्या घडणीत प्रामुख्याने करावा लागेल.



प्रकरण १२ वें

# व्यक्ति-विकास



अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, नश्यति, या महा अवस्थातून प्रत्येक प्राणी जात असतो गर्भावस्था, जनन, बाल्य, कौमार्य, तारुण्य, वृद्धत्व व मृत्यु या विकासातून आक्रमण करणाऱ्या प्राण्याला एक अवस्था मागे पडली व आपण पुढच्या अवस्थेत पदार्पण केले हे क्वचितच समजते पण वाढ काही थाबत नाही वयोमानाने आपल्या शरीरात बदल होतोच. आपल्या आचारात व त्यातल्यात्यात आपल्या व्यक्तिमत्त्वातहि मोठा फरक पडलेला दिसतो शरीरवाढीने बदल होतात हे जरी खरे तरी क्षणोक्षणी मिळालेले अनुभव व आपणाला मिळालेले शिक्षण याचाहि आपल्या आचरणावर व व्यक्तिमत्त्वावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाही मानवी वाढीचे निरीक्षण करून शास्त्रज्ञानी अनेक मते प्रतिपादिली आहेत. स्टॅन्ले हॉल्च्या मते प्राणी या वाढीच्या अवधीत विकासाच्या सर्व अवस्थातून जात असतो.

गर्भसभव ते जनन हा २८० दिवसाचा कालावधि प्राण्याची शरीरनिर्मिति होण्यात खर्च होतो पाचव्या किवा सहाव्या महिन्यात या गर्भाला मानवी शरीराचे रूप प्राप्त होते गर्भाची हालचाल आईला याच वेळी जाणवू लागते जिवत गर्भ बाहेर काढून त्यावर अनेक प्रयोग करण्यात आले आहेत गर्भावस्थेतील तो मुका जीव डोके हालविणे, हातपाय पसरणें अशासारख्या क्रिया करू शकतो.

वर्तनवाद्याचा पुरस्कर्ता वॉट्सन् याने पुष्कळ लहान अर्भकाचे निरीक्षण करून पुढील क्रिया जन्मजात असतात, त्या न शिकविता येतात असें प्रतिपादिले आहे—शिकणे, खोकणे, रडणें, चोखणें, मलमूत्रविसर्जन, मस्तक, डोळे, हातपाय याच्या प्रतिक्रिया; भावनात्मक क्रियापैकी भीति, राग व प्रेम या

भावना लहान मुलात प्रथमपासूनच दिसून येतात. एवढेच प्रतिक्षेप व भावना उपजत असून मुलाच्या ठिकाणी आपोआप उत्पन्न होतात असे त्याचे म्हणणे अनुकरण, असूया, सहानुभूति, स्वच्छता, इत्यादि गोष्टी शिकाव्या लागतात.

जन्मल्याबरोबर दृष्टि आपले काम हळहळू करू लागते श्रवणेंद्रिय अपुरे असते पहिल्याच आठवड्यात मुलाला मोठमोठे आवाज, मनुष्याचा शब्द ऐकू येतो

गोड पदार्थाची चव, कडू व आबट पदार्थाची नावड प्रथमपासून अनुभवास येते घ्राणेन्द्रियाची प्रगति फारच मदगतीने होते. ऊन-थडाचा स्पर्श मुलाना लवकरच जाणवतो दिवसाच्या कालावधीत चार पचमांश वेळ झोपेत जातो झोप पुरी झाली म्हणजे मूल तरतरीत दिसते सारखी चळवळ सुरू होते पुढे हळहळू उच्चाराला सुरुवात होते भूक, व्यथा, राग ही रडण्याची मुख्य कारणे असतात क्रमाक्रमाने आवाजात आरोह-अवरोह सुरू होतात पहिल्या महिन्यात ओ, ऊ, अ, म, इत्यादि वर्णाचे उच्चार ओळखू येतात.

चार महिन्याचे मूल हालत्या वस्तूवर नजर स्थिरावू शकते आवाज ऐकल्याबरोबर मान फिरविते, आईची ओळख हास्याने दर्शविते सातव्या महिन्यात मूल एकटे स्वत चा तोल सभाळून उभे राहू शकते वस्तु हातात पकडते आरटनात काही वर्ण स्पष्ट उच्चारू शकते दहाव्या महिन्यात दुसऱ्याच्या मदतीशिवाय मूल उभे रहाते भावनात्मक हालचाली करू शकते. परक्या व्यक्तीस लाजते एक वर्षाचे मूल चालू लागते, खेळण्याशी खेळते, ओळखीच्या शब्दाबरहुकूम क्रिया करू शकते राग, प्रेम लाभ या भावना विकसित होतात.

दुसऱ्या वर्षी चालणे, धावणे, सोपे शब्द उच्चारणे या क्रिया होतात. आपण कोण व आपल्या मालकीच्या वस्तु कोणत्या याची त्यास जाणीव येते.

चवथें वर्ष म्हणजे प्रश्नमालिका. हट्ट करणे, आपले निर्णय खरे मानणें, आईच्या मदतीने पोषाख करणे, दात घासणे वगैरे क्रिया सुरू

होतात. पाचव्या वर्षांत मूल आपल्या शरीरावर ताबा ठेवू शकते. उड्या मारणे, पळणे यात ते प्रवीण बनते. लाब वाक्य स्पष्ट बोलू शकतें. आपल्या मित्रमडळीत खेळू लागते. सामाजिक प्रतिक्षेप बनू लागतात.

सर्वसामान्य मुलाची वाढ कशी होते याचे आतापर्यंत विवेचन झालें. सर्व मुले याच पद्धतीने वाढतील असे नाही माणसाची शारीरिक व मानसिक वाढ होत असताना काही टप्पे स्पष्ट रीतीनें दृष्टीस पडतात. या टप्प्याची कालमर्यादा अगदी काटेकोरपणाने ठरविता येत नाही हें खरें. परतु सर्वसामान्य नियम म्हणून पुढील अवस्था व त्या अवस्थाची लक्षणे मान्य करण्यात आली आहेत. वय एक ते दहा वर्षापर्यंतची बाल्यावस्था. त्यातील पहिली पाच हा शैशवाचा काल. या कालात मुलाच्या बहुतेक सर्व क्रिया सहज प्रवृत्तीच्या आधीन असतात. मनात येताच ती गोष्ट झाली पाहिजे, त्याचे परिणाम काय होतील याची चिता मुलाला केव्हाच नसते. हळूहळू गृहशिक्षणाने, प्रेमळ व रागीट कुटुबियाच्या आचरणाने मुलाच्या सहजप्रवृत्तीवर दाब येतो त्या आचरणातील अधीरता कमी होऊं लागते. पराधीनता या अवस्थेंत महत्त्वाची असते. प्रत्येक गोष्ट वडीलमडळीनी आपणासाठी केली पाहिजे हा मुलाचा हट्ट असतो. लाड पुरविणे पुष्कळ वेळा कष्टाचे होते; परतु ह्या लाडिकपणातूनच मूल हळूहळू स्वायत्त होऊ लागते. कल्पकता हेहि या अवस्थेचे एक प्रमुख लक्षण आहे. अर्थात् या कल्पनासृष्टीत केन्द्रीभूत व्यक्ति मूल स्वत च असते. अहप्रवृत्तीचा जोर बळावला म्हणजे आत्मविष्काराला पूर्ण अवसर मिळतो लहान मूल या बाबतीत केव्हाहि मागे रहात नाही. कोणी दटावले अगर रागे भरले तर तेवढ्यापुरती लीनता दिसून येईल. पण तो क्षण गेला म्हणजे आत्माविष्काराला आरभ झालाच म्हणून समजावे. लैंगिक प्रवृत्तिहि या अवस्थेत दिसून येते. परतु या प्रवृत्तीला आवश्यक ती शारीरिक वाढ मुळीच झालेली नसल्याने या प्रवृत्तीने होणारे वर्तन नीटसे ओळखू येत नाही. आत्मकाम्या ( Auto-erotism ) येवढेच प्रमुख लक्षण या बाबतीत दाखविता येईल. हळूहळू आत्मकाम्येचें रूपातर मुलांच्या बाबतींत मातृकाम्येंत ( Œdipus complex ) व मुलीच्या बाबतीत पितृकाम्येंत ( Electra complex ) होत जातें असे मनोविश्लेषणवादी शास्त्रज्ञांचे मत आहे. या अवस्थेंत

शारीरिक वाढ व मानसिक वाढ झपाट्याने होते व नतर कांही काल खुटते. वयाच्या सहाव्या किंवा सातव्या वर्षी परत शारीरिक वाढीला जोर चढतो.

किशोरावस्थेचा काल दहा ते तेरा वर्षापर्यंतचा. या अवधीत सघ-प्रवृत्तीचा जोर अधिक असतो. आईशिवाय न राहणारे मूल आता घरा-बाहेर पडते आपल्या मित्रमडळीत राहून अनेक तऱ्हेच्या क्रीडा करण्यात दंग झालेले मूल घरदार इतकेच काय जेवणहि विसरू शकते. सामाजिक प्रवृत्ति त्याच्या ठायी डोकाव लागतात. मित्रसमूहाने ठरविलेली शिस्त व केलेले नियम पाळण्यात मुलाच्या हातून कसूर होत नाही. नैतिक कल्पनाचा उदय होऊ लागतो. आतापर्यंत अन्तर्वर्ती असलेले मूल बहिर्वर्ती होते. स्वत.वर केन्द्रित झालेले लक्ष बाहेरच्या जगाकडे वळते. जिज्ञासा प्रबळ होते.

वय तेरा ते अठरा ही कौमार्यावस्था. शारीरिक वाढीला जोर चढून मुलाचे रूप एकदम बदलते. किबहुना शैशवावस्थेची पुनरावृत्ति या अव-धीत पहावयास मिळते. आत्मकाम्येच्या आधीन झाल्याप्रमाणे हा कुमार स्वत.वरच इतका खूप असतो की कित्येकदा त्याचे वर्तन हास्यास्पदहि होते कल्पनासाम्राज्यात दग होऊन हा कुमार वाटेल ते धाडस करावयास तयार होतो. भावनानाहि भरती येते त्यामुळे या वयाच्या मुलाना आव-रणे मोठें कठीण होते. लैंगिक प्रवृत्तीची आता पूर्ति होणे आवश्यक असते. आत्मकाम्येतून बाहेर पडल्यानतर दुसऱ्या व्यक्तीवर तो भयकर प्रेम करू लागतो. मैत्री याच कालावधीत जमते. हळूहळू या अवस्थेचे रूपातर योग्य मार्गांनी विवाहांत झाले पाहिजे. तसे न झाल्यास मुलामुलीचे जीवन दु.खद झाल्याविना रहात नाही या काळात मनाची नैतिक पात्रता वाढली पाहिजे. सुदर सुदर उच्च ध्येये मुलासमोर ठेवली पाहिजेत कारण विभूति-पूजा व त्यासाठी आवश्यक तो त्याग करण्याची सिद्धता या अवस्थेत मुलाच्या ठायी स्पष्ट दिसून येते.

ही अवस्था ओलाडली की मूल तारुण्यात पदार्पण करते. बुद्धीची वाढ पुरी होत जाण्याने व आजूबाजूच्या परिस्थितीतून अनेक सस्कार प्राप्त झाल्याने तरुण झालेला हा कुमार आपला जीवनमार्ग आत्मविश्वासाने आक्रमू

लागतो वर दिलेल्या निरनिराळ्या अवस्थातून जात असता, मुलाच्या प्रवृत्ति दडपल्या न जाता योग्य असे शिक्षण त्याना मिळाले पाहिजे. त्याच्यातील स्वकेन्द्रित प्रवत्तीचे सशोधन होईल अशी योजना शिक्षणातून झाली पाहिजे थोडक्यात पशुतुल्य मुलाचे रूपातर सुसस्कृत माणसात झाले पाहिजे आपले जीवन हे सर्वस्वी आपल्याच सुखासाठी नसून परक्याच्या सुखासाठी आपण झटावे, ही प्रवृत्ति कौमार्यावस्थेत वळावली म्हणजेच पुढे तारुण्यावस्थेत ती व्यक्ति समाजासाठी, देशासाठी, देवासाठी, आपल्या ध्येयासाठी वाटेल तो त्याग करण्याला तयार होईल एकदरीत पशुत्व, मनुष्यत्व, देवत्व याच माणसाच्या विकासाच्या पायऱ्या होत.

मानवी प्राण्याच्या वाढीचे थोडक्यात हे विवेचन झाले. त्यातहि मानसिक वाढीवर मनुष्याचे सुखी जीवन अधिक अवलबून असल्याने त्या वाढीबद्दल जरा अधिक विचार करणे आवश्यक आहे वाह्य परिस्थितीशी येणारा सपर्क मनुष्याच्या बाबतीत कधीहि निसटून जात नाही त्या सपर्काचे त्याच्या मनावर सतत बरेवाईट परिणाम होत असतात हे अनुभव मनुष्य कसा घेत असतो हे पाहणे मनोरजक आहे प्रत्येक अनुभवात मानवी मन व पचेन्द्रियापैकी एक किवा अधिक याच्या क्रिया होत असतात व त्या अनुभवाचे ठसे मेंदूवर उमटत असतात या अनुभव-ग्रहणाची प्रक्रिया पुढीलप्रमाणे आहे

बोधन, भावन, प्रवर्तन हे अनुभव-ग्रहणातील मूलघटक होत. याच्याबद्दलचे निवेदन मागे आलेच आहे

## व्यक्ति व वस्तु यांमधील संबंध

सर्व अनुभव म्हणजे व्यक्ति व वस्तु यामधील कोणत्या ना कोणत्या तऱ्हेचा संबध होय कोणत्याहि तऱ्हेचा प्रत्यक्ष अनुभव येत असताना अनुभव घेणारा व बाह्य वस्तु याचे जे निरनिराळ्या तऱ्हाचे संबंध येतात त्याचे एकूण चार प्रकार सागता येतील.

**साधी जाणीव** (Simple Apprehension) :—आपण अनुभवाचे अस्तित्व मान्य करतो, तेव्हाच अनुभव घेणारा व बाह्य विषय याचे स्वतंत्र अस्तित्व मान्य करतो. बाह्य वस्तूचे स्वतत्र अस्तित्व फक्त मान्य

करण्याची जी मनोवस्था तिलाच साधी जाणीव असे म्हणता येईल. या अवस्थेत बाह्य वस्तूचे अस्तित्व जाणण्यापलीकडे ज्ञानाची मजल जात नाही. ही अवस्था बोधनाच्या (Cognition) पूर्वींची असेच म्हणणे जास्त सयुक्तिक ठरेल.

**बोधन** (Cognition) :—या मनोवस्थेत विषयाच्या बाह्य स्वरूपा-संबंधी, स्पष्ट ज्ञानाचा समावेश होतो उदाहरणार्थ, एखादा मनुष्य आपल्या-समोर आला म्हणजे त्याची उची, रग, रूप, चेहऱ्यावरचा भाव वगैरे सर्व गोष्टी आपल्याला उमगतात याच ज्ञानाला आपण बोधन अगर अभिज्ञा असे म्हणतो बोधनात वाक्यातील अर्थावर विश्वास, अविश्वास, समजूत, गैरसमजूत वगैरे छटाचा समावेश होतो एखादे फूल आपण पहात असलों तर प्रत्येक क्षणाला त्या फुलासबधी वेगवेगळे विचार आपल्या मनात येत असतात, पण या सर्व विचाराची पार्श्वभूमि ते फूल व त्याचे अस्तित्व एवढीच असते बोधन या कार्याचे टिच्नेर्‌ने असे वर्णन केले आहे की प्रत्येक क्षणाला मन कार्यव्यापृत असते ते निष्क्रिय असत नाही. एखादी वस्तु मनात आली म्हणजे आपण तीच वस्तु असे जरी ओळखतो तरी दर खेपेस त्या वस्तूची निरनिराळी स्वरूपे आपण जाणत असतो

**भावन** (Affective Attitude):—बोधनामध्ये वस्तूचे अस्तित्व व त्याच्या स्वरूपाबद्दलची स्पष्ट कल्पना एवढ्याच गोष्टी येतात, पण त्यात त्या वस्तूसबधी आपल्याला वाटणारी अनुकूल अथवा प्रतिकूल भावना याचा समावेश मुळीच होत नाही ती अनुकूलता वा प्रतिकूलता भावन या अवस्थेत सामावलेली असते अनुभवाच्या विषयात आपल्याला काही अभिरुचि (Interest) वाटत नाही, असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा त्यात पुढील गोष्टी येतात (१) त्या विषयाबद्दलची अगर वस्तूबद्दलची आवड किंवा नावड आपल्या मनात नसणे (२) तो विषय किंवा ती वस्तु तशीच राहावी, बदलावी वगैरे इच्छा आपण न करणे

याच्या उलट अनुभवाच्या विषयात आपले मन आहे असें जेव्हा आपण म्हणतों तेव्हा त्यात दोन प्रकार सभवतात. (१) भावनात्मक व (२) प्रवर्तनात्मक. या दोन अवस्था सदासर्वकाळ पूर्ण मिसळलेल्या दिसून येतात. फक्त शास्त्रीय विचारापुरते कल्पनेनेच त्याना वेगळे करणे शक्य आहे.

भावन या मनोवस्थेचे स्पष्टीकरण असे करता येईल की वस्तूच्या अस्तित्वाची व स्वरूपाची जाणीव झाल्यानतर तिच्याबद्दल मनात उत्पन्न झालेली आवड अगर नावड, अनुकूल अगर प्रतिकूल ग्रह म्हणजेच भावना. सुख अगर दु:ख देणारे विषय व सुखदु:खाचे भाव यात फरक आहे भावाना मनातच फक्त अस्तित्व असून ते आपल्या विशिष्ट वेळेच्या मनोवस्थेवर अवलबून असतात. (१) सुखदायक विषय नेहमीच सुख देतात असे नाही व दु खदायक विषय नेहमीच दु:ख देतात असे नाही स्वच्छ चादणे हा विषय खरा पाहिला असता नेहमीच आल्हाददायक वाटवयास हवा; पण आपले मन जर काही कारणाने उदास झाले असेल तर अशा चादण्याचे सुख आपण अनुभवू शकणार नाही (२) काही विषय दुसऱ्या विषयाच्या साहचर्यातच फक्त सुख अगर दु:ख निर्माण करू शकतात एखाद्या माणसाचे गाणे सर्व वाद्याची साथ असली तरच बरे वाटते, पण तो जर एकटाच साथीखेरीज गाऊ लागला तर त्याचा आवाज गोड वाटत नाही (३) विषयापासून मिळणारा आनद हा त्याच्या अनुभवकालावरहि अवलबून असतो आवडते पक्वान्न असले तरी पोट भरल्यानतर त्याचा वीट येतो (४) एकाच वेळी दोन परस्परविरुद्ध भाव मात्र आपण अनुभवू शकत नाही एकाद्या वस्तूपासून निघालेला आवाज कानाने ऐकणे व तिचे स्वरूप डोळयाने पाहणे या दोन्ही गोष्टी आपण एकाच वेळी करू शकू, पण एखाद्या वस्तूविषयी प्रेम व तिरस्कार एकाच वेळी वाटणे शक्य नाही

काही वेळेला विषयामुळे मनात निर्माण झालेला भाव अशा तऱ्हेचा असतो की तो निश्चित सुखदायक किवा निश्चित दु खदायक असे त्याचे वर्णन करताच येत नाही. त्या भावात एकप्रकारची बेफिकीर वृत्ति असते तर काही वेळा मनातील भाव मिश्रस्वरूपाचा असतो एखाद्या प्रेमळ मृत माणसाची आठवण झाली असता आपण त्या स्मृतीत तासन् तास रमतो. कारण त्या आठवणी आपणास आनदहि देत असतात व तो आनदाचा साठा गमावल्याबद्दल आपणास दु:खहि होत असते. मनाची सर्वसामान्य घडणच अशी असते की त्याचा कोणत्याहि विषयाशी सबध आल्यानतर त्या संबधीचा भाव पूर्ण बेफिकीर असू शकत नाही. कोणत्याहि भावात आवडीची

अगर नावडीची छटा थोडीफार येतेच सुख व दुःख या दोन विभागात सर्व तऱ्हेच्या भावाचा पूर्णपणे समावेश होतो असे म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ, राग, यामध्ये विषयाबद्दलची नावड तर असतेच; पण त्याहूनहि जास्त भाव त्यात सामावलेले असतात

**प्रवर्तन** (Conation)·—आवडत्या विषयाचे जास्तीत जास्त काल सान्निध्य लाभावे यासाठी होणारी घडपड म्हणजेच प्रवर्तन भावना व प्रवर्तन यात सूक्ष्म पण स्पष्ट भेद आहे एखादी वस्तु आवडणे हे भावनात येईल व ती त्याच स्वरूपात आणखी काही काल रहावी अशी इच्छा करणे हे प्रवर्तनात येईल समजा एखाद्या विद्यार्थ्याला वाचावयाची फार इच्छा आहे, पण आजबाजूच्या गलबलाटामुळे त्याला वाचणे अशक्य झाल्यास तो चिडतो, दुःखित होतो या ठिकाणी चिडणे व प्रयत्नपूर्वक वाचन चालू ठेवण्याची इच्छा करणे या दोन्ही अवस्था स्वतंत्र व भिन्न आहेत. यशा-पयशापासून होणारा आनंद व दुःख हे भाव या तऱ्हातच घालता येतील. अशा तऱ्हेच्या अनुभवाचे वेळी वाटणारे काही भाव हे कोणत्यातरी कृतीची अपेक्षा करीत असतात व म्हणूनच त्याना प्रवर्तनापासून स्वतंत्र अस्तित्व आहे असे मानलें पाहिजे. अशा रीतीने प्रवर्तनात विषयाचा अनुभव घेणाऱ्याची कोणत्यातरी तऱ्हेची कृति सामावलेली असते पुष्कळ वेळा एखाद्या भावातून कृति व कृतीतून निर्माण झालेला नवीन भाव आपण अनुभवितो उदा., भुकेने व्याकूळ होणे (भाव), जेवणे (कृति), व पोट भरल्याचे समाधान (भाव) येथे कृतीचा शेवट होतो पण काही ध्येयें इतकी उच्च असतात की ती साध्य होण्यास कित्येक वर्षांची धडपडहि अपुरी पडते

अनुभवाचे पृथक्करण हे असे आहे. असे अनेक अनुभव घेत घेत मानवाची भावनिक व बौद्धिक वाढ होते. व्यक्तिविकासात साहाजिकच या वाढीला फार महत्त्व आहे.

---

*

*

# प्रकरण १३ वें

# आत्मविकास

[ The Development of The Self ]

अवबोधाच्या पायरीवरून आत्मत्वाचा विचार करू लागल्यास ते शरीराशीच एकरूप झालेले आढळते. कारण या अवस्थेत 'मी' व 'तू' यातील फरकाची मर्यादा शरीरच मानली जाते लहान तीन वर्षांच्या मुलाला त्याचे नाव घेऊन "अनिल कोठे आहे ?" असे आपण विचारल्यास तो छातीवर बोट ठेवून दाखवितो. विचाराची वाढ जसजशी होत जाते तसतशी आत्मत्वाची कल्पनाहि विकास पावत जाते. हा विकास दोन दिशानी होत असतो (१) वैचारिक बाजूने आत्मत्व जास्त स्पष्ट होत जातें. आत्मत्वासबधी तिन्ही काळांत (वर्तमान, भूत व भविष्य) आपण विचार करू शकतों. आपण काय करू शकलो असतो, काय करू शकू, वगैरे विचार फक्त पूर्ण प्रगल्भ मनातच येऊं शकतात या दिशेने आत्मत्वाच्या मर्यादा आपण कितीहि वाढविल्या तरी आत्मत्वाचे स्वरूप मात्र अजूनहि अवबोधात्मकच असते. (२) आत्मत्वाच्या वाढीची दुसरी दिशा म्हणजे भावना, अवधान, सुख, दु ख वगैरे अनुभविणारे स्वत्व व या मानसिक अवस्था निर्माण करणारे विषय यातील भेद पूर्णपणे जाणून आत्मनिरीक्षण व परीक्षण करणाऱ्या स्वत्वाची वाढ होणे. मात्र अजूनहि या दोन्ही दिशानी वाढणारे आत्मत्व शरीराशीच एकरूप झालेले असते.

या पुढची प्रगतीची पायरी म्हणजे शरीराशीं एकरूप असलेले स्वत्व व शरीरापासून स्वतंत्र असलेले स्वत्व या फरकाचा उदय. शरीरापासून स्वतंत्र असलेले आत्मत्व शारीरिक वेदनांकडे सपूर्ण दुर्लक्ष करून आपल्या स्वतःच्या विचारात रममाण होऊ शकते. आपण जेव्हा एखाद्या विचाराशी

अगर विकाराशी तन्मय होतो तेव्हा भोवतालच्या सर्व व्यक्तीना व वस्तूना तात्पुरते विसरून जातो शरीरापासून भिन्न असणाऱ्या आत्मत्वाचे वर्णन वॉर्डने असे केले आहे की, भावनाच्या आदोलनाचे मुख्य ठिकाण जे हृदय त्यात राहणारे आत्मत्व व प्रत्यक्ष दृष्टीस पडणारे साकार शरीर यामधला फरक जाणवू लागणे म्हणजे आत्मत्व

## आत्मत्वाची वाढ व सामाजिक संघर्ष

आत्मत्वाच्या जाणिवेच्या विकासास समाजातील कोणकोणते अनुभव कारणीभूत होतात त्याचा अभ्यास करणेहि फार महत्त्वाचे आहे पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे व्यक्तीचा रोज व्यवहारात इतराशी येणारा सबध. कोणत्याहि व्यक्तीचे जीवन भौगोलिक वातावरणापेक्षा भोवताली असणाऱ्या इतर व्यक्तीवरच मुख्यत अवलबून असते सामाजिक परिस्थितीशीं जुळते घेणे ही आत्मत्वाच्या विकासातील एक महत्त्वाची गोष्ट आहे. अशा तऱ्हेची तडजोड करण्यास भोवतालच्या सर्व व्यक्तीची एकमेकाशीं व त्या सर्वांची आपल्याशी जी वागणूक असेल तिचा अभ्यास करणे जरूर आहे इतर व्यक्तीच्या विचाराशी व भावनाशी समरस झाल्याखेरीज आपले इतरापासून भिन्नपणहि प्रतीत होत नाही इतर प्रत्येक व्यक्तीच्या भावना व विचार याची जाणीव असतानाच आपण आपल्या स्वतच्या भावना व विचार तयार करीत असतो व अशा तऱ्हेने आत्मत्वाची कल्पनाहि जास्त जास्त सुस्पष्ट होत जाते. "दुसऱ्यासबधीचे ज्ञान वाढत जाणे म्हणजेच स्वत विषयीच्या ज्ञानात प्रगति होणे," असें स्टाउट्ने या विकासाचे वर्णन केले आहे.

आपण स्वत व इतर यामधील तुलनात्मक विचारानी आपल्या आत्मत्वाचे पैलू अधिक सुस्पष्ट होत जातात भोवतालच्या व्यक्तीशी आपले सबध जसजसे बदलत जातील, तसतसे आपल्या आत्मत्वाचे स्वरूपहि पालटत जाईल आदरणीय वडील मडळीच्या सान्निध्यात असताना आपले विनम्र व्यक्तिमत्व प्रगट होतें आपल्यापेक्षा कमी दर्जाच्या माणसापुढे आपण वर्चस्व दाखविणारे व्यक्तिमत्त्व प्रगट करतो. शत्रू पुढे आल्यास आपले लढाऊ आत्मत्व प्रतीत होते.

समाजातील इतर व्यक्तीचे अनुकरण हाहि आत्मत्वाच्या विकासातील एक महत्त्वाचा भाग आहे. बाल्डविन्ने या अनुकरणात्मक आत्मत्वाचे दोन भाग सांगितले आहेत.

(१) आत्मत्वाची साधकावस्था ( Projective Stage of Self-consciousness ):—या अवस्थेत ज्या गोष्टीचे अनुकरण करावयाचें असेल त्या पूर्णपणे आत्मसात् झालेल्या नसतात त्या साध्य करून घेण्यासाठी आपली सारखी धडपड चालू असते आत्मत्वाची वर्तमानकालातील अवस्था व आत्मत्वाने पुढे ठेवलेला आदर्श यातील अतर स्पष्ट दिसत असते. अशा वेळी ध्येय म्हणून पुढे ठेवलेल्या आत्मत्वाचे प्रतिबिब वर्तमानकालीन आत्मत्वावर पडलेले असते आत्मत्वाच्या या अवस्थेचे उत्तम उदाहरण म्हणून तुकारामाचा खालील अभग सागता येईल,

काय मी उद्धार पावेन। काय कृपा करील नारायण ।।

(२) आत्मत्वाची सिद्धावस्था (Ejective Stage of Self-consciousness) या अवस्थेत आत्मत्वाने ध्येय गाठलेले असते व त्यामुळे त्यास एक प्रकारची समाधानवृत्ति प्राप्त झालेली असते साध्य मिळविले असल्याने स्वत चा स्वत लाच आत्मपालट झाल्याचा प्रत्यय येतो. या अवस्थेचे उदाहरणहि आपल्याला तुकारामाच्या अभगात पहावयास सापडते तो म्हणतो

सहज मी आधळा गा। निजनिराकार पंथे।
वृत्ति हे निवृत्ति झाली। जन न दिसे तेथे।
किंवा—तुजमज नाही भेद। सहजचि केला विनोद।
तू माझा आकार। मी तों तूचि निर्धार।

आत्म्याची अनुकरणात्मक होणारी वाढ विचारात घेताना लहान मुलाचा विचार जास्त प्रामुख्याने केला पाहिजे कारण लहान मुलाच्या आत्मत्वाचा विकास खूप अशी अनुकरणावरच अवलंबून असतो. समाजाचा एक जबाबदार घटक तयार होण्यासाठी भोवतालच्या माणसातून एकसारखे निरनिराळे गुण वेचून घेऊन त्याला आत्मसात् करावयाचे

असतात साधकावस्थेमध्ये मूळ गरीब, आज्ञाधारक, नम्र असे असते. उलट सिद्धावस्थेमध्ये स्वत्व ठासून प्रस्थापित करणारे अभिमानी व जोरदार असे स्वत्व प्रस्थापित होते

## आत्म्याचें एकत्व व अनेकत्व

[The One self and Many selves.]

अगदी निवातपणे एकान्तात आपण स्वतःबद्दल विचार करू लागलो की स्वत पुरते आपण व कोणत्यातरी व्यक्तीशी सबधित आपण अशा दोन वेगवेगळ्या स्वत्वाची स्पष्ट जाणीव आपणास होते स्वत च्या दृष्टीने स्वत्वाच्या इतिहासात कितीतरी परस्परविरुद्ध चागल्या व वाईट कल्पनाचे एकत्रीकरण झालेले असते अशा परस्परविरुद्ध कल्पनापैकी एकावेळी कोणत्यातरी एकाच कल्पनेशी अगर भावनेशी आपले स्वत्व एकरूप झालेले असते उदाहरणार्थ दारूच्या धुदीतील आतमत्व, धुदी उतरल्यानतरचे आतमत्व-स्वप्नातील आतमत्व, जागृतावस्थेतील आतमत्व वगैरे एका अवस्थेतील आत्मत्वाच्या कृतीची जबाबदारी दुसऱ्या अवस्थेतील आतमत्व घेण्यास तयार नसते राजा हरिश्चद्रासारखे लोक मात्र अपवादात्मकच समजले पाहिजेत

मनात ज्या वेळी दोन विरुद्ध विचाराचा झगडा चालू असतो त्यावेळी हे आतमत्वाचे दोन भाग अगदी स्पष्ट दिसतात. ध्येय व विलोभने याच्यातील झगड्याचे वेळी स्वत्वाच्या परस्परविरुद्ध दोन भागाची जाणीव अगदी तीव्रतेने होते अशा वेळी आतमत्वाचे हे दोन भाग एकमेकावर टीका करून एकमेकाच्या कृतीचे वकिलाप्रमाणे मूल्यमापन करीत असतात त्याच-प्रमाणे भूतकाळातील आपण व वर्तमानकाळातील आपण ही अस्तित्वेहि पुष्कळ वेळा अगदी स्वतत्र भासतात. एखादी गोष्ट आपण करतो, पण ती अविचाराची होती असे पुढे काही वर्षांनतर अनुभवास आल्यास आपण स्वत चीच निर्भर्त्सना करतों आपण इतक्या मूर्खपणाने कसे वागलो याचे आपल्यालाच आश्चर्य वाटते.

नीतिशास्त्राचे ध्येय आत्मसाक्षात्कार (Self-realisation) असे आपण जेव्हा सागतो, त्याचा अर्थ आपणात असलेल्या सर्व उणीवा दूर

करून भविष्यकाळातील ज्या आदर्श आत्मत्वाची कल्पना आपण आपल्या मनाशीं बाधलेली असते त्याप्रत जाणे ह्याच असतो.

आत्मत्वाच्या जाणीवेचे निदान (Pathology of Self-consciousness) :--विचारसृष्टीत आपण जेव्हा स्वत्वाच्या निरनिराळ्या भागांची कल्पना करतों त्या वेळी त्याचे अस्तित्व फक्त वैचारिक आहे. शरीरदृष्ट्या दोन व्यक्तींना जे स्वतंत्र अस्तित्व आहे तसे स्वतत्र अस्तित्व या स्वत्वाना नाही, याची पूर्ण जाणीव आपणास असते. शिवाय तुलनात्मक दृष्टीने पाहिल्यास भूतकाळातील आपले आत्मत्व व वर्तमान काळातील आपले आत्मत्व यापैकी दुसऱ्या आत्मत्वानेच जीवनाचा चारपचमाश भाग व्यापलेला असतो. म्हणूनच भूतकाळातील आत्मत्व हे वर्तमानकाळातील आत्मत्वापेक्षा अस्पष्ट व कमी महत्त्वाचे असते ज्या व्यक्तीत या निरनिराळ्या आत्मत्वाचा योग्य रीतीने समन्वय झालेला असतो, त्याची आपण सामान्य व्यक्तीत गणना करतो व एखाद्या अप्रस्तुत आत्मत्वास जेव्हा अवास्तव महत्त्व येऊन या समन्वयाचा काटा ढळतो तेव्हा त्या व्यक्तीत काहीतरी विकृति निर्माण झाली आहे असे आपण म्हणतो एखादा मनुष्य स्वतःला नेपोलियन अगर शिवाजी समजून वागू लागल्यास त्याची आपण वेड्यात गणना करतो. या तऱ्हेच्या विकृतीस भ्रम अशी सज्ञा देण्यात येते. असा भ्रम वर्षांनुवर्षेहि राहू शकतो

भ्रम कसा निर्माण होतो याचा अधिक विचार करू लागल्यास असे दिसून येते की एखाद्या काळात एखाद्याच भावनेचा मनुष्यावर अतिशय पगडा बसलेला असल्यास व काही कारणाने स्मृतिसाखळीत बिघाड उत्पन्न झाल्यास तीच भावना फार जोरदार होऊन सर्व स्वत्व व्यापून टाकते. तिचा परिणाम मेंदू व मज्जातंतूसस्था यावर होतो अशा तऱ्हेने भूतकाळ व वर्तमानकाळ, काल्पनिक व सत्य याचा बोध मनाला होत नाही व तो मनुष्य त्या जोरदार भावनेच्या पूर्णपणे आहारी जातो. काही वेळा मज्जातंतूसस्थस जोराचा धक्का बसल्याने स्मृतिभ्रश होतो.

कोणत्याहि इन्द्रियाला धक्का पोचल्यास त्याच्या कार्यात बिघाड होतो, व त्यामुळे स्वत्वाच्या कल्पनेवरहि विपरीत परिणाम होतो. एखाद्या माणसाच्या कानाला दुखापत झाल्यास त्याला असा भ्रम होतो की, आपले

कान काचेचे केलेले आहेत व त्या दृष्टीनेच तो आपल्या कानाना जपू लागतो पण ज्या वेळेस फक्त शारीरिक स्वत्वावरच ( Bodily self) परिणाम न होता सर्व मानसिक दृष्टिकोनहि बदलून जातो, त्या वेळी सर्व भावनात्मक दृष्टिकोनात व विचारप्रवाहातच फरक झालेला असतो. भावनाचा व इन्द्रियाचा फार निकटचा सबध असल्याने इन्द्रियात विकार उत्पन्न झाल्यास त्याचा भावनेवरहि परिणाम होतो भाव म्हटला की आपण नुसतें भावन असा त्याचा अर्थ न करता त्यातच प्रवर्तनाचाहि समावेश करतो. भीतीतच तीमुळे उत्पन्न झालेले शारीरिक हावभाव येतात

वैचारिक भूमिकेवरहि एखादी भावना प्रमाणाबाहेर उद्दीप्त झाल्यास शरीर त्या भावनेच्या आहारी जाऊन अनाहूत कृति आपल्या हातून घडू लागतात ज्या माणसात अशी भावनाची खळबळ वारवार होऊन बराच काल टिकते त्या माणसात एखादे वेळी एखाद्या भावनेचा जोर इतका होतो की त्याचे सर्व स्वत्व त्या भावनेशी एकरूप होऊन जाते व भोवतालचे वातावरणहि त्याच्या भावनेला अनुकूल बनविण्याचा तो प्रयत्न करू लागतो. आत्यतिक भावनेच्या आहारी गेलेले हे स्वत्व काही वेळा कायमचे सर्व मन व्यापून टाकते, तर काही वेळा सर्वसामान्य स्वत्व व आत्यंतिक भावनेच्या आहारी गेलेले स्वत्व याचा, शरीरावर ताबा मिळविण्यासाठी निकराचा झगडा चालू होतो या झगडयाचा परिणाम असा होतो की, काही काळ एक स्वत्व शरीरावर ताबा चालविते, तर काही काळ दुसऱ्या स्वत्वाचा शरीरावर ताबा चालतो उदाहरणार्थ, डॉ. जेकील व मिस्टर हाईड

मानसशास्त्राप्रमाणे समाजशास्त्रहि आत्मविकासाच्या प्रश्नाचा विचार करते त्या शास्त्राचे म्हणणे काय आहे ते आपण पाहू. समाजशास्त्रज्ञ समाज व व्यक्ति याच्या विकासाच्या विवेचनात ‘ सघटन ’ आणि ‘ विघटन’ हे दोन शब्द योजितात. या ठिकाणी आपणास व्यक्तिगत विकासाचा विचार करावयाचा असल्यामुळे व्यक्तिगत आत्म्याचे सघटन म्हणजे काय, त्या आत्म्याचे ‘ विघटन ’ कसे व का होतें, हेच प्राधान्ये करून पाहावयाचे आहे. विशिष्ट समाजात व्यक्तिविकासाचे विशिष्ट आदर्श ठरलेले असतात त्या आदर्शानुरूप सुसगतरीतीने त्या समाजातील व्यक्तीच्या आत्म्याचा

विकास होणे याचेच नाव संघटन या योगे व्यक्तीच्या आशा आकांक्षा, आचार उच्चार त्या त्या समाजातील विशिष्ट परिस्थितीला अनुसरून तयार होतात व त्या व्यक्तीच्या मनाची ठेवणहि विशिष्ट प्रकारे सिद्ध होते. या प्रक्रियेत व्यक्तीच्या शरीराची वडण, आजूबाजूची भौतिक परिस्थिति, त्या व्यक्तीला आलेले विलक्षण अनुभव हे मुख्य घटक समजले जातात. हे घटक प्रत्येक व्यक्तीच्या आत्मविकासाला पोषक असतातच असे नाही बहुधा वरीलपैकी एक वा अधिक घटक आत्मत्वाचे संघटन करण्याऐवजी विघटन करण्यास कारणीभूत होत असतात काही व्यक्तीच्या बाबतीत आत्मसंघटन यथायोग्य व यथाक्रम झालेले असते, परंतु जीवनातील कोणत्यातरी घटनेने हे संघटन विस्कळीत होते, तर कित्येकाच्या बाबतीत संघटनाची पूर्णताच होत नाही

विघटनाची अनेकविध स्वरूपे दृष्टोत्पत्तीस येतात, त्यापैकी काही पुढे दिल्याप्रमाणे आहेत.

(१) वेड ( Psychoses )—समाजाने निश्चित केलेल्या आचार-विचार-उच्चाराना अनुसरून जिचे आचार-विचार-उच्चार होत नाही, अशी व्यक्ति वेडी आहे असे आपण समजतो या दृष्टीने वेडाचे अनेक प्रकार संभवतात लोक आपणाला विनाकारण छळतात असे एखाद्याला वाटणे, आपण कुणी तरी 'अद्वितीय' व्यक्ति आहोत असा भ्रम एखाद्याला होणे, अगदी क्षुल्लक कारणानीहि उदासीन होऊन बसणे, उन्मादा-( Hysteria ) चे झटके येणे, शारीरिक दुर्बलता वाटणे. इत्यादि विविध आचरण-प्रकार वेडाच्या सदरात पडतात

(२) नमासस्थेत झालेल्या बिघाडामुळे उत्पन्न होणाऱ्या विकृति ( Neuroses ).—

वेडापेक्षा या विकृति जरा सौम्य स्वरूपाच्या असतात मात्र या विकृतीत आत्म्याचे विघटन अधिक स्पष्ट रीतीने दिसून येते. या विकृतीने पछाडलेल्या व्यक्तीचे जीवन निरुपयोगी ठरतें; इतकेच नव्हे तर पुष्कळदा अशा व्यक्ति समाजांत जीवत राहण्याला अपात्र ठरतात. उन्माद, शारीरिक दुर्बलता, उदासीनता इत्यादि प्रकार या विकृतीत सामान्यपणें आढळतात.

पुढील कांही प्रकारहि अधूनमधून दृष्टोत्पत्तीस येतात. (१) दुसऱ्यावर फाजील प्रेम करणें, (२) सर्व परिस्थितीत व सर्व प्रकारें आपली काळजी घेईल, आपल्यावर प्रेम करील असा 'जिवाचा सोबती' हुडकत राहणें, (३) स्वताच्या बुद्धीबद्दल व स्वताच्याकडून होणाऱ्या लहानमोठ्या कार्याबद्दल गाजावाजा न करण्याचा अट्टाहास धरणे, (४) आपणच सर्वांत श्रेष्ठ आहोत असा पुष्टिगड बाळगून वेळी अवेळी स्वताच्या मोठेपणाचे प्रदर्शन करणे (५) स्वताला बुद्धिवादी समजून दुसऱ्याचा सदान्कदा तिरस्कार करणे (६) दुसऱ्यांना राबवून स्वताच्या प्रतिष्ठेला सारखे जपत राहणे (८) लोकानी आपणाला सुंदर म्हणावे अशी महत्त्वाकाक्षा बाळगणे (९) योग्यता नसतांहि फाजील महत्त्वाकाक्षा धरणे, (१०) प्रत्येक कामात दुसऱ्यावर अवलबून राहणे, (११) स्वताचे दोष न पाहतां आपण पूर्णत्वाला गेलेले आहोत असा समज करून घेणे, हे व अशासारखे लोकविलक्षण प्रकार Neuroses या सदरांत पडतात

(३) काही व्यक्तिगत प्रश्न—काही व्यक्ति कारण असो नसो विशिष्ट आचरण-प्रकाराने विचित्र बनतात सदासर्वदा रागावत राहणे, आईबापावर अवलबून असणे, न्यूनगडाने वागणे, लैंगिक बाबतीत असतुष्ट असणे, कारण नसताना भीतभीत वागणे, सारखे काळजी करीत बसणे, लाडावलेल्या मुलाप्रमाणे अचरट वर्तन करणे, चारचौघात वागताना विचित्रपणा करणे, आपल्या उद्योगधद्याला सदा नावे ठेवणे, आळसात बसून राहणे, कोणत्याहि प्रश्नांची उत्तरे देताना नेहमी काचरणे इत्यादि दोषांनी पछाडलेल्या अनेक व्यक्ति आपण समाजात हरघडी पाहतो. विकृतीचा हा अत्यत सौम्य प्रकार आहे हे खरें, पण अशा व्यक्तीच्या आत्म्याचा विकास विघटनयुक्त आहे असेंच म्हणावें लागते.

**विघटनाचीं कारणें.**—अनुवशाने आलेल्या शारीरिक प्रवृत्ति व आजूबाजूची परिस्थिति यात सघर्ष निर्माण झाला म्हणजे आत्मत्वाच्या विकासात खंड पडू लागतो, याचाच अर्थ विघटनाला आरभ होतो. या संघर्षांत केव्हा केव्हा परिस्थिति मातबर ठरते तर काही व्यक्तींत आनुवंशिक प्रवृत्ति जोरदार ठरतात. काही झाले तरी हा समरप्रसंग आत्मविकासाला बाधक ठरतो हें मात्र खरें. या समरप्रसंगाचे प्रायः दोन मुख्य

प्रकार दिसून येतात. (१) शारीरिक व (२) आन्तरिक. एखाद्या नसला धक्का बसून तीत उत्पन्न झालेला बिघाड, साथीचे रोग, शरीरात कोणत्याना कोणत्यातरी प्रकाराने गेलेल्या विषाचे परिणाम इत्यादि शारीरिक विघटनेची कारणे होत. अनेक प्रकारचे गुप्त रोग (V D). भ्रमिष्टपणा, मेंदूचे विकार, आकडी, धनुर्वातासारखे विकार, सबंध शरीराची किंवा शरीराच्या काही भागांची लोकविलक्षण वाढ हे प्रकारहि याच सदरात पडतात. आन्तरिक कारणाची उदाहरणे म्हणून पुढील गोष्टी सांगता येतील. विरुद्ध स्वभावधर्माची जोडपी एकत्र आली म्हणजे वेळोवेळीं उडणारे खटके, लैंगिक बाबतीत असंतोष उत्पन्न झाल्यामुळे व्यक्तीचे होणारें विचित्र वर्तन, आपल्या प्रगतीचा म्हणून ठरलेल्या मार्गावर अडचणी आल्यामुळे उत्पन्न होणारी निराशा व ह्याच प्रकारचे अनेक सांसारिक झगडे इत्यादि गोष्टी अनेक व्यक्तीचें सुसूत्र जीवन बरबाद करून टाकतात. यातील काही आन्तरिक कारणें शारीरिक विकृति निर्माण करणारी असतात व कांहींचा परिणाम शरीरावर विशेषतः चेहऱ्यावर बिलकूल दिसत नाही; पण ती व्यक्ति मनातल्या मनात झुरत असते व त्यामुळे त्या व्यक्तीचे आचरण अनेकदा लोकाना चमत्कारिक वाटते.

या सर्व विवेचनावरून वाचकाचा असा समज होण्याचा संभव आहे की, समाजात 'संघटित' व्यक्तित्वापेक्षा 'विघटित' व्यक्तित्वच अधिक आहे दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे समाजातील बहुतेक माणसें कोणत्या ना कोणत्या वेडाने झपाटलेली असतात. मानसशास्त्रदृष्ट्या ही गोष्ट खरी असेलहि. कारण बहुतेक व्यक्तीच्या बाबतीत भावनिक झगडा हा बलवत्तर ठरतो; पण बऱ्याच व्यक्ति या झगड्यातून काही उच्च व उदात्त ध्येयें डोळ्यापुढे ठेवून, किंवा सत्संगतीचा लाभ मिळून, किंवा धार्मिक भावनेचा आधार घेऊन सुखरूप बाहेरहि पडतात भगवद्गीतेत 'स्थितप्रज्ञ' व्यक्ति ही आदर्श मानली आहे. सुसंगत आत्मविकासाची ती उच्चतम अवस्था समजली जाते. या अवस्थेप्रत सर्वांना जाता आले नाही, तरी तो आदर्श मनात बाळगून सामान्य व्यक्तीना आपल्या आन्तरिक झगड्याला यशस्वीरीतीने तोंड देतां येईल बहुतेक व्यक्ति समाजाने निर्माण केलेले विचार-उच्चार-आचाराचे दंडक पाळणाऱ्या असतात, जन्मजात अपूर्णावस्थेतून

त्या त्या समाजाने ठरविलेल्या विशिष्ट पूर्णत्वाकडे पुष्कळ व्यक्ति जाण्याचा प्रयत्न करतात अज्ञान नाहीसे करून ज्ञानाची प्राप्ति करून घेणे, बेजबाबदार वर्तनाचा त्याग करून समाजात आपला हक्क व जबाबदारी याची जाणीव ठेवून वागावयास शिकणे, लैंगिक बाबतीत स्वैरवर्तनाला आळा घालून सामाजिक नियमाप्रमाणे वैवाहिक सुखात समाधान बाळगून राहणे, अहंकार नियंत्रित करून दुसऱ्याशी प्रेमळ संबंध ठेवणे इत्यादि प्रकारे आपले व्यक्तित्व सुसंघटित होते. म्हणूनच सामान्यत समाजात सुसंघटित व्यक्तित्व असलेल्या अनेक व्यक्ति आपणास आढळतात व त्यामुळेच समाज प्रगत होत असतो

अशा विशिष्ट सामाजिक व्यक्तित्वाचा आदर्श शिक्षकांनी आपल्यापुढे ठेवला पाहिजे विद्यार्थ्यांच्या विकृति बारकाईने शोधून काढून त्या विकृतीतून विद्यार्थी सुखरूपपणे बाहेर कसे पडतील याचा विचार शिक्षकाने करावयास हवा अर्थात् या बाबतीत मानसशास्त्रज्ञ, मनोविश्लेषणपारंगत असे डॉक्टर इत्यादि तज्ज्ञांच्या साहाय्याची व मार्गदर्शनाची अत्यंत आवश्यकता आहे 'विघटित' व्यक्तींना सुसंघटित व्यक्तित्व परत मिळवून देणे हे शिक्षणाचे एक प्रधान अंग आहे ही गोष्ट शिक्षण-तज्ज्ञांना विसरून चालणार नाही.

## प्रकरण १४ वें

# अवधान व अभिरुचि



अवधानाचे सर्वसामान्य स्वरूप समजावून घेण्यापूर्वी अवधान म्हणजे काय ते पाहिले पाहिजे. ‘अवधान’ हा शब्द इतका सोपा आहे की प्रत्येकाला तो उच्चारल्याबरोबर त्याचा अर्थ समजेल व म्हणूनच वुइल्यम् जेम्स्ने आपल्या ‘मानसशास्त्राची तत्त्वे’ (Principles of Psychology) या पुस्तकात अवधानाच्या चर्चेच्या प्रारभीच असे म्हटले आहे की “अवधान म्हणजे काय हे प्रत्येकाला माहितच असते” तरीसुद्धा स्पष्टीकरणच करावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, मनाच्या ज्या अवस्थेत सर्व शक्ति एखाद्या वस्तूकडे अगर व्यक्तीकडे केन्द्रीभूत होतात त्या अवस्थेस अवधान अशी सज्ञा दिली जाते *

आपण सर्व आयुष्यात जो अनुभव जमा करू शकतो, तो अवधानाच्या साहाय्यानेच. ज्या विषयाकडे आपले मुळीच लक्ष नसेल तो विषय आपल्या अनुभवाच्या क्षेत्रांत बसणारच नाही. नेहमीच्या व्यवहारातून वरील विधानास पोषक अशी हवी तेवढी उदाहरणे देता येतील रस्त्याने आपण घाईघाइने चाललो असलो म्हणजे ओळखीचा मनुष्य शेजारून गेला तरी आपणास मुळीच समजत नाही याचे कारण असे की आपले सर्व अवधान निराळयाच ठिकाणी केन्द्रित झालेले असते. आवडती मैत्रीण घरी पाहुणी आली की तिच्या सहवासातील चार दिवस कसे गेले हे लक्षातहि

* Attention is the taking possession by the mind in clear and vivid form of one out of several simultaneously possible objects or trains of thought. Focalization and concentration of consciousness are for its essence.

येत नाही. कारण त्यावेळी आपले सर्व मन तिच्याशी गप्पागोष्टी करण्यात व हिंडण्याफिरण्यात इतके गर्क झालेले असते की वेळ कसा घालवीत आहोत याच्याकडे आपले लक्षच नसते यावरून आपणास असे दिसून येतें की, ज्याकडे अवधान नाही ते विषय आपल्या अनुभवाच्या कक्षेतच येत नाहीत.

लक्षित गोष्टीत काही वेळा मनुष्य इतका एकरूप होऊन जातो की त्यावेळी तो भोवतालच्या इतर सर्व गोष्टी तर विसरतोच; पण आत्यंतिक शारीरिक वेदनाहि विसरतो. पास्कल् व रॉबर्ट् हॉल् या दोन शास्त्रज्ञाबद्दल अशी आख्यायिका सागतात की, पाच डिग्रीइतका ताप अगात असताना सुद्धा आपल्या आवडत्या विषयावर दोन दोन तास ते तन्मयतेने बोलत. सामान्य माणसाच्या आयुष्यातहि देहभान विसरून एखाद्या विषयाशी एकरूप होण्याचे क्षण पुष्कळवेळा येतात. ज्या विषयाची उपजत आवड असेल त्या विषयाकडे अवधान केन्द्रित करून समरस होण्याची शक्यता अधिक.

एकाचवेळी मनुष्य किती विषयांवर अवधान केन्द्रित करू शकतो, हा अजूनहि वादाचा मुद्दा आहे. सपूर्ण अवधान खरोखर एका वेळी एकाच विषयाकडे असणे शक्य आहे. आपण जगांत अष्टावधानी अगर शतावधानी लोकाच्या गोष्टी ऐकतो. पण सवयीने काही कृति पक्क्या झाल्यानंतर त्यांना स्वतत्र अवधानाची जरुरीच लागत नाही. म्हणून सवय झालेल्या कांही कृति आपण एकाच वेळी करू शकतो. ज्या विषयाच्या ग्रहणासाठी मनाच्या जागृकतेची जरुरी आहे असा एकच विषय एका वेळीं अवधानाचे केद्र बनणे शक्य आहे.

## अवधानाच्या तऱ्हा

(१) अनैच्छिक अवधान(Involuntary or Reflex Attention) अनैच्छिक अगर प्रतिक्षेपात्मक अवधानांत मन विषयाकडे परिश्रमपूर्वक वळवावे लागत नाही. धूळ उडून डोळ्यापर्यंत आली की आपलें तिकडे आपोआपच लक्ष वेधते, व आपण डोळे मिटून घेतों. पायाला चटका बसला की तिकडे आपोआपच लक्ष जाऊन पाय उचलला जातो. डांस चावला म्हणजे त्या अवयवाकडे लक्ष जाऊन अवयव हलविला जातो.

मिरचीची भुकटी उधळून नाकात जाताच शिक येते, म्हणून आपण कोण मिरच्या कुटीत आहेत अशी चौकशी करतो. एकदम घाण आली तर नाकावर हात ठेवून आपण कशाची घाण येत आहे याची चौकशी करतो. वरील सर्व उदाहरणात क्रिया व प्रतिक्रिया अगदी प्रतिक्षेप स्वरूपाच्या आहेत. म्हणून अशा क्रियाच्या वेळी गुतलेल्या मन:स्थितीस आपण अनैच्छिक अगर प्रतिक्षिप्त अवधान असे म्हणतो.

(२) सवेदनावधान (Sensational Attention) म्हणजे इद्रियात स्वाभाविक सक्षोभ उत्पन्न करणाऱ्या विषयाकडे दिले जाणारे अवधान. भडक रगाची वस्तु दिसल्याबरोबर मुलाचे तिच्याकडे लक्ष वेधते आवाज करणाऱ्या खेळण्याकडे मूल ताबडतोब आकर्षिले जाते. रस्त्यात बँड वाजू लागल्यास मूल हातातले काम टाकून पळत रस्त्यावर येते खूप गर्दी जमून मोठा आरडाओरडा चालू असल्यास आपण थाबून काय घडले आहे याची उत्सुकतेने चौकशी करतो. आकस्मिक मृत्यु, अपघात, खुनाची बातमी वगैरे गोष्टी कानावर पडताच आपले लक्ष तिकडे सहजच वेधले जातें

(३) प्रतिमावधान (Attention to Ideal or Represented objects)—प्रत्यक्ष विषय समोर नसताना कल्पनेने तो मनश्चक्षूसमोर उभा करून आपण त्यावर अवधान केंद्रित करू शकतों इतकेच नव्हे तर त्या काल्पनिक विषयाशी एकरूप होऊ शकतो जितकी कल्पनाशक्ति अधिक दर्जाची तितकी काल्पनिक विषयाशी एकरूप होण्याची शक्यता अधिक.

(४) ऐच्छिक अवधान (Voluntary Attention)——आपल्याला आवड नसूनहि आपण काही हेतु मनात धरून एखाद्या विषयाकडे जें अवधान देतो त्यास ऐच्छिक अवधान असे म्हणतात परीक्षेसाठी नेमलेल्या सर्वच विषयाची काही आपणास आवड नसते, पण परीक्षेत पास व्हावयाचे हा हेतु असल्याने आपण प्रयत्नपूर्वक सर्व विषयाकडे अवधान देऊन त्यांचे ग्रहण करीत असतों

## अवधानाचे घटक

कोणत्याहि विषयाकडे आपले लक्ष वेधण्यासाठी काही अटी पूर्ण व्हाव्या लागतात. अवधान खेचून घेण्यास विषयात ज्या गुणांची जरुरी आहे त्यांचा प्रथम विचार करूं.

(१) प्रेरकाची तीव्रता (Intensity of the Stimulus)·—पुष्कळशा लहान आवाजात एखादाच आवाज कर्कश व मोठा असेल तर त्याकडे लगेच आपले लक्ष वेधते. वेताचा वारा वहात असताना आपल्याला त्याची फारशी जाणीव नसते, पण वादळ सुरू झाल्यास आपण इतर सर्व उद्योग बाजूला सारून वादळासबंधी विचार करू लागतो

(२) वस्तूचा आकार (Size of an Object) —फार उंच किंवा फार लठ्ठ मनुष्य इतराचे अवधान चटकन् वेधून घेतो वाहणाच्या दुकानात गेल्याबरोबर तेथे दिसणाऱ्या '१००' नंबरच्या प्रचंड वाहणेकडे आपले ताबडतोब लक्ष वेधते

(३) स्थान (Position) —दृष्टिक्षेत्राच्या मध्यावर असलेली वस्तु आपण सहज व प्रथम पाहू शकतो. रस्त्याने चालताना दुसऱ्या कडेने चालणाऱ्या माणसापेक्षा समोरून येणाऱ्या माणसाकडे आपले लक्ष अगोदर जाते

(४) गुणवैचित्र्य (Strikingness of Quality) —सर्वसामान्य आवाजापेक्षा जर एखाद्या माणसाचा आवाज वेगळा असेल तर तो चटकन् लक्षात येतो एखाद्या माणसाच्या पायाला चार किंवा सहा बोटे असतील तर त्याकडे आपले अवधान लवकर खेचले जाते

(५) गतिमत्व ·—स्थिर वस्तूपेक्षा गतिमान् वस्तूकडे अधिक लवकर अवधान वेधते. भोवतालच्या स्थिर वातावरणात एकदम एका झाडावरून उडून दुसऱ्या झाडावर बसणारा पक्षी किंवा अनपेक्षित रीतीने पडणारे फळ आपले लक्ष ताबडतोब वेधून घेते माणसाच्या मनस्थितीवरहि अवधान पुष्कळ अवलंबून असते

(६) उपजत कल व संपादित अभिरुचि —काही माणसाना संगीताची जात्याच आवड असते कोठूनहि गोड सूर ऐकू आला की ती माणसे उत्सुकतेने कान टवकारतात. रस्त्याच्या कडेला बसलेला चांभार रस्त्याने जाणाऱ्या शेकडो माणसाच्या पायाकडे पहात असतो, ज्याना कोडी सोडविण्यात गोडी वाटते ती माणसे नियतकालिक हाती पडताच प्रथम कोड्याचें पान उघडून वाचतील.

(७) विशिष्ट वेळची मनःस्थिति.—कोणत्याहि कारणाने मनाला अस्वस्थता आलेली असेल तर आपले कशाकडेच लक्ष लागत नाही. एरवी आपणास रेडिओ लावून बसण्यास आवडत असले तरी एखाद्या दुःखद बातमीने मन अस्वस्थ झाले असल्यास रेडिओ बंद करून टाकावासा वाटतो. अशा रीतीने कवि मिल्टनने म्हटल्याप्रमाणे मनःस्थितीतील फरक स्वर्गाचा नरक व नरकाचा स्वर्ग करू शकतो.

## अवधानाचे परिणाम

आपण मागे असे पाहिले आहे की ज्या विषयाकडे आपले अवधान नसेल तो विषय आपल्या अनुभवाच्या कक्षेत येऊच शकत नाही. यावरून असे दिसून येईल की (१) कोणत्याहि वस्तूचे स्पष्ट ज्ञान होण्यासाठी तिच्याकडे संपूर्ण अवधान केन्द्रित करण्याची सवय असावी लागते. (२) अवधानपूर्वक अभ्यास केल्यानेच कोणत्याहि वस्तूचे विशिष्ट गुणधर्म समजतात. (३) अवधानपूर्वक अभ्यासलेली गोष्ट चांगली लक्षात राहते. वर्गात एखाद्या तासाला जर आपण संपूर्ण अवधान देऊ शकलो तर त्या तासात शिकलेल्या गोष्टींचा ठसा मनावर अगदी स्पष्ट व खोल उमटतो व त्या गोष्टींचा पुन्हा अभ्यास न करताहि त्या आपल्या उत्तम लक्षात राहू शकतात. (४) अवधान दिल्याने विषयासंबंधीची प्रतिक्रिया होण्यास कमी वेळ पुरतो. समोरून येणाऱ्या गाडीकडे आपले लक्ष असले तर गाडी जवळ येताच आपण जरूर तेवढे पलीकडे सरकतो. पण आपल्या समोरून गाडी येत आहे हे शेवटपर्यंत लक्षातच न आल्यास, गाडी अगदी जवळ येताच आपण गोंधळून जातो व घाईघाईने पलीकडे सरकण्याऐवजी गाडीच्याच बाजूला सरकतो व अपघात होतो.

अशा रीतीने अवधानाशिवाय अनुभव नाही. अनुभवाखेरीज ज्ञान नाही व ज्ञानाशिवाय जीवनाचा विकास नाही. असे हे परस्परसंबंध असल्यामुळे अवधानाला मनोव्यापारात फार महत्त्वाचे स्थान आहे.

## अभिरुचि ( Interest )

अभिरुचि म्हणजे एखाद्या विषयाबद्दल वाटणारी आवड वा आसक्ति. अभिरुचि ही दोन प्रकारची असू शकते. (१) उपजत (Native or born) व (२) संपादित ( Acquired ).

उपजत अभिरुचीच्या दिशेने मनुष्याची गति फार लवकर व परिश्रम न करता होते एखाद्या कलावन्ताच्या मुलात त्याच्या कलेची आवड उपजतच आलेली असल्यास मुलाची त्या दिशेने फार झपाटयाने प्रगति होते.

सपादित अभिरुचि ही शिक्षणाने निर्माण होते लहानपणी शाळेत जे निरनिराळे विषय आपण शिकत असतो, त्यापैकी एखाद्याच विषयाची आवड आपणास वाटू लागते पुढे उच्च शिक्षणात आपण तो विषय ऐच्छिक म्हणून निवडतो. व सधि मिळाल्यास पुढे आयुष्यभरहि त्या विषयाचा व्यासग राहू शकतो.

आपणास ज्या विषयात उपजत अगर सपादित अभिरुचि वाटत असेल त्या विषयाकडे अवधान लवकर वेधले जाते. निरनिराळे खेळ तुमच्यापुढे ठेवल्यास तुम्ही ते सर्वच खेळाल असे नाही ज्याची आवड असेल तोच खेळ तुम्ही निवडाल. ज्याची विषयलालसा उपजतच फाजील प्रमाणात आहे त्या माणसाचे रस्त्याने चालताना फक्त स्त्रियाकडेच लक्ष असते; ज्या तऱ्हेच्या वाङमयाची अभिरुचि तुम्हाला वाटत असेल ते तुम्ही नेहमी वाचाल. या सर्व उदाहरणावरून असे दिसून येईल की आवड अवधानाची दिशा ठरवीत असते

## आवड निर्माण कशी करतां येईल ?

(१) कोणतीहि नवीन गोष्ट शिकविताना मुलाच्या उत्साहाचा जेव्हा पूर्ण भर असेल तेव्हाच ती शिकविण्यास सुरवात करावी. (२) नुसती माहिती सागत बसण्यापेक्षा प्रत्यक्ष वस्तु मुलाच्या हातात द्यावी म्हणजे तिची माहिती मूल अधिक आवडीने मिळविते. (३) एकाच विषयावर फार वेळ लांबलचक व्याख्यान देत बसल्यास तें अधिक कंटाळवाणें होते त्यापेक्षा प्रसंगोपात्त दिलेली माहिती अधिक चागली लक्षांत राहते. (४) सहली व खेळ याच्या द्वारे दिलेली माहिती अधिक मनोरंजक होते. (५) ऐतिहासिक, शैक्षणिक व आरोग्यविषयक चित्रपटांच्या साहाय्याने विषय समजावून दिल्यास मुले अधिक आवडीने शिकतात.

## प्रकरण १५ वें

# ज्ञानग्रहणाच्या पायऱ्या



(अ) **वेदन** :—आतापर्यंत केलेल्या मानसशास्त्राच्या अभ्यासावरून आपणास एक गोष्ट अशी माहीत झाली आहे की, मानसशास्त्रात आपण मानवी अनुभवाचा एका विशिष्ट दृष्टिकोनातून अभ्यास करतो अनुभवाची शक्यता निर्माण होण्यासाठी आपणास दोन स्वतंत्र वस्तु गृहीत धराव्या लागतात. या दोन वस्तु म्हणजे एक अनुभव घेणारा ( मी ) व ज्याचा अनुभव घ्यावयाचा ती बाह्य वस्तु अशा तऱ्हेच्या दोन स्वतंत्र वस्तु गृहीत धरल्यानंतर बाह्य विषय अनुभवाच्या कक्षेत कसा येतो याचे स्पष्टीकरण करणे जरूर आहे. कोणताहि बाह्य विषय आपल्याला कळण्यास एकच मार्ग व तो म्हणजे त्या विषयासंबंधीची वेदने ( Sensations ) आपल्या पंचेन्द्रियाच्या साहाय्याने वस्तु दृग्गोचर होत असताना आपण वेदनाच्या द्वारेच तिचा अनुभव घेऊ शकतो याच अर्थी लॉक्‌ने असे म्हटले आहे की ज्ञानग्रहणाच्या कार्यात वेदनारूपी दरवाजा प्रथम उघडतो पंचेन्द्रिये नसती तर आपल्याला बाह्य जगाचे ज्ञानच होऊ शकले नसते वुइल्यम् जेम्स्‌नेहि असे म्हटले आहे की, जाणिवेच्या प्रांतात शिरताच प्रथम वेदने दृष्टोत्पत्तीस येतात. जागृतीच्या प्रांतात वेदन हा विषयज्ञानाच्या मार्गांतील पहिला दरवाजा होय. वस्तूचे अस्तित्व व बाह्य स्वरूप या दोन्ही गोष्टीचे ज्ञान करून देणे हे वेदनाचे कार्य होय. अनुभव घेणारा व जिचा अनुभव घ्यावयाचा ती बाह्य वस्तु या दोहोंमध्ये वेदनाचा सूक्ष्म पडदा आहे वेदनांना व्यक्तीपलीकडे असे स्वतंत्र अस्तित्व नाही. अंतःसृष्टि व बाह्य जग यांना जोडणारा वेदन हा एकच दुवा आहे. आपल्या अस्तित्वापलीकडील कोणत्यातरी विषयाची माहिती देणे हे वेदनाचे मुख्य कार्य होय

स्मृति व साहचर्य याच्या साहाय्याने आपण वेदनाच्या द्वारे मिळविलेली माहिती मनात साठवून ठेवतो. अनुभवाची जुळणी करून तयार केलेली माहिती व वेदनाच्या साहाय्याने मिळविलेली वस्तूची माहिती ह्या दोन्ही एकच आहेत असे म्हणणे चूक आहे एक पाढरा व एक काळा ससा पाहून आपण मनात असा निर्णय बाधतो की, काळ्या सशापेक्षा पाढरा ससा जास्त चागला दिसतो येथें "**जास्त चांगला**" ही जी कल्पना आहे ती काही प्रत्यक्ष वेदनातून मिळविलेली नाही.

प्रत्येक इन्द्रियाच्या वेदनाचे स्वरूप जरी विशिष्ट असले तरी सर्व वेदनामध्ये आढळून येणारे असे काही सामान्य गुणधर्महि आढळतात. सुरुवातीस वेदनाचे प्रकारभेद जाणून घेणे आवश्यक आहे

(१) (अ) इद्रियभेदाच्या दृष्टीने वेगळी असणारी वेदने. उदाहरणार्थ, चाक्षुषवेदन, श्रोत्रवेदन, घ्राणजवेदन, रासनवेदन, स्पार्शनवेदन.

(ब) एकाच वेदनात असणारे पोटविभाग उदाहरणार्थ, निळ्या रगाचे वेदन, हिरव्या रगाचे वेदन, पिवळ्या रगाचे वेदन वगैरे मधुर आवाजाची व कर्कश आवाजाची वेदने वगैरे

(२) वेदन एकाच तऱ्हेचे असले तरी त्याच्या तीव्रतेत फरक असू शकतो ( Difference in Intensity ).

(३) कालावधि —प्रत्येक वेदनाचा ठराविक कालावधि असतो

(४) क्षेत्र ( Extensity )—डोक्याचे २-३ केस ओढले म्हणजे होणारे वेदन व झिजोट्या मुठीत धरून ओढल्या म्हणजे होणारे वेदन यातील फरक आपणास वेदनाचे क्षेत्र सागू शकतो कातडीच्या लहान भागावर चिमटा काढणे व मोठ्या भागावर चिमटा काढणे यामुळे निर्माण झालेल्या वेदनात क्षेत्राचाच फरक असतो.

(५) वेदनात फरक दोन तऱ्हानी पडू शकतो. ( अ ) प्रेरकात फरक पडल्यामुळे वेदनात फरक पडणे ही एक तऱ्हा (ब) एकच प्रेरक असून इन्द्रियाच्या किवा शरीरावरील जागेच्या फरकामुळे वेदनात फरक होणे ही दुसरी तऱ्हा कडत पदार्थामुळे जिभेला ज्या तऱ्हेची वेदनें

होतील त्या तऱ्हेची वेदने हाताच्या बोटाना होणार नाही. शरीराच्या वेगवेगळ्या भागातील वेदनक्षमनेतील फरकास स्थानिक चिन्हे (Local signs) असे म्हणतात स्थानिक चिन्हातील फरक हा प्रेरकावर अवलंबून नसतो, प्रेरकाची क्रिया ज्या भागावर होणार त्या भागावर अवलबून असतो उजव्या हाताला होणारे वेदन व डाव्या हाताला होणारें वेदन यात फरक आढळतो

(आ) **अवबोध** (Perception, विषयग्रहण) —अवबोध ही ज्ञानग्रहणाच्या क्रियेतील महत्त्वाची पायरी होय बाह्य विषयाचे वेदन मिळाल्यानतर त्यात अर्थ भरला म्हणजे अवबोध होतो अगदी सोपे करून सागावयाचे झाल्याम असे म्हणता येईल की अवबोध = वेदन + अर्थ

(१) अवबोधाचे कार्य फक्त त्या विशिष्ट काळातच होऊ शकते भूतकाळात घडलेल्या अगर भविष्यकाळात घडावयाच्या वेदनावर अवबोधाचे कार्य होणे शक्य नाही

(२) अवबोधाच्या कार्यास अवधानाची फार जरुरी आहे बाह्य सृष्टीतील जरूर त्या गोष्टीचे एकत्रीकरण करून त्यावरून विषयासबधीचे सुसूत्र ज्ञान प्राप्त होते, व अर्थग्रहण केले जाते अवधान ही विषयग्रहणाची दीपिका आहे उदाहरणार्थ, एखाद्या डोगराच्या कड्यावरून चढत असताना सर्व अवधान पायाखालच्या रस्त्याकडे व हाताने धरलेल्या आधाराकडे केंद्रित करावे लागते

(३) निरनिराळे अवबोध एकत्र येऊन एक सुसूत्र प्रतिक्रिया तयार होते. इंद्रियाच्या वेदनांनुसार प्रतिक्रियेतील प्रत्येक दुवा आकार धारण करीत असतो

(४) प्रत्यक्ष अवबोधाच्या कार्यात मुक्त कल्पनाविलासाला (Trains of free Ideas.) वाव नाही. त्याचप्रमाणे प्रत्यक्ष विषयग्रहणाच्या वेळी अमूर्त कल्पनाहि (Concepts) हजर नसतात.

(५) एकाच प्रेरकाला देता येण्यासारख्या निरनिराळ्या प्रतिक्रियाचा तुलनात्मक विचारहि प्रत्यक्ष अवबोधाच्या वेळी हजर नसतो. बाहेरून इंद्रिय-

द्वारा आलेल्या वेदनात अर्थ भरणें येवढेच अवबोधाचे कार्य अवबोध हा प्रतिक्रियेची दिशा व रूपरेषा ठरवितो.

आपल्या व जगाच्या ओळखीस वेदनाने सुरुवात होते. वेदनाचा अर्थ लावणे ही ज्ञानग्रहणातील दुसरी पायरी व तिसरी पायरी म्हणजे सामान्य कल्पनाचा उदय (Concepts) यातूनच कल्पनाविलास जन्माला येतो. आपल्या खऱ्या शिक्षणास अवबोधापासून सुरवात होते. प्राण्याच्या पोराना जरूर तो अवबोध जन्मल्यापासून फार थोड्या काळात होतो. माणसाच्या मुलाच्या मेंदूत असे तयार दुवे फार थोडे असतात. म्हणून जन्माला आल्या-बरोबरच्या प्राण्याच्या व माणसाच्या मुलाची तुलना केल्यास असे आढळून येते की प्राण्याचे मूल जास्त बुद्धिमान असतें, पण प्राण्याच्या मुलाच्या मेंदूत वाढ होण्याची शक्यता फारच कमी असते माणसाच्या मुलाची बुद्धिमत्ता हवी तेवढी वाढू शकते.

अवबोधातून स्मृति व साहचर्य याची घडण होत असते. पहिल्या पहिल्यादा एका विषयाच्या अवबोधाचे वेळीच जर दुसऱ्या एखाद्या विषया-चा अवबोध झाला तर त्या दोन अवबोधाचे मनात पक्के साहचर्य जमते व पुढे एका अवबोधाची स्मृति जागृत झाल्यास दुसरा अवबोध त्याच वेळी जागृत होतो प्रत्येक नवीन अवबोधाचा अर्थ आपण मागच्या अवबोधानुसार लावीत असतो. ही शक्ति लहान मुलापेक्षा मोठ्या माणसात अधिक प्रमाणात असते. म्हणून लहान मुलाना फक्त अवबोध होतो, तर मोठ्या माणसाना प्रबोध (Apperception) होतो

निरनिराळ्या अनुभवाच्या द्वारे होणारी वेदनाची जाणीव ज्ञानतंतूकडून मेंदूतील निरनिराळ्या केंद्राकडे पोचते या ठिकाणी वेदनाचा अर्थ लावला जातो व त्यालाच आपण अवबोध असे म्हणतो. नंतरच्या प्रत्येक वस्तूकडे पूर्वानुभवाच्या चष्म्यातून पाहिले जाते. या क्रियेलाच प्रबोध (Apperception) असे म्हणतात. अवबोध व प्रबोध याच्या कार्याला स्मरण व कल्पनाशक्ति मदत करीत असतात.

वस्तूची ओळख करून देण्याच्या दृष्टीने अवबोधाचे दोन भाग कल्पिता येतात.

(१) वस्तूच्या गुणधर्माचे ज्ञान होणें (२) वस्तूसंबंधी मनाला सुखात्मक अगर दुःखात्मक वेदनाचा अनुभव मिळणे.

(इ) **सामान्य बोध** (Concepts)

सामान्य वर्गवारीच्या कल्पना तयार करण्याचे कार्य संपूर्णपणे मनाचेच असते कारण बाह्य जगात आपल्याला विशिष्ट वस्तु दिसतात. एकाच तऱ्हेच्या बऱ्याच वस्तु पाहिल्यानंतर त्या सर्वात दिसून येणाऱ्या सामान्य गुणधर्मांबद्दल आपण विचार करू लागतो. हे सर्वसामान्य गुणधर्म एकत्र कल्पून ते धारण करणाऱ्या वस्तूची कल्पना डोळ्यासमोर उभी करतों. एकाच जातीच्या शेकडो वस्तूचे निरीक्षण करणे, त्या सर्वांत सारखेच दिसणारे गुणधर्म शोधून काढणे व त्या सर्वसामान्य गुणधर्मांनी युक्त अशी वर्गनिदर्शक वस्तु डोळ्यासमोर उभी करणे, या मानसिक क्रिया करता यण्यास मन बरेच प्रगल्भ व्हावे लागते म्हणूनच लहान मुलाना सामान्यनामाची अगर भाववाचक नामाची कल्पना येत नाही. शास्त्रीय ज्ञानाचा पाया सामान्यनामावरच उभारलेला असतो कारण वस्तूची वर्गवारी करून त्यातील सामान्य गुणधर्मांची कल्पना आल्याखेरीज शास्त्रीय ज्ञानाला प्रारंभच होऊं शकणार नाही

## वेदनांसंबंधी वेबर्-फेक्नर् सिद्धान्त

वेबर् व फेक्नर् यानी निरनिराळी वेदने व प्रेरक याचा अभ्यास करून जो सिद्धान्त शोधून काढला. त्याचे मूलतत्त्व असे की ज्या प्रमाणात प्रेरकात फरक होतो त्याच प्रमाणात वेदनात फरक होत नाही. प्रत्यक्ष प्रयोग करताना प्रेरकात किती फरक झाला असता वेदनात समजून येण्याइतका फरक पडतो, याकडे त्यानी विशेष लक्ष दिले व निरनिराळ्या प्रयोगात त्याना असें दिसून आले की, वेदनात कळून येण्याइतका फरक होण्यासाठी प्रेरकात एक ठराविक अशानें वाढ व्हावी लागते मग तो मूळ प्रेरक कितीहि तीव्र असो. या ठराविक अशास बोधाची मर्यादा (Threshold of discernment) असे म्हणतात त्याचप्रमाणे सुरवातीला वेदना निर्माण होण्यासहि प्रेरकाची तीव्रता ठराविक अंश असावी लागते. त्याशिवाय कोणतेहि वेदन निर्माण होऊंच शकत नाही. तीव्रतेच्या या अंशास वेदनानिर्मितीची अंतिम मर्यादा असें नाव त्यांनी दिलें.

फेक्नर्च्या मतें प्रेरकाच्या तीव्रतेत फरक पडला की वेदनातहि फरक पडलाच पाहिजे तो जरी समजण्यात आला नाही तरी समजून येण्यापूर्वी फरकच पडत नाही असे आपणास म्हणता येणार नाही. प्रथम न समजून येणारा सूक्ष्म फरकच एका ठराविक अंशापर्यंत आला म्हणजे समजतो.

प्रेरकाच्या तीव्रतेत पडणाऱ्या फरकाचे प्रमाण व त्यानुसार वेदनांत पडणाऱ्या फरकाचे प्रमाण यासबंधीचा फरक-नियम फेक्नर्ने खालीलप्रमाणे दिला आहे.

प्रेरकात होणारे फरक भूमितिश्रेणीत असले तर वेदनात होणारे फरक गणितश्रेणीत असतात.*

या नियमाच्या बाबतीत फेक्नर्चे म्हणणे असे की प्रेरक व वेदन यांमधील हा संबंध अगदी निश्चित स्वरूपाचा आहे, पण हे तितकेसे खरे नाही. उदाहरणार्थ, २५ कँड्ल् पॉवरचा दिवा काढून त्या ठिकाणी ५० कॅन्ड्ल् पॉवरचा दिवा खोलीत लावल्यास डोळ्याना वेदनात जितक्या प्रमाणांत फरक भासेल तितका फरक २०० कॅन्ड्ल पॉवरचा दिवा काढून त्याच्या जागी २५० कॅन्ड्ल् पॉवरचा दिवा लावल्यास भासणार नाही

प्रेरक व वेदन याचे सर्वसामान्य प्रमाण दाखविण्याच्या दृष्टीनें फेक्नर्चा सिद्धान्त ठीक आहे, पण त्याला ततोतत निश्चित स्वरूप देणें शक्य नाही. कारण उजेडाच्या फरकाची वेदने आकड्यात मोजता येणार नाहीत व इतर काही वेदनाबाबतहि हीच अडचण येईल वेबर्–फेक्नर् सिद्धान्ताबद्दल फक्त येवढेच म्हणतां येईल की, सर्वसामान्यतः प्रेरकांत ज्या प्रमाणात फरक पडतो त्या प्रमाणात वेदनात फरक पडत नाही



* When the variations in the stimulus form a geometerical series, the corresponding variations in the sensation form an arithmetical series.

प्रकरण १६ वें

# ज्ञानग्रहणाच्या पायऱ्या [पुढे चालू]



(ई) **कल्पकता** —सर्वसामान्य व्यवहारात काल्पनिक म्हणजे सत्य-सृष्टीचा ज्याला काही आधार नाही ते, असा अर्थ केला जातो काल्पनिक गोष्टी खोट्या मानण्याकडे आपली सर्वसामान्य प्रवृत्ति असते, पण या जगात व मनोव्यापारातहि सपूर्ण खोटे किंवा असत्य असे काहीच नाही. फक्त प्रत्येक वस्तु किंवा अनुभव किती प्रमाणात सत्य आहे एवढाच प्रश्न असतो, अर्थात् ज्याला आपण काल्पनिक असे म्हणतों तेहि सत्यावरच आधारलेले असते सोन्याचा पर्वत ही कल्पना घेऊ व्यावहारिक सृष्टीत आपणास सोने दिसते व पर्वतहि दिसतो व त्यातूनच रचनात्मक शक्तीने सोन्याच्या पर्वताची कल्पना निर्माण केली जाते मग ती पूर्ण असत्य असें कसे म्हणता येईल ? साराश, स्वप्नसृष्टीलाहि सपूर्ण असत्य असे म्हणता येणार नाही. म्हणूनच कल्पनाशक्तीची व्याख्या अशी करावी लागेल की, जे पंचेन्द्रियाना प्रत्यक्ष अवगत होत नाही ते मनासमोर आणण्याचे कार्य जी शक्ति करते ती कल्पनाशक्ति होय.

कल्पनाशक्तीची दोन कार्ये प्रमुख म्हणून सागता येतील. (१) 'गरज लागली की मनुष्य सशोधनाकडे वळतो' अशी जी एक म्हण आहे तिच्यात कल्पनेचे एक कार्यच सागितलेले आहे. रेडिओ, ग्रामोफोन, वीज, तारायंत्र या गोष्टी एका काळी अगदी अशक्य व हास्यास्पदच वाटल्या असतील; पण शास्त्रज्ञाच्या अफाट कल्पनाशक्तीतूनच ही सत्यें बाहेर पडलेली आहेत. व आपण त्याचा प्रत्यक्ष उपभोग घेत आहोत. (२) कल्पनेचे दुसरें कार्य म्हणजे सौंदर्योपासना व कलानिर्मिति. मनुष्याला ज्या ज्या गोष्टी आयुष्यांत कधीहि मिळणें शक्य नसते त्याचा उपभोग तो कल्पनेंत घेऊं शकतो व

त्यामधूनहि त्यास किनीतरी आनंद मिळू शकतो. नाट्य, चित्र, वाङमय वगैरे सर्व सौंदर्यस्थळांचा उगम ह्याच शक्तीचे ठिकाणी असलेला दिसून येईल.

वयाचे वाढीबरोबरच कल्पनाशक्तीचे स्वरूपहि भिन्न भिन्न होत चाललेलें दिसून येतें. या शक्तीच्या विकासास वयाचे तिसऱ्या वर्षापासून साधारणत: सुरुवात होते. यावेळी मुलाचे सत्यसृष्टीचें ज्ञान फारच कमी असतें; त्यामुळे कल्पनेला एक प्रकारचे अवास्तव व अवाढव्य स्वरूप आलेले दिसते. उंबऱ्यावर ठेच लागून पडले की मूल रडू लागतें, पण उबऱ्याला एक चापट मारली की त्याचे समाधान होऊन ते रडावयाचे थाबतें काठीला घोडा समजून मूल खेळत असले तरी त्यास कोणत्याहि तऱ्हेची कमतरता भासत नाही; पण शिक्षणामुळे व्यावहारिक सृष्टीच्या मर्यादा जसजशा स्पष्ट होत जातात तसतशी कल्पनाशक्तीची ही अवास्तवता कमी होत जाते. शिक्षण आणि अनुभव यानी व्यवहारशक्तीच्या मर्यादा जसजशा स्पष्ट आणि सुव्यक्त होऊं लागतात तसतशी बालसदृश—किंबहुना बालिश कल्पनाशक्तीची—सृष्टि त्यात अंतर्धान पावू लागते देशकालमानाप्रमाणे मुलाच्या कल्पनाशक्तीतहि फरक असलेला दिसून येतो.

मनुष्य कितीहि अडाणी असला तरी सत्य व काल्पनिक यांत तो फरक करीत असतो. अनुभवाशी वस्तूचा मेळ ज्या मानाने बसेल त्या मानाने तो ती वस्तु खरी किंवा खोटी ठरवितो; पूर्वीची माणसे पृथ्वी स्थिर आहे हें सत्य मानीत. पृथ्वीच्या गतीची कल्पना खोटी वाटे. पण आता पृथ्वी गतिमान् असून ती सूर्याभोंवती फिरते ही गोष्ट प्रयोगाने सिद्ध झाल्याने लोक खरी मानतात.

सर्व माणसांची कल्पनाशक्ति सारखीच तीव्र असेल असे नाही. माणसाची ज्ञानेन्द्रिये जितकी तीव्र, अनुभवाच्या प्रतिमा जितक्या अधिक स्पष्ट, तितकी कल्पनाशक्तीहि अधिक तीव्र असण्याचा संभव असतो. असामान्य कल्पनाशक्ति ही मात्र उपजतच असावी लागते. संगीतात जे एकूण शुद्ध व कोमल स्वर आहेत त्यातून शेकडो रागाची रचना झालेली आहे; पण प्रत्येक गवई राग शोधू शकेल असें नाही. त्याला तानसेनासारखा असामान्य कलावान् जन्मावा लागतो. आतापर्यंत उपलब्ध असलेल्या माहितीवरून कल्पनाशक्तींत शिक्षणाने थोडीफार वाढ होऊं शकते असे शास्त्रज्ञांचें मत आहे.

पूर्वानुभवावरून भावी वर्तणुकीला वळण लावण्याची कल्पकता मात्र प्रत्येक व्यक्तीत असते.

कल्पनाशक्तीत पुनःप्रत्यय व नवनिर्मिति असे दोन भाग आढळून येतात. पुनःप्रत्यय म्हणजे दुसऱ्याने केलेल्या वर्णनाबरहुकूम मनांत कल्पना उभी करणें. कादंबरी वाचतांना ही गोष्ट करावी लागते. नवनिर्मिति म्हणजे आपण स्वतः काहीतरी नवीन कल्पना शोधून काढणें. ज्या माणसाच्या भावना फार तीव्र असतात त्याला शिक्षणाची जोड मिळाल्यास तो काव्यकल्पना निर्माण करतो. बुद्धिप्रधान मनुष्य आपल्या अचाट कल्पनाशक्तीच्या साह्याने शास्त्रीय सत्ये निर्माण करतो. एखादा पक्षी अकाशांत उडत असतांना पाहिल्यास भावनात्मक दृष्टिकोनाचा मनुष्य त्यावर काव्य करील. बुद्धि-प्रधान माणसास विमानाची कल्पना सुचेल. भरपूर संधि मिळाल्यास लहान मुलाची कल्पनाशक्ति थोडीफार वाढू शकेल.

(उ) **कल्पनाशक्ति व दिवास्वप्नें :**—बाह्य सृष्टीतील एखाद्या वस्तूचे वेदनांच्याद्वारा जे ज्ञान होते त्यास आपण अवबोध असें म्हणतों. पण कोणतीहि बाह्यवस्तु समोर नसताना भूतकालातील अनुभवासंबंधीच्या प्रतिमा आपण डोळ्यासमोर उभ्या करूं शकतों. याना “मानसिक प्रतिमा” असे म्हणतात हे कार्य मन स्वतत्र रीतीने करतें. पंचेन्द्रियें जीं वेदनें देतात, त्या निरनिराळ्या सर्व अनुभवाची चित्रें सर्वांना सारख्याच स्पष्टपणें डोळ्यासमोर उभी करतां येतात असे नाही. काहींना फक्त डोळ्यानी पाहिलेल्याच गोष्टीच्या स्पष्ट मानसिक प्रतिमा डोळ्यासमोर उभ्या करणें जमते तर काहींना फक्त कानानी ऐकलेल्या आवाजांची स्मृतिचित्रें उत्तम रीतीनें मनासमोर उभी करता येतात काहींना स्पर्श केलेल्या गोष्टीच्या मान-सिक प्रतिमा अधिक स्पष्टपणे डोळ्यासमोर उभ्या करता येतात. सिरील् बर्ट्‌ने एका प्राध्यापकासंबंधी एक उदाहरण दिले आहे. लांबट पाकिटाच्या मागील बाजूस वर्गात द्यावयाच्या व्याख्यानाचे मुद्दे टिपून घ्यावयाची त्याला सवय असे. हे मुद्दे लिहिलेले पाकीट वर्गांत जाताना बरोबर नेण्यास तो पुष्कळ वेळा विसरे. अशा वेळी पाकिटाच्या आकाराची आठवण करून देणाऱ्या लांबलचक छपराकडे पाहिले की तेथे व्याख्यानाच्या मुद्द्याची स्पष्ट मानसिक प्रतिमा त्यास दिसे व लगेच तो पुढचा मुद्दा सांगण्यास सुरवात करी.

मानसिक प्रतिमा डोळ्यासमोर उभी करण्याची प्रत्येकाची तऱ्हा व कुवत जरी वेगवेगळ्या प्रकारची असली तरी थोड्याफार प्रमाणात प्रत्येक अनुभवाची मानसिक प्रतिमा निर्माण करण्याची शक्ति प्रत्येकात असतेच आयुष्यात निर्माण होणारे निरनिराळे प्रश्न सोडविण्यासाठी या मानसिक प्रतिमांची फार मदत होते. भोवतालच्या परिस्थितीचे निरीक्षण करून अनुरूप हालचाल करणारा माणूस, मुलांना अभ्यासात येणाऱ्या अडचणींची आधीच अटकळ बांधणारा शिक्षक, आपल्या बाजूला पोषक असा सर्व पुरावा विचारपूर्वक जमविणारा पोलिस अधिकारी, मतदारांना खूष करण्या-साठी त्यांना भरमसाट आश्वासने देणारा राजकीय पुढारी, नसते वेताळ स्वतःच्या डोळ्यासमोर उभे करणारा पिसाटवेडा, व स्वर्ग भूमीवर उतरवू पाहणारा कवि, या सर्वांनाच मानसिक प्रतिमा फार मदत करीत असतात. जितके कार्य अधिक बिकट तितकी कल्पनाशक्तीची जरुरीहि अधिक.

सर्वसामान्य व्यवहारातहि आपणास असा अनुभव येतो की प्रत्येक कृति करावयास प्रत्यक्ष सुरुवात करण्यापूर्वी त्या कृतीचे मानसिक दृश्य आपल्या डोळ्यासमोर उभे राहते सैन्याची एक हालचाल निश्चित करण्यापूर्वी शक्य असलेल्या हालचालींच्या कितीतरी मानसिक प्रतिमा सेनापतीच्या डोळ्यासमोर येत असतील. सामाजिक जीवन सफल करण्या-साठीसुद्धा मानसिक प्रतिमा निर्माण करणाऱ्या कल्पनाशक्तीची फार जरुरी आहे. लोकांच्या मनात कोणकोणते विचारतरंग उठत आहेत याची कल्पना आल्याखेरीज आपल्या प्रतिक्रिया आपणास निश्चित करता येणार नाहीत स्वतःचे अंतर्निरीक्षण व भोवतालच्या व्यक्तींच्या वर्तणुकीचा अंदाज करणारी कल्पनाशक्ति या दोन गोष्टींवरच आपले सामाजिक जीवन सर्वस्वी अवलंबून असते. वैयक्तिक व्यक्तिमत्त्वाचे वैभव वाढविण्यात सामाजिक कल्पनाशक्तीचा भाग फार मोठा असतो

मोठ्या माणसाप्रमाणेच लहान मुलाच्या जीवनातहि मानसिक प्रति-मांचा व त्या निर्माण करणाऱ्या कल्पनाशक्तीचा भाग फार महत्त्वाचा आहे मुले साधारण मोठी झाल्यावर तर त्यांच्या जीवनाचा बहुतेक भाग काल्पनिक अनुभवानीच व्यापलेला असतो. ही गोष्ट त्यांच्या प्रत्येक कृतीत प्रतीत होत असते. एखाद्या अभिजात कवीप्रमाणेच आवडत्या गोष्टी

डोळ्यासमोर नसतानाहि त्याच्या मानसिक प्रतिमा निर्माण करून मुले त्यांत तासन्तास रममाण होतात सर्व तऱ्हांच्या मानुष, अमानुष व अतिमानुष वस्तूशी एकरूप होऊन त्याचा अनुभव घेण्याचा प्रयत्न मुले करीत असतात मुलाच्या निरनिराळ्या खेळात ही गोष्ट उत्तम रीतीने प्रतीत होते. कोणताहि प्रसग अनुभवीत असताना मुलें त्या क्षणापुरते स्वत.ला विसरून जातात एका चार वर्षांच्या मुलाने कोबडीचे पिलू तडफडताना पाहिले व लगेच डोळ्यात पाणी आणून तो आईला म्हणाला, ' ते आईला हाक मारतय् ग ! लवकर जाऊन त्याच्या आईला घेऊन ये. '') जरा काही दुखू खुपू लागल्यास मूल आईलाच हाक मारणार हा सहानुभव वरील उदाहरणात चागलाच व्यक्त होतो.

|कल्पनाशक्तीवर भावनाचा रगहि नेहमी चढलेला दिसतो.| जेव्हा मनुष्य स्वत: आनदात असेल तेव्हा त्याला त्याच्या आयुष्याची सुखमय बाजू दिसण्याचा सभव अधिक असतो. उलट जेव्हा तो दु.खी असेल तेव्हा त्याच्या आयुष्याची निराशाजनक बाजू त्याला अधिक भडक रंगात दिसते.

**दिवास्वप्न** हा कल्पनेच्या खेळाचाच एक प्रकार आहे दिवास्वप्न व स्मृतिचित्र यात फरक आहे. स्मृतिचित्रात फक्त भूतकाळातील अनुभवाचाच समावेश झालेला असतो. पण दिवास्वप्नांत भविष्यकाळातील वांच्छित घटनाचाहि समावेश होतो प्रत्येक दिवास्वप्नाला एखादा नायक असतो. ही स्वप्नसृष्टि डोळ्यासमोर उभी करणारी व्यक्तिच बहुधा ही नायकाची भूमिका करीत असते; किवा ज्या व्यक्तीभोवती दिवास्वप्नातील सर्व घटना केन्द्रीभूत झालेल्या असतील ती व्यक्ति नायक असते. आईच्या सर्व दिवास्वप्नांचा नायक तिचा मुलगा अगर पति असतो, शेख महमदाचे लक्षाधीश होण्याचे स्वप्न,' एखाद्या मोलकरीण-कामकरी बाईने अत्यंत धनाढ्य स्त्री होण्याचे डोळ्यासमोर पाहिलेलें सुखस्वप्न, ही दिवास्वप्नाचीच उदाहरणे आहेत. यावरून असे दिसून येईल की ज्या आकाक्षा जीवनांत प्रत्यक्ष सफल होणे शक्य नाही त्याची काल्पनिक चित्रें डोळ्यासमोर रगविण्यात व त्यात ंग होण्यात माणसे एकप्रकारचें सुख मानीत असतात अशा तऱ्हेच्या दिवास्वप्नाला विजिगिषु दिवास्वप्न असें

नांव देतात. एखादा अशक्त मनुष्य नेहमी स्वतः एखादा पैलवान आहों असे कल्पून खूप कुस्त्या जिकल्याची दिवास्वप्नें रगवीत असतो.

काही दिवास्वप्ने अशी असतात की मिळालेल्या अपयशाचे समर्थन करण्याची त्यांत प्रवृत्ति दिसून येते दुसऱ्याकडून निव्वळ अन्याय झाल्याने योग्यता असूनहि एखादी गोष्ट आपणास मिळाली नाही असे इतराम पटविण्यात व्यक्तीला वाटणारें समाधान या दिवास्वप्नात प्रतीत होत असतें. अशा प्रकारच्या स्वप्नास दुःखविवेचक दिवास्वप्न ( The suffering hero type ) असें म्हणतात.

काही वेळा आपण एखाद्या घटनेबद्दल काळजी करीत असतो त्या काळजीत हे अध्याहृत असते की आपण प्राप्त परिस्थिति बदलण्यास असमर्थ आहोत आपल्या नात्यातील एखादे मनुष्य आजारी असतें. सर्व तऱ्हेची औषधें व उपचार करूनहि त्यास काही गुण वाटत नाही. अशा वेळी मन प्रयत्नांच्या दौर्बल्यासबंधीची चित्रे डोळ्यांसमोर उभी करीत असते या प्रकारच्या दिवास्वप्नाना दुःखान्वित दिवास्वप्नें (The worry type) असें नाव देतात.

दिवास्वप्नावरून मनुष्याच्या मानसिक जीवनासंबंधीची बरीच कल्पना येते. स्वप्नाप्रमाणे दिवास्वप्नातहि अतृप्त अशा आशाना व आकाक्षाना भरपूर वाव मिळतो आपले सर्व विचार कृतीत उतरविताना सत्यसृष्टीत जे अडथळे येतात त्याना स्वप्नसृष्टीत मुळीच स्थान नसते.

शिक्षकाच्या दृष्टीने दिवास्वप्नाचे महत्त्व फार आहे. ठराविक मर्यादेत दिवास्वप्नाचा अनुभव लहान व मोठी सर्वच माणसे घत असतात./जितकी कल्पनाशक्ति अधिक तितक्या प्रमाणात दिवास्वप्नेहि अधिक दिवास्वप्नाचा जास्तीत जास्त अनुभव मूल १२ ते १४ वर्षाच्या वयात घेत असतें. प्रमाणाबाहेर दिवास्वप्नात दग होण्यापासून तोटा होण्याचा असा संभव असतो की मूल निष्क्रिय होण्याची शक्यता वाढते. नुसती कल्पनाचित्रें रंगविण्यांतच बरीच शक्ति व वेळ खर्च झाल्याने कृतीची तीव्रता तितक्या प्रमाणात कमी होते | लहान मुलापेक्षा मोठ्या माणसांत ह्या परिणामाची शक्यता अधिक असते अशा तन्द्रीत असताना मनुष्य वाटेल त्या कृति करण्याचा संभव असल्याने त्याबाबत फार सावध असावें लागतें.

रस्त्याने मोटार चालवीत असताना जर मनुष्य दिवास्वप्नात दग झाला तर एखादेवेळी भयंकर अपघात व्हायचा !

स्वप्नाप्रमाणेच दिवास्वप्नातूनहि मुलाच्या अतृप्त आशा व आकाक्षा प्रकट होत असल्याने त्या समजावून घेणे फार जरुरीचे असतें दिवास्वप्नातून प्रतीत होणाऱ्या मुलाच्या आवडीनिवडीचे व आकांक्षाचे निरीक्षण करून ज्या आकाक्षाना सत्यस्वरूप देणे इष्ट असेल त्यांना तसे स्वरूप देण्यातच मुलाचे व पालकाचे हित असते एखाद्या मुलाला साघिक खेळ मैदानावर जाऊन खेळण्याची फार हौस असते. मोठी माणसे त्याला खेळायला मुळीच परवानगी देत नाहीत, उलट वाचनासारखे गंभीर उद्योग त्याच्यावर लादतात भीतीने मूल पुस्तक पुढे घेऊन बसते. पण त्याच्या डोळ्यासमोर मैदान, खेळणारी मुले वगैरे दृश्ये नाचत असल्याने तो न वाचता त्या कल्पनाचित्रातच दग झालेला असतो

(ऊ) **स्मृति** (Memory):—पूर्वी घेतलेल्या अनुभवाची पुन्हा जाणीव होणे याचेच नाव स्मरण. स्मरणांत आपण पूर्वी अनुभविलेल्या वस्तूची प्रतिमा डोळ्यासमोर आणतो स्मृतीची घडण विचारात घेताना पहिली गोष्ट अशी लक्षात ठेवली पाहिजे की जो अनुभव आपण अवधान-पूर्वक घेतला असेल तेवढ्याचेच ठसे आपल्या मेंदूवर उमटतील पण ज्या-भोवतालच्या घटनाकडे आपण कधीच लक्ष दिलेले नाही, त्या घटना आपल्या स्मृतीचा भाग होऊ शकणार नाहीत

स्मरणाची घडण कशी होते याचे स्पष्टीकरण करताना खालील महत्त्वाच्या गोष्टीकडे लक्ष वेधणे जरूर आहे कोणत्याहि अनभवाचे अवधान-पूर्वक **ग्रहण** होणे हा पहिला भाग स्मरणाचे कार्य चागले होण्यास प्रथम स्पष्ट व तीव्र अशा प्रतिमा मनामध्ये उत्पन्न झाल्या पाहिजेत **ग्रहण** केलेली प्रत्येक गोष्ट आठवतेच असे नाही. आपल्या मनावर दररोज असख्य अनुभवाचे आघात होत असतात. पण त्यातील बरेचसे आपण विसरून जातो पुष्कळसे आघात आपल्या इन्द्रियावर स्पष्ट झालेले असूनहि ते ध्यानात ठेवण्याची जरूर नसल्याने आपण त्याच्या धारणेचा शीण डोक्याला देत नाही. जी गोष्ट आपणास आठवावीशी वाटते ती मनात साठवून

ठेवावी लागते. त्याकरता आपणास साहचर्याची व आवृत्तीची जरूर आहे. अशा रीतीने मिळविलेले ज्ञान मनात साठवून ठेवण्याच्या क्रियेस **धारणा** असे म्हणतात ज्ञान मनात साठवून ठेवलेलें असले तरीदेखील नेमक्यावेळी जरूर त्या सर्व गोष्टी आठवल्या पाहिजेत मनापुढे जरूर त्या प्रतिमा उभ्या करण्याच्या क्रियेला आपण **प्रत्यावर्तन** असे म्हणतो प्रत्यावर्तनानतर **प्रत्यभिज्ञान** म्हणजे आठवण होते स्मरणाच्या कार्यातील ग्रहण, धारणा, प्रत्यावर्तन व प्रत्यभिज्ञान ह्या चारहि विभागाचे कार्य जेव्हा होईल तेव्हाच स्मरणाचे कार्य व्यवस्थित होईल

**संस्कार ग्रहण करण्याची मेंदूची पात्रता** —झालेले सस्कार टिकविण्याची धारणाशक्ति, योग्य वेळी अपेक्षित सम्कार जागृत करण्याचे सामर्थ्य म्हणजे प्रत्यावर्तन व प्रत्यभिज्ञान या गुणावर आठवणीचा दृढपणा अवलबून आहे. ग्रहण, धारणा, प्रत्यावर्तन व प्रत्यभिज्ञान या मेंदूच्या शक्ति प्रत्येक माणसात सारख्याच प्रमाणात आढळतील असे नाही काही माणसे एकदाच पाहून अगर ऐकून एखादी गोष्ट ध्यानात ठेवू शकतात. तर काहींना दहावीस वेळा तीच गोष्ट पाहिल्याखेरीज अगर ऐकल्याखेरीज लक्षात रहात नाही त्याचप्रमाणे प्रत्येक माणसाची धारणाशक्तिसुद्धा सारखी नसते. काही माणसाच्या डोक्यात एकदाच घडलेला अनुभव जन्मभर राहतो तर काहींना काल पाहिलेली घटनाहि आज आठवत नाही धारणाशक्तीचा काही भाग उपजत असला तरी ती इतरहि काही गोष्टीवर अवलबून राहील आपल्या आयुष्यात त्या घटनेचे महत्त्व, घटना प्रत्यक्ष घडतेवेळी आपण दिलेले अवधान, विषयाची आवड वगैरे गोष्टीवर धारणा अवलबून राहील.

आठवणीबाबत निरनिराळ्या व्यक्तीत निरनिराळे भेद दिसून येतात एखाद्या माणसाला खूप सुभाषिते व अवतरणे पाठ येत असतात; पण योग्य वेळी हवे ते सुभाषित अगर अवतरण त्याम केव्हाच सुचत नाही. एखाद्या अव्यवस्थित अडगळीच्या खोलीप्रमाण त्याच्या मनाची अवस्था असते. तेथे अनुभवाचा साठा खूप पण त्याची माडणी व्यवस्थित नसल्याने वेळेवर योग्य तो अनुभव जागृत होऊ शकत नाही असा मनुष्य आपल्या सर्व कृतीतहि धादरटपणा दाखवितो. म्हणून लहानपणापासूनच मुलाला योग्य

विचारानतर कृति करण्याची सवय लावावी, म्हणजे त्याच्या इतर मनोव्यापारात आपोआपच सुव्यवस्थितपणा निर्माण होईल

एवढी एक गोष्ट मात्र नि.सशय खरी की ग्रहण, धारणा, प्रत्यावर्तन व प्रत्यभिज्ञान या शक्ति लहानपणी जितक्या तीव्र असतात तितक्या मोठेपणी असतात असे नाही वयोमानाने मेंदूला व इतर इंद्रियाना शिथिलता येते. प्राण्याकडून मनुष्यकोटीकडे आपण जसजसे जाऊ तसतसे मेंदूचे वजन व आकार वाढत जातो व याचमुळे मनुष्यप्राण्याचे मनोव्यापार इतर प्राण्यापेक्षा जास्त गुतागुतीचे असतात

स्मरणशक्ति ही एक उपजत स्वतत्र शक्ति आहे की शिक्षणाने तिच्यात काही फेरबदल होऊ शकतो हाहि एक वादाचा मुद्दा आहे येवढे खरे की आपणाला मुळीच फेरबदल करता येणार नाही, अशी ही एक उपजत शक्ति आहे ही स्मरणाबद्दलची कल्पना आज मानसशास्त्रज्ञाना तितकीशी मान्य नाही. पद्धशीर शिक्षण व पुनरावृत्ति याच्या साहाय्याने स्मरणशक्ति बऱ्याच प्रमाणात सुधारता येते पाठातराच्या पद्धतीत फरक केल्यासहि स्मरणाला बरीच मदत होते असे दिसून येईल.

आपणास कोणत्याहि गोष्टीचे विस्मरण का होते याचे उत्तर द्यावयाचे झाल्यास खालील मुद्दे डोळ्यासमोर येतात (१) नवीन गोष्ट शिकताना त्याकडे सपूर्ण अवधान न देणे. (२) गोष्ट पूर्ण ध्यानात येण्याआधीच कृतीला सुरवात करणे (३) आयुष्यातील प्रमुख घडामोडीशी त्या गोष्टीचा संबध नसणे विस्मरणाबद्दल एक अशी महत्त्वाची गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे की विस्मरण हे पुष्कळ वेळा फार हितकारक असते रोजच्या दिनक्रमातील सटरफटर गोष्टीसुद्धा जर धारणशक्तीला ताण देऊं लागल्या तर मेंदूला एवढ्या असख्य घटनाचा भार सहन होणार नाही. विशेषत. दुःखद प्रसग, अपयश, अपमान वगैरे घटनाचे विस्मरण होणे फार अगत्याचे असते. नाहीतर जीवन जगण्यास आपण असमर्थ होऊ

स्मरणशक्तीला मदत कोणकोणत्या तऱ्हेने करता येईल यासबधी खालील सूचना उपयुक्त होतील (१) फार घोकपट्टी करू नये व अर्थ कळल्याखेरीज तर कोणताच मजकूर कधीहि पाठ करू नये. (२) अवघड

गोष्टी ध्यानात ठेवण्यास आडाखे तयार करावेत. (३) कार्यकारण पद्धतीने घटनाचा अभ्यास केल्यास त्या अधिक चागल्या लक्षांत राहतात. (४) एके दिवशी बैठक मारून एखाद्या मजकुराचे शभरवेळा वाचन करण्यापेक्षा रोज वाचण्याचा परिपाठ ठेवल्यास स्मरणाला मदत होते. (५) आवड निर्माण झाल्यास स्मरण सुधारते

## स्मरणासंबंधी कांही प्रयोग

(१) स्मरण व विस्मरण यासबधी काही निश्चित मापनपद्धति बसविता येईल काय हे ठरविण्यासाठी एबिग्हॉस्ने बरेच प्रयोग करून पाहिले. अर्थहीन मजकूर पाठ करून तो ध्यानात ठेवण्यासंबंधी एबिग्हॉस्ने असा नियम बसविला की पाठ केलेल्या अर्थहीन मजकुरापकी अर्धा भाग पहिल्या अर्ध्या तासानतर विसरतो, दोनतृतीयाश भाग आठ तासानंतर व चार पचमाश भाग एक महिन्यानतर विसरतो. यावरून त्याने असे सिद्ध केले की पहिल्या काही क्षणात विसर सर्वात अधिक असतो. नतरच्या काही तासांत त्यापेक्षा कमी प्रमाणात असतो व काही दिवसानतर हे प्रमाण आणखी कमी होते.

मजकूर अर्थपूर्ण असेल तर तो अर्थहीन मजकुरापेक्षा लवकर पा होतो. व विसरण्याचे प्रमाणहि अर्थहीन मजकुरापेक्षा या बाबतीत कमी असते.

(३) मुलर् व शूमन् या दोघानी असे दाखविले आहे की गद्यस्वरांत अर्थहीन मजकूर पाठ करण्यापेक्षा सगीताची जोड दिल्यास तो अधिक लवकर पाठ होतो व जास्त काल लक्षात राहतो.

(३) गद्य किंवा पद्य उताऱ्याचे अर्थपूर्ण तुकडे पाडून जर तो उतारा पाठ केला तर जास्त चागला लक्षात राहतो. असा निर्णय स्मिथ्नेहि नमूद करून ठेवला आहे.

(४) वर्निक्ने असे दाखवून दिले आहे की ग्रहण, धारणा वगैरे कार्ये करणारे मेंदूत निरनिराळे भाग आहेत. स्मृतिभ्रंश होण्याचे कारण मेंदूच्या काही भागांना इजा होणे अगर विकृति होणे हेच असतें.

प्रकरण १७ वें

# ज्ञानग्रहणाच्या पायऱ्या [पुढे चालू]

**(ऋ) भाषा विकास**––अवबोध निर्माण झाल्यानतर तो कोणत्यातरी दिशेने व्यक्त करण्यासाठी माणूस धडपड करू लागतो. आवाज आला की कान टवकारणे वास घेण्यासाठी घ्राणेन्द्रियाची तीव्रता वाढविणे हे विशेष जनावरातसुद्धा दिसतात. मिळालेल्या अवबोधाची पुनरावृत्ति कल्पनेत निरनिराळ्या तऱ्हानी चालू असते या पुनरावृत्तीचा उद्देश तो अवबोध परत परत जागृत करणे हाच असतो. प्रथमावबोधाची प्रतिमा ज्या प्रमाणात जास्त स्पष्ट असेल त्या प्रमाणात त्या अवबोधाची पुनरावृत्ति करण्याची प्रवृत्तिहि अधिक तीव्र असते. मनात चाललेल्या अवबोधाच्या पुनरावृत्तीस क्रियात्मक ज्ञानतंतूची फार मदत होत असते. अवबोधाची पुनरावृत्ति करण्याच्या प्रवृत्तीतून मानवाच्या रानटी अवस्थेत निरनिराळ्या खुणाचा जन्म झाला असावा.

भाषेत क्रियात्मक ज्ञानततूचे महत्त्व किती आहे हे प्रथम बेन्ने मानसशास्त्रज्ञाच्या नजरेस आणले. अगदी लहान मुलाच्या बाबतहि ही गोष्ट स्पष्ट दिसते. मुलाला आपला अवबोध स्पष्ट करण्याची इच्छा असते त्या दृष्टीने त्याच्या शरीरातील क्रियात्मक ज्ञानततूची सारखी धडपड चालू असते व त्यातूनच त्याच्या भाषेचा उगम होतो.

अनुकरणात्मक हावभाव ( Imitative gestures ) ही भाषेच्या विकासातील पहिली पायरी होय. बहिरे व मुके लोक आपले विचार समजाऊन सांगण्यासाठी हावभावाचाच उपयोग करतात. हे हावभाव वस्तुनिदर्शक असतात. काहीवेळा मनातील विचार व भाव व्यक्त करण्यास भाषा अपुरी पडते. तेव्हाहि मनुष्य हावभावांचीच मदत घेतो. भाषा उपलब्ध नव्हती तेव्हा सूचक हावभावानीच रानटी लोक विचाराची देव-

घेव करीत. सूचक हावभावात दोन विशेष दिसून येतात (१) ते स्वयस्फूर्त असतात. व (२) ते लवकर स्थिर होतात परिस्थितीस योग्य असा संक्षिप्तपणाहि हावभावात लवकर येऊं शकतो

सूचक नैसर्गिक हावभावातूनच जरी भाषेचा उगम झालेला असला तरी प्रत्यक्ष हे स्थित्यतर कसे झाले असावे याचे स्पष्टीकरण करता येत नाही. प्रत्यक्ष लिपीची उत्पत्ति कृत्रिमच धरावी लागते भाषेचा उगम मनुष्यापेक्षा खालच्या दर्जाच्या प्राण्यातहि आढळतो, असे काहीचे म्हणणे आहे. कुत्रा व माजर याचे ओरडणे पहा. पण त्याना फक्त आविष्कारक चिन्हे (Expressive signs) एवढीच किमत द्यावी लागेल. एकच भावना निरनिराळे प्राणी निरनिराळ्या आवाजात व्यक्त करतील

प्रत्येक वस्तूला एखाद्या विशिष्ट नावाने सबोधणे या गोष्टीचा उगम मनुष्याला भासणाऱ्या जरुरीतच आढळतो. लहान मूल जगातील वस्तूचें पृथक्करण प्रथम करते ते भावनेच्या पायावरच वस्तूने केलेला आवाज व आवाज करणारी वस्तु यातील फरक मुलाला स्पष्ट कळत नाही. काहीचे म्हणणे असे आहे की रानटी अवस्थेत एक प्राणी दुसऱ्याला पाहून भीतीने ओरडला की त्या ओरडण्याच्या आवाजाचेच नाव तयार होई अशाच तऱ्हेने पुष्कळशी नावे तयार झाली असली पाहिजेत लहान मुलाच्या बोलण्याकडे पाहिल्यास असेच दिसते की मुलाला ज्या गरजा असतात त्या व्यक्त करण्यासाठी ते कोणत्यातरी आवाजाने धडपड करीत असते व हीच त्याच्या बोलण्याची सुरवात असते असे म्हणण्यास हरकत नाही

साधारण दीड वर्षाच्या वयाला मुलाच्या वाचाशक्तीत एकदम फरक दिसू लागतो. त्याला नावाचे एकदम विलक्षण आकर्षण वाटू लागते. समोर दिसणाऱ्या सजीव व निर्जीव सर्वच वस्तूना नावें असली पाहिजेत, असाच त्याचा समज असतो. त्यामुळे समोर दिसेल त्या गोष्टीस कोणत्यातरी नावाने संबोधण्यास ते सुरवात करते भोवतालच्या माणसांच्या अनुकरणानेच मुलाची भाषा तयार होते. मोठी माणसे उच्चारीत असलेला प्रत्येक शब्द मूल लक्षपूर्वक ऐकते व तो तसाच उच्चारण्याचा प्रयत्न करतें. एक हंगेरिअन् मूल वयाच्या पहिल्या वर्षातच अनुकरण केलेले

गाण्याचे काही सूर हुबेहूब म्हणून दाखवी. त्यावेळी त्याला इतर एकहि शब्द बोलता येत नसे. यावरून मुलात अनुकरण प्रवृत्ति किती दाडगी असते याची कल्पना येते. मनुष्य हा मुख्यत: सामाजिक प्राणी असल्याने समाजात मिसळण्यासाठी तो समाजात रूढ असलेली भाषा व इतर वागण्याच्या पद्धति आत्मसात् करतो.

विचाराचे आविष्करण करण्याचें सामर्थ्य भाषेइतके दुसऱ्या कोणत्याहि साधनात नाही. याच्या उलट पुष्कळवेळा भाषा मनातील भावाचा विपर्यासहि करूं शकते काही वेळा मनातील भावना अगर विचार इतके तीव्र किंवा गुतागुतीचे असतात की त्याचे यथायोग्य वर्णन करण्यास भाषा असमर्थ असते अशा वेळी भाषेचे दारिद्र्यच दिसून येते भाषेतील काही शब्दाना कालान्तराने दैवी अगर नैतिक महत्त्व इतके प्राप्त होते की त्याच्यामुळे ते शब्द माणसाच्या मनावर निष्कारण फाजील ताबा चालवू लागतात व एका तऱ्हेने ह्यामुळे बौद्धिक प्रगतीत अडथळाच येतो उलट काही शब्द इतके अर्थशून्य असतात की त्याच्या योगाने मनुष्य फक्त आपल्या मनाचे विचारदारिद्र्यच लपवू शकतो

ज्ञानग्रहणात अत्यत महत्त्वाचा घटक म्हणजे भाषा. दोन किंवा अधिक व्यक्तीत विचाराची किंवा भावनाची देवघेव हाच खरोखर व्यक्तीच्या सामाजिक जीवनाचा पाया होय ही देवघेव कशी होते, याचा अभ्यास करूं लागले तर आपणास तीन प्रमुख टप्पे दिसून येतात

(१) **चेहऱ्याचा आकार** * :—आपले मनोगत शब्दानी सागावयाचे नसेल तर ते व्यक्त करण्याचे मोठे परिणामकारी साधन म्हणजे आपला चेहरा हे आहे एखाद्यावर कोणत्याहि बाबतीत टीका करावयाची असल्यास दहावीस वाक्ये बोलण्यापेक्षा एका छद्मी मिस्किल हास्याने हे कार्य अधिक जहरीपणाने करता येते मनात निर्माण झालेल्या भावना शब्दरूपाने प्रकट करणे न करणे आपल्या ताब्यात असतें, पण त्या भावनाचे

---

* आकार हा सस्कृत शब्द असून त्याचा अर्थ चेहेऱ्यावर प्रतिबिंबित होणारे अनेकविध विकार असा आहे. Expression of the face as furnishing a clue to the disposition of the mind :

— Monier Williams.

चेहऱ्यावर उमटलेले प्रतिबिंब लपविणे प्राय: अशक्यच. लहान मुले सुद्धा आपल्या आईवडिलाच्या आज्ञा ऐकताना त्याच्या चेहऱ्याकडे सारखी निरखून पाहत असतात व चेहऱ्यावरील आकाराप्रमाणे मुलाच्या प्रतिक्रिया होत असतात चेहऱ्यावरील भावदर्शनावाचून नृत्य यशस्वी होत नाही; इतकेच काय नाटकादि ललितकृतीच्या प्रदर्शनात चेहऱ्यावरील भावव्यक्ति प्रधान समजली जाते. मनुष्याच्या बोलण्याचा अर्थ नीट कळावा, असे वाटत असल्यास आपण बोलणाराचा चेहरा नीट पाहात असतो. वक्ता समोर असला तरच त्याचे व्याख्यान आपल्यास नीट समजतें. मात्र मानवी समाजात काही वृत्ति (Profession) अशा आहेत की त्या वृत्तीच्या लोकानी आपले चेहेरे आकारहीन ठेवणे अत्यत आवश्यक आहे परदेशातील वकिलानीत काम करणाऱ्या राजकारणी व्यक्ति, न्यायालयातील न्यायाध्यक्ष, राजकारणपटु मुत्सद्दी यानी आपल्या शब्दावर जसे नियत्रण घालणे आवश्यक आहे, त्यापेक्षाहि आपल्या चेहऱ्यावर कोणतीहि भावव्यक्ति होऊं द्यावयाची नाही याचा अभ्यास साक्षेपाने करावयास पाहिजे

भावनेचे अस्तित्व जाणण्याचे प्रमुख साधन म्हणजे चेहरा असें वर्तनवाद्याचेहि मत आहे. जेव्हा भावनाक्षोभ जोरदार असतो, तेव्हा नसानसातून एक प्रकारची अतिरिक्त शक्ति निर्माण होते आणि ठराविक मार्गानी ती शक्ति प्रसृत होते. या प्रसरणाचे परिणाम म्हणजेच भावनाचा आविष्कार असे डार्विन्‌ने आपले मत इ. स. १८७२ मध्ये व्यक्त केले आहे.* चेहऱ्याचे स्नायु इतके लवचिक आहेत की भावनाचे उद्दीपन व त्या स्नायूचे आकुचन वा प्रसरण ही एकाच वेळी झाल्यासारखी वाटतात. भावनाव्यक्तीच्या तऱ्हा सर्वसाधारणपणे सारख्याच असल्यामुळे, भावनाव्यक्तीतून प्रकट होणाऱ्या अर्थाचे आडाखे कालातराने बाधले जातात.

---

* When the sensorium is strongly excited, nerve-force is generated in excess, and is transmitted in certain definite directions, depending on the connection of the nerve-cells and partly on habits..........Effects are thus produced which we recognize as expressive." —Darvin—The Expression of the Emotions in Man and Animals.

एखाद्या बाबतीत नापसती वा शंका दाखवावयाची असल्यास कपाळावरील आठ्या, नासिका व मुख याच्या हालचाली उपयुक्त ठरतात ए. एम्. फेलेकी या लेखकाने ' भावनाविष्कार ' या आपल्या लेखात चेहऱ्याच्या आकारावरून कोणकोणते भाव निश्चित करता येतात यासंबधी प्रयोग करून एक यादी तयार केली आहे तीत ' हास्य ', ' विस्मय ', ' शारीरिक वेदना ', असे क्रमाक दिले आहेत

## चेहऱ्यावरील आकारासंबंधी विविध सिद्धान्त

(१) जीवशास्त्रीय सिद्धान्त ( Biological Theory ) डार्विन्ने हें मत स्पष्ट शब्दात माडले आहे. उपयुक्त सबधित सवयी अखेरपर्यंत टिकतात आणि नसासस्थाहि आपले कार्य प्रत्यक्ष करीत राहतात, हे दोन मुद्दे या मतातील प्रमुख असे मानले जातात

मानववंशाच्या बाल्यावस्थेत मनुष्ये एकमेकाशी भाडत असत, त्यावेळी दाताचा उपयोग प्रामुख्याने होत असे. अजूनहि हा सोईस्कर उपयोग मानव मधूनमधून अवलबितो असे दिसून येईल तिरस्कार व गर्भहास्य या क्रियात अजूनहि माणूस आपला खालचा ओठ वरच्या दाताच्या खाली आवळून धरतो. स्वसरक्षणासाठी भयानक पदार्थापासून दूर दूर पळून जाण्याची क्रिया अद्यापहि सहजरीत्या मनुष्य करीत असतो पळताना श्वासोच्छ्वास जोरात होतो त्यामुळे नाकपुड्या फुगतात. भीति-पलायन-नासारंध्रप्रवृद्धि असा हा मूळचा क्रम, पण आता भीति निर्माण झाली तरी केव्हा केव्हा माणूस पळत नाही; पण पूर्वीच्या सवयीने नासारंध्रप्रवृद्धि भीतीच्या अवस्थेत थोड्याफार प्रमाणात अजूनहि होते.

नसासस्थेच्या प्रत्यक्ष कार्याची उदाहरणे म्हणजे थरकाप होणे, लाजणे, श्वासोच्छ्वास क्रियेंत बदल होणें, चेहऱ्यावर आकुचनादि विरूपता निर्माण होणें, ही होत. भावनेच्या तीव्रतेने शरीराच्या सर्वच अवयवाची जोरात हालचाल होऊं लागते * हास्याचा प्रकार घ्याना. हास्याचे स्थित्यतर विकट हास्यात झाले म्हणजे मनुष्य जमिनीवर लोळूच लागतो.

*It is still a case of Darwin's principle of excess nerves energy being released into the most available motor channels.

डार्विन्चे हें मत साप्रत शास्त्रज्ञाना तितकेसे मान्य नाही. अर्जित गुणाचे पुढील पिढीत सक्रमण होतें हे मत विकासवादात सिद्ध करणे कठिण असल्यामुळे डार्विन्चा सिद्धान्त चुकीचा ठरतो शिवाय आश्चर्य, तिटकारा, राग, प्रसन्नता इत्यादि विकाराच्या आविष्कारात निरनिराळ्या समाजातील व्यक्तीच्या चेहऱ्याचे आकार निरनिराळे असतात डार्विन्चे मत प्रमाण मानल्यास हा निराळेपणा दिसता कामा नये म्हणून हे मत बाजूला ठेवून या बाबतीत पुढील सिद्धान्त माडण्यात आला आहे

(२) चेहऱ्यावरील आकारासबधी **सांस्कृतिक सिद्धान्त** ( The Cultural Theory )—या मताच्या शास्त्रज्ञाना जीवशास्त्रविषयक मत मुळीच मान्य नाही. त्याचे म्हणणे असे की ज्याप्रमाणे निरनिराळ्या समाजात निरनिराळ्या भाषा बोलल्या जातात त्याप्रमाणे भावनाविष्काराच्या तऱ्हाहि निरनिराळ्या समाजात निरनिराळ्या आहेत. या तऱ्हा सहज नसून त्या त्या समाजातील व्यक्ति त्या त्या तऱ्हा लहानपणापासून अनुकरणाने शिकतात भाषेतील एखाद्या शब्दात एखादा विशिष्ट अर्थ आकस्मिकरीत्या भरला जातो व त्याच अर्थाने तो शब्द पुढे पिढ्यान् पिढ्या वापरला जातो मराठीतील 'होय' हा शब्द घ्या होकारार्थी आपण वापरत असलेल्या या शब्दाच्या ऐवजी आरभीच दुसरा एखादा शब्द मराठी समाजाने वापरला असता तर ' होय ' ऐवजी तो शब्द रूढ झाला असता. चेहऱ्याच्या आकाराचे तसेच आहे. समाजातील विशिष्ट चालीरीतीप्रमाणे, संस्कृतीप्रमाणे या आकारप्रदर्शनाच्या तऱ्हा निश्चित झाल्या व पिढ्यान्पिढ्या त्या चालू आहेत.

या सिद्धान्ततहि थोडीशी अव्याप्ति आहे चेहऱ्याच्या आकारदर्शनाने नेहमीच व्यक्तीच्या मनातील भाव ओळखता येईलच असे नाही तसेच भावदर्शनाची साऱ्या व्यक्तीची पद्धत एकच असते असेहि म्हणणे तितकेसे तर्कशुद्ध नाही. आता आपण आणखी एका सिद्धान्ताचा विचार करू.

(३) **मानसशास्त्रीय मत** (Psychological Theory) :—चेहऱ्यावरील आकारात शरीराचा जेवढा भाग आहे तेवढा मनाचाहि आहे. पुढे पुढे हाच आकार समाजाकडून मिळणाऱ्या शिक्षणाने बदलत गेला म्हणून

हे आकार एकाच ठराविक तऱ्हेचे न होता त्यात विविधता निर्माण झाली व आकारविविधतेबरोबरच अर्थभिन्नताहि आली. ही मानसशास्त्रीय मत-प्रणाली पुष्कळ पुराव्यानी सिद्ध झाली आहे.

## चेहऱ्याच्या आकारांचा व्यक्तिव्यक्तींवर होणारा परिणाम

दोन किंवा अधिक व्यक्ति जेव्हा एकमेकींशी बोलत असतात तेव्हा त्या सभाषणातील पुष्कळसा भाग चेहऱ्याच्या आकाराने व्यक्त केला जातो. या आकाराप्रमाणे सभाषणाचा ओघ बदलतो; इतकेच नव्हे तर सभाषणांतील उत्तर-प्रत्युत्तरानाहि कलाटणी मिळते सभेत वक्ता आपल्या व्याख्यानाचे परिणाम श्रोत्याच्या चेहऱ्यावरून ओळखतो. गाण्याच्या मैफलीत रसिकाच्या रसास्वादाची ओळख गवयाला श्रोत्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसते व गाण्यात रग भरतो.

**चेहऱ्याची ठेवण** —भावदर्शनात चेहऱ्याच्या हावभावाना म्हणजेच आकाराना किती महत्त्व असते हे आपण पाहिले. या बाबतीत व्यक्तीच्या चेहऱ्याची ठेवण हा घटकहि महत्त्वाचा आहे चेहऱ्याची प्रसन्नता, तरतरीतपणा पुष्कळ कामे यशस्वी करण्यास साहाय्यभूत होतात. चेहऱ्याच्या प्रत्येक भागावरून स्वभाव ओळखता येतो याचे एक शास्त्रच तयार झाले आहे. गुन्हेगारीचा अभ्यास करणारा प्रसिद्ध विद्वान् लोम्ब्रोसो याने तर चेहऱ्यावरून असत्प्रवृत्ति ओळखण्याचे नियमच तयार केले आहेत. एखादी व्यक्ति कितीहि बुद्धिमान् व सद्‌गुणी असो, पण त्या व्यक्तीचा चेहरा कुरूप असला तर त्या व्यक्तीत न्यूनगड उत्पन्न होतो याची उदाहरणे समाजात निश्चित सापडतात. वरील मताचे समर्थन प्रत्यक्ष प्रयोगाने मात्र अद्याप झालेले नाही. प्रयोग पुष्कळ झाले पण त्यातील निष्कर्ष वरील मताशी सर्वस्वी जुळणारे आहेत असे दिसून येत नाही. काही प्रसिद्ध शास्त्रज्ञानी या बाबतीत असे मत दिले आहे की शरीराच्या विविध अवयवाच्या मापाच्या साहाय्याने व्यक्तीचा स्वभाव ठरविणारे लोक त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल अचूक काही सांगू शकत नाहीत; परतु व्यक्तीच्या सहवासात असणारे संबधित लोक त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाविषयी काही भाग निश्चित सांगू

जुन्या काळी अशीहि समजूत होती की चेहऱ्यावरून माणसाची बुद्धिमत्ता समजते; परतु प्रत्यक्ष प्रयोगानी ही समजूत चुकीची ठरली आहे. एवढें मात्र खरे की व्यक्तिव्यक्तीचा बोलण्याचालण्याचा, देण्याघेण्याचा संबध आला म्हणजे व्यक्तीच्या शरीराची चण विशेषत: तिचा चेहरा हे एक महत्त्वाचे व परिणामकारी अग ठरते.

(२) **हावभाव** :—प्रत्यक्ष भाषेचा वापर होण्यापूर्वी चेहऱ्याचा आकार हा जसा मनोदयाचे प्रदर्शन करण्याला साधनीभूत समजला जातो, त्याप्रमाणे हावभावानी आपले मनोगत प्रकट करण्यासाठी लहान मुले सारखा प्रयत्न करीत असतात हावभाव या शब्दात सर्व प्रकारचा अभिनय, अगविक्षेप, हस्तादिचालन याचा समावेश होतो. नकार किवा अनिच्छा प्रदर्शित करताना मान किवा शरीर मागे वळविणे, होकाराचे वेळी इच्छित वस्तूकडे हात पसरणे या गोष्टी लहान मुलाच्या जीवनात नित्याच्या आपण पाहतों. मोठेपणीहि हे हावभाव आपण उपयोजितों हावभावाची क्रिया ही सहज नसते, ती इतर व्यक्तीच्या अनुकरणाने आपण शिकतो या हावभावाचे सामान्यत तीन प्रकार करण्यात येतात. (१) भावनादर्शक (Emotional)—सुखात्मक किवा दु खात्मक भावनाचा प्रक्षोभ झाला म्हणजे नैसर्गिकरीत्या ज्या शारीरिक हालचाली होतात त्या या सदरात येतात. (२) निर्देशक (Demonstrative) :—एखादी वस्तु वा व्यक्ति किंवा एखाद्या कृतीचा उगम वा अवसान दाखविताना या हालचालीचा उपयोग करितात. अन्योन्य सभाषणात याची आवश्यकता असते. (३) चित्रणात्मक (Graphic) —वस्तु किवा घटना याचे शारीरिक अवयवाच्या साहाय्याने चित्रण करण्याचा प्रयत्न करताना या खुणा वापरल्या जातात सथ चाल दाखवावयाची असल्यास हाताची बोटे त्या दिशेकडे तोड करून हळहळू हालवावयाची, पळणे दाखवावयाचे म्हणजे बोटे जोराने हालवावयाची याप्रकारात काही शास्त्रज्ञ पुढील प्रकाराचीहि भर घालतात. (४) प्रतीकात्मक (Symbolic) .—बहिऱ्यामुक्याच्या भावाविष्कारांत पुष्कळदा या प्रकाराच्या हावभावाचा उपयोग केलेला दिसतो, हाताची मूठ उभी धरून इकडून तिकडे हालविणें याचा अर्थ एखाद्या गोष्टीबद्दल सदिग्धता व्यक्त करणें असा होतो; धार्मिक संस्कारातहि हाताच्या

साहाय्याने अनेक प्रतीकात्मक हावभाव प्रदर्शित केले जातात (५) वृत्तिगत (Habitual)–वृत्ति म्हणजे एखाद्या व्यक्तीची वागण्याची विशिष्ट पद्धत (Mannerism)–या प्रकारात येणारे विशिष्ट व्यक्तिगत हावभाव मनोगत प्रदर्शनासाठी किंवा भावना व्यक्तीसाठी होत नाहीत एखाद्या व्यक्तीच्या जीवनात ते हावभाव इतके पक्के झालेले असतात की त्याविना ती व्यक्ति आचार-उच्चार करूच शकत नाही काही व्यक्तीना मानच पेंगळण्याची सवय असते, तर काही व्यक्ति आपले हातच छातीवर माडतात, कुठे केसातच सारखे हात फिरवा, हानावरच हात घासा, खादेच उडवत राहा, बसले म्हणजे माड्याच सारख्या हालवा, एक का दोन अनेक व्यक्तीचे असे अनेक प्रकार आपण पाहतो असा हालचाली झाल्या नाहीत तर त्या व्यक्तीचे बोलणे चालणे विचार करणेच थाबते (६) आन्तरविरोधदर्शक (Autistic) ––हे हावभावहि व्यक्तिगत असतात. व्यक्तीच्या अन्त.करणात भावनाचा समरप्रसग उद्भवला असता, मनोविश्लेषणशास्त्राप्रमाणे त्या समरप्रसगाला कुठे ना कुठे वाट फुटते विशिष्ट हावभाव हाहि या प्रसगीचा एक मार्ग आहे. समजा, एखादा माणूस जेवायला बसला आहे, पण त्याच्या मनात भावनाकलह जोराचा असल्यास मध्येच पक्तीतून उठून तो बाहेर निघून जातो सभेच्या वेळी एखाद्या मनुष्याला दुसऱ्याचे मत पटत नाही व आपले म्हणणे खरे असूनहि दुसरे ऐकत नाही असे त्याला वाटते या समरप्रसगात तो समोरील टेबलावर हात ठोकत बसतो किंवा पायानी टेबल पुढे सरकावू लागतो, किंवा दोन्ही हात जुळवून गुडघ्यावर वा माडीत सारून एकमेकावर घासतो व मान्या हालवत राहतो हे व अशा प्रकारचे सर्व हावभाव या सदरात येतात

३. **ध्वनि आणि भावशक्ति**.––मनातील आशय व्यक्त करण्याची या पुढील पायरी म्हणजे ध्वनि, आवाज. यातील पहिला प्रकार म्हणजे भावप्रदर्शन केवळ उद्गार, लिहून दाखविता येत नाहीत असे आवाज. मुलाचें आरटन, हास्याचे विविध प्रकार, किचाळणे, आनदप्रदर्शक आवाज, अहाहा ओहो, अय्या, इत्यादि आश्चर्यवाचक उद्गार ही या प्रकाराची उदाहरणें होत. हे ध्वनि म्हणजे प्राण्याच्या विशिष्ट अवस्थेतील साकल्याने होणाऱ्या प्रतिक्रियेचे भाग असतात. पशूच्या कळपात, मानवी समाजात पुढे पुढे

या आवाजाना अर्थपूर्ण महत्त्व प्राप्त होते. रडण्याच्या प्रकारावरून लहान मुलाला भूक लागली असे आपण ओळखतो. अशा आवाजातूनच सामान्यत: भाषा निर्माण होत जाते. सामाजिक व्यवहारात भाषा हा एक प्रमुख घटक आहे. इतर प्राणी व मानव यामधील व्यवच्छेदक लक्षण म्हणजे मानवी भाषा होय भाषेचे प्रमुख घटक म्हणून तीन मुद्दे लक्षात घ्यावे लागतात (१) मनुष्याचे आवाज निर्माण करण्याचे इन्द्रिय असख्य प्रकारचे ध्वनि करू शकते या ध्वनीपैकी पुष्कळ ध्वनीना विशिष्ट अर्थ प्राप्त होतात व त्यानुसार माणूस समाजात विविध क्रिया करू शकतो (२) हे ध्वनि निर्माण करण्यास फारच थोडे श्रम पडतात व सर्व अवस्थात याचा उपयोग होतो हावभावादि प्रकाराचा अधारात काय उपयोग होणार ? शिवाय हावभावात शारीरिक श्रम आवश्यक असतात (३) भाषा हे भावव्यक्तीचे अत्यत सुलभ साधन आहे एकाच शब्दाचे अनेक तऱ्हानी उच्चार करता येणे शक्य असल्यामुळे आपल्या भावनाच्या विविध छटा व्यक्त करणे सोपे होते

**भाषेची व्युत्पत्ति**---हावभावाची जागा विकासवादाप्रमाणे हळहळू भाषेने घेतली हे मत बहुताशी मान्य आहे, पण भाषा कशी निर्माण झाली यासबधी शास्त्रज्ञात एकमत नाही. मॅक्समुल्लरने आपल्या ओघवती भाषेत पुढील चार मते दिली आहेत (१) शब्दानुकरणसिद्धान्त (Bow wow Theory) कू कू असा आवाज काढणारा तो कोकिळ किंवा इग्रजीत Cuckoo. कॉव कॉव् करणारा तो कावळा व्यवहारानहि आपण पहातो की लहान मुले आवाजावरून प्राण्याची नावे ठरवितात हे मत तितकेसे व्यापक स्वरूपाचे नाही फार थोडे शब्द या तऱ्हेने विवेचिता येतील (२) उद्गारवाचक सिद्धान्त (Pooh-pooh Theory) निरनिराळी चेतके निरनिराळ्या भावना उद्दीपित करतात आणि त्या त्या भावनाचा प्रक्षोभ त्या त्या आवाजानी व्यक्त केला जातो. अबब, अरेरे, अय्या, छी! हे शब्द या प्रकाराची उदाहरणे होत (३) सामाजिक वर्तन सिद्धान्त ---ऑल्पोर्ट या शास्त्रज्ञाने या मताचा जोराने पुरस्कार केला आहे आपल्या आजूबाजूच्या व्यक्तीवर नियत्रण ठेवावे, त्याच्याकडून आपणास हव्या असतील त्या कृति करवून घ्याव्या यासाठी प्रथम प्रथम माणसाने आपल्या ध्वनीचा उपयोग

केला असावा. अशा ध्वनींना सरावाने पुढे अर्थ चिकटू लागले व त्यांतून भाषेचे मूल घटक जे शब्द ते निर्माण झाले असा या मताचा प्रमुख सिद्धान्त आहे स्वत:च्या गरजा पुरविण्यासाठी माणसाने परिस्थितीनुरूप ज्या ज्या प्रतिक्रिया केल्या, त्यात ध्वनि ही एक प्रमुख प्रतिक्रिया होती. शीघ्रग्राही श्रवणेंद्रिय, गुंतागुतीची नसासस्था व ध्वनियंत्र याच्या सुंदर सहकार्याने मनुष्य बोलका झाला अशा निष्कर्षाला सूक्ष्म अभ्यासाअती शास्त्रज्ञ येऊन पोचले आहेत.

वरील विवेचन वाचताना सामान्य माणसाला असें वाटण्याचा संभव आहे की या शास्त्रज्ञानी सोप्या गोष्टीला उगाचच गूढ स्वरूप आणले आहे. काही अशानी हे खरेहि आहे आजूबाजूच्या परिस्थितीनुरूप माणसानी अनेक प्रकारच्या क्रिया प्रतिक्रिया केल्या असतील काही काही क्रियाप्रतिक्रियात आवाजाचाहि उपयोग केला गेला असेल व अशा रीतीने भाषेतील पहिले शब्द तयार झाले असतील भाषेची प्रक्रिया इतकी साधी व सोपी आहे असें काहींचे मत आहे

आपल्या घरातील व्यक्तीच्या—विशेषत: आईच्या—शब्दाचे अनुकरण करून मूल शब्द शिकते दटावताना, भीति दाखविताना आई ज्या ध्वनींचा उपयोग करते तेच ध्वनि दुसऱ्या मुलाना अगर आपल्या बाहुल्याना दटावताना अगर भीति दाखविताना मूल वापरते, हे आपण पाहतो मूल जसे कधी सहसा स्वस्थ बसत नाही, त्याप्रमाणे ते सहसा गप्पहि बसत नाही. काही ना काही बडबड चालू असते. या बडबडीतूनच श्रवण व ध्वनि या संबधीचे प्रतिक्षेप तयार होतात व हळूहळू मुलाची शब्दसंख्या वाढत जाते. शारीरिक व मानसिक वाढ हाहि घटक भाषाविकासाला साहाय्य करणारा असतो.

पशूच्या अवस्थेतून बाहेर पडणारा माणूस क्रमाक्रमाने समाज करून राहूं लागला सामाजिक देवाणघेवाण सुरू झाली भाषेने ही देवाणघेवाण सुलभ होऊं झाली व त्यामुळे भाषा पुष्ट होऊ लागली. सर्व मानवी समाज काही सलोख्याने वागत नसत. समाजासमाजात वैमनस्ये माजली. आपली भाषा शत्रुसमाजाला कळू नये ही सावधगिरी घेण्यात येऊं लागली. त्या योगें समाजासमाजाची भाषा बदलत गेली. भाषाची विविधता निर्माण झाली.

प्राथमिक भाषाच्या अभ्यासात असे दिसून येते की त्या भाषात रूपकात्मक, अलकारिक शब्दरचना मुळीच नाही. वस्तु किवा घटना याचा निर्देश करणारे शब्द व वस्तु वा घटना ज्या परिस्थितीत असतील त्या परिस्थितीची साकल्याने कल्पना देणारे शब्द असे दोनच प्रकार या आदि-भाषात प्रामुख्याने दिसतात

बोलतांना वरील प्रकारचे सुटे शब्द एकत्र ठेवले म्हणजे ऐकणाराला अर्थबोध होत असे यातूनच पुढे वाक्ये तयार झाली अनेक व्यक्ति मोठ्या कौशल्याने शब्दाचा वारवार उपयोग करू लागल्या आणि मग साचे अगर नियम तयार होऊ लागले हाच व्याकरणशास्त्राचा उगम.

आज निरनिराळ्या भाषाच्या ध्वनिपट्टिका (Records) घेता येतात प्राचीन काळच्या भाषाचे असे पुरावे उपलब्ध नसल्यामुळे वर दिलेले विवेचन सर्वतः अनुमानावर अवलबून आहे हे विसरून चालावयाचे नाही.

**बालांच्या भाषेचा विकास** :—या विकासात सात टप्पे दिसून येतात. (१) श्रवण-ध्वनीच्या प्रतिक्षेपाच्या साहाय्याने मधून मधून आवाज करणे, (२) या आवाजापैकी काही आवाजाना घरातील मडळी साथ देऊ लागली म्हणजे काही आवाज निश्चित होणे (३) घरातील मडळीच्या साहाय्याने या निश्चित झालेल्या आवाजाचा अर्थ समजू लागणे, (४) चुकीचे होणारे उच्चार सुधारत जाऊन योग्य उच्चार होऊ लागणे, (५) घरातील माणसाच्या उच्चारानुरूप उच्चार तयार होणे. (६) प्रत्येक वस्तूला किवा क्रियेला काहीना काही शब्द आहे याची हळूहळू जाणीव होणे. (७) लहान लहान वाक्ये बोलतां येणे.

'अ', 'ए', 'ऊ' वगैरे उच्चार अगदी लहान मूल सहज करू शकते. कारण या स्वराच्या उच्चारात मुखातील स्नायूची हालचाल विशेष गुतागुतीची नसते. 'म' हे व्यजनहि मुले सहज उच्चारूं शकतात (अ, उ, म = ॐ प्रणवाचा उच्चार यामुळेच आर्यधर्मात महत्त्वाचा ठरला असावा).

याशिवाय बरेच अर्थशून्य आवाज मूल करीत असते. मूल वयाने पाच महिन्याचे झाले म्हणजे पुढे ते एक वर्षाचे होईपर्यंतच्या अवधीत मुलाच्या भाषेला एकप्रकारे आकार येत जातो. या कालात स्वत.शीच तीच तीच अक्षरे किंवा तेच ते शब्द असख्य वेळा उच्चारीत असलेली मुले आपण पाहतों. हाच प्रकार वयाला दोन वर्षे होईपर्यंत काही मुलाच्या बाबतीत चालू राहतो मात्र या कालखडात मुलाच्या बोलीत खूप वैचित्र्यहि आलेले असते, व त्याबरोबर श्रवण-ध्वनि सापेक्ष-प्रतिक्षेप बनत राहतात. याच प्रतिक्षेपाच्या साहाय्याने मूल नतर स्वभाषा सहज शिकू शकते बीन् नावाच्या शास्त्रज्ञाने असा निर्णय केला आहे की पहिल्या दोन वर्षांच्या बडबडीत सर्व स्वर, व्यजने, अनुनासिके, पुष्कळशी जोडाक्षरे मुलाला अवगत होतात. घरातील मडळी जे जे शब्द उच्चारतात ते सर्व मूल उच्चारू शकते व साहचर्य नियमाने शब्दाचे अर्थहि मुलाला कळू शकतात स्वराघात कुठे करावा याचेहि मुलाला ज्ञान झालेले असते

अर्थप्रतीतीची क्रिया मात्र जरा निराळ्या तऱ्हेने होत असते घरातील माणसानी उच्चारलेले शब्द ऐकून ऐकून मूल अनुकरणाने ते शब्द उच्चारते; पण त्या सर्व शब्दाचे अर्थ त्याला समजलेले असतात असे नाही कुणीतरी वस्तुवाचक शब्द उच्चारावयाचा व ती वस्तु मुलाला दाखवावयाची अशी पुनरावृत्ति करता करता ती वस्तु व तद्वाचक शब्द याचे साहचर्य पक्के होते व मुलाच्या मनात वस्तु व शब्द याचा अवबोध तयार होतो ती वस्तु पाहिली की मूल तो शब्द उच्चारते व कुणीतरी तो शब्द उच्चारला म्हणजे मूल त्या वस्तूकडे पाहते अशा शब्दाची भर पडत पडत क्षणश व कणश मुलाची शब्दसपत्ति वाढीस लागते ही पद्धति म्हणजे खरोखर यत्नस्खलितपद्धतिच होय या पद्धतीत सर्वात अधिक उपयोग कुणाचा होत असेल तर तो आईचा

अशा रीतीने मुलाची खात्री होते की जी जी वस्तु दिसते तिला तिला काही नाव असते मग कुतूहलप्रेरित मुलांच्या प्रश्नाची सरबत्ती सुरू होते. हे काय ? आणि ते काय ? या प्रश्नाची उत्तरे वडील माणसानी न कंटाळता द्यावयाची असतात अशा उत्तरानी मुलाना आनद होतो व त्याच्या भाषेचाही विकास होत जातो.

यापुढील पायरी म्हणजे वाक्ये तयार करण्याची वाक्यें तयार करण्यापूर्वीच मुलाचा शब्दसंग्रह फार मोठा झालेला असतो मोठी माणसे या शब्दांचा उपयोग वाक्यात करताना मूल ऐकत असते व त्या वाक्यातील दोन दोन तीन तीन शब्द एकत्र उच्चारण्याचा त्याचा प्रयत्न चालू होतो. एतद्विषयक झालेल्या प्रयोगात पुढील गोष्टी दिसून आल्या आहेत.

अठरा महिन्याची मुले साधी साधी लहान लहान वाक्यें बोलतात. दोन वर्षाची मुले साध्या वाक्यात एखादा वाक्प्रचार (Phrase) घालून बोलू शकतात साडेतीन वर्षांनतर मुले साधी परतु जरा लाबलाब वाक्यें बोलण्यात उपयोगितात

मुलाच्या वाक्यात्मक बोलण्याचे हेतु मात्र स्वत:विषयी काही तरी सागावयाचे, आपल्याला काय हवे, काय नको हे स्पष्ट करावयाचे एवढाच असतो 'स्व' च्या पलीकडे त्याची भाषा सहसा जात नाही ते कार्य पुढे शालेय जीवनात व्हावयाचे असते.



प्रकरण १८ वें

# ऐच्छिक वर्तन व निश्चयशक्ति



कृतीची प्रेरणा मनात उत्पन्न झाल्याबरोबर त्यानुसार हातून वर्तन होणे याला भावनायत्त वर्तन (Impulsive behaviour) असे म्हणनात. प्रतिक्षेप क्रिया (Reflex action), सहजप्रवृत्त क्रिया (Instinctive action), कल्पनाजन्य क्रिया (Ideo-motor action). या सर्वांचा समावेश भावनायत्त वर्तनात होतो याच्या उलट जेव्हा कृतीची प्रेरणा देणारा नैसर्गिक भाव अगर विकार आपण दाबून टाकतो तेव्हा क्रियेचा निरोध करणे ही ऐच्छिक क्रिया होईल

ऐच्छिक अगर निश्चयात्मक कृतीत जो विकार दावला जातो तो काही वेळ मानसिक ठेवणीमुळे निर्माण झालेला असतो व काही वेळा एखाद्या नैसर्गिक परिस्थितीतून निर्माण झालेला असतो एखादा मनुष्य जर जात्याच लोभी वृत्तीचा असेल तर तो नेहमीच दुसऱ्याचे पैसे लबाडण्याचा प्रयत्न करील; पण एखादा मनुष्य जात्या लोभी नसूनहि जर एखादी हजाराची नोट त्याने पाहिली तर ती आपण घ्यावी अशी त्यास इच्छा होईल ही इच्छा बाह्य परिस्थितीतून निर्माण झालेली आहे असे म्हणता येईल.

भावनायत्त कृति ही नेहमीच वाईट असते असे नाही रस्त्यात दंगा चालला असता एखाद्या भावनाप्रधान माणसाला अन्याय्य बाजूची चीड असल्याने त्यात तो सामील होतो. न्याय्य बाजूने मारामारीचा निकाल लागला तर आपण त्या इसमाची पाठ थोपटू पण जर त्या गृहस्थाचे निष्कारण डोके फुटून निष्पन्न काहीच झाले नाही तर मात्र भावनावश होऊन मारामारीत भाग घेतल्याबद्दल त्याला आपण दोष देऊ सर्वसामान्यतः आपणास असे म्हणता येईल की

भावनावेगाने कृति करण्यापेक्षा निरनिराळया विकाराचे मूल्यमापन करून निश्चयशक्तीच्या साहाय्याने योग्य कृति करण्याचा प्रयत्न करणें हेच परिणामी इष्ट ठरते

**निश्चयशक्तीचें बळ** ( Will Power )—निश्चयशक्ति काही माणसात जात्याच कमी असते, व काही माणसात अधिक असते, असे मानणारे काही लोक आहेत. काहीजण असेहि म्हणतात की, ही शक्ति नेहमी वापरत गेल्याने वाढत जाते व न वापरल्याने कमी कमी होत जाते या दोन्ही मतात थोडाफार सत्याश आहे. निश्चयशक्ति मोजण्याचा निकष अजून मानसशास्त्रज्ञाना सापडलेला नाही पुष्कळ वेळा असे दिसते की निश्चयशक्ति अगात असूनहि ती वाईट विकाराचे समाधान करण्यातच खर्च केली जाते उदाहरणार्थ, खल पुरुषाच्या कृति विरुद्ध परिस्थितीतून जाताना सकटाचे डोंगर कोसळले तरी आपले तत्त्व व सत्त्व न मोडणारे पराकोटीचे निश्चयी लोकहि आढळतात सर्वसामान्यत. असे म्हणता येईल की, मनात आणले तर निश्चयशक्तीचा वाटेल तितका उपयोग करून घेता येतो व मनाने जोर धरला नाही तर सहजप्रवृत्तीच्या प्रवाहात जीवनाचे तारू हवे तसे वाहवत जाण्याचाच सभव अधिक

**ऐच्छिक वर्तनाची मीमांसा :**—मनुष्य हा निसर्गत स्वार्थी आहे व ज्या कृतीमुळे स्वत चे शारीरिक व मानसिक सुख साधेल तेवढ्याच कृति तो करतो या सुखवादाच्या (Hedonism) सिद्धान्ताच्या आधाराने निश्चयात्मक कृतीचे स्पष्टीकरण करताच येत नाही कारण कित्येक वेळा मनुष्य सुखाचे पुढे आलेले ताट दूर सारून मुद्दाम दु:खदायक मार्ग पत्करतो, हे कसे स्पष्ट करणार? निश्चयात्मक कृति करताना जरी माणसाला तात्कालिक दु ख झाले तरी शेवटी जे एकप्रकारचे अलौकिक समाधान त्यास लाभते त्यामुळेच तो ते दु ख पत्करण्यास तयार होत असला पाहिजे.

वुइल्यम् जेम्स्ने निश्चयशक्तीचे स्पष्टीकरण खालीलप्रमाणे केले आहे. तो म्हणतो की, एखादा नैसर्गिक विकार एखाद्या सत्प्रवृत्तीहून अधिक बलवान् असतो; पण जेव्हा आपण त्या सत्प्रवृत्तीत प्रयत्नाची भर घालतों

तेव्हा त्या दोहोंचें मिळून तयार होणारें बल हे त्या नैर्सगिक विकाराहून अधिक असते *

पण निश्चयात्मक कृति करताना नैसर्गिक विकाराकडून जो विलक्षण विरोध होतो. त्या विरोधातून निश्चयशक्ति कसा मार्ग काढते याचे स्पष्टीकरण जेम्स्‌ने केले नाही

मॅग्डूगल्‌ने आपल्या समाजमानसशास्त्र (Social Psychology) या पुस्तकात निश्चयशक्तीच्या अस्तित्वाची कल्पना मान्य केलेली दिसते. फक्त त्याच्या मते ही शक्ति आत्मविषयक स्थिरवृत्तीतूनच निर्माण होते. थोडा फरक करून असे म्हणता येईल की, प्रत्येक नैसर्गिक प्रवृत्तीतूनच प्रतिकारशक्तिहि निर्माण होत असते फक्त आत्मभाव हा निश्चयशक्तीचे आणखी एक उगमस्थान आहे

हेहि खरे की, मनुष्याच्या आयुष्यातील सर्वच गोष्टी निश्चयशक्तीच्या साहाय्याने होतात असे नाही सवयीने दृढ झालेल्या प्रवृत्तीपुढे निश्चयशक्तीला पुष्कळ वेळा हार खावी लागते आपला नित्य व्यवहारातील अनुभव असेच सागतो की, पन्नासच्या पुढे वय गेल्यानतर व्यसने सुटणे अतिशय कठीण किबहुना जवळ जवळ अशक्यच असने पुष्कळवेळा निश्चयशक्तीचा उपयोग एखादी प्रवृत्ति समूळ दाबण्याकडे न होता नैसर्गिक भावनात्मक कृतीला उचित इतका आळा घालण्याकडेच होतो आचाराना व विचाराना वळण लागण्यासाठी पूर्व वयातच निश्चयशक्तीचा भरपूर उपयोग केला तर पुढच्या आयुष्यात ही शक्ति क्षीण झाली तरी फारसें अडत नाही.

दोन विचाराचा झगडा मनात चालू असताना आपण प्रयत्नाने एक विचार दाबून दुसऱ्या विचारानुसार कृति करण्याच्या निश्चयाप्रत कसे येतो, याच्या निरनिराळचा तऱ्हा खालीलप्रमाणे सागता येतील.

(१) विमर्शकप्रकार (The reasonable type) —दोनपैकी कृतीचा युक्त मार्ग कोणता यासबधी मनाची खात्री पटून त्याच मार्गाने

---

*P>I P = Natural Propensity.

but I + E>PI = Ideal Impulse. E = Effort.

जाणे इष्ट आहे हे मनाला पटते व त्यामुळे समाधानकारक रीतीने मन निर्णय घेऊं शकते. ज्या व्यक्तीच्या व्यवहाराची सर्वसामान्य तत्त्वे निश्चित ठरून गेली आहेत त्या व्यक्तींना निर्णय करणे फारसे जड जात नाही.

(२) यादृच्छिकप्रकार:—काही वेळा असे होते की, दोन्ही विचाराच्या चागल्यावाईट परिणामाबद्दल आपली काहीच खात्री नसते; पण निष्क्रियतेचा कटाळा येतो व काहीतरी करावयास हवे म्हणून आपण एका विचारावर स्थिर होऊन त्यानुसार कृति करतो.

(३) उदासीनप्रकार —काही वेळा परिणामाबद्दल आपण इतके उदासीन असतो की कोणत्याहि विचारानुसार कृति झाली तरी सारखीच अशी आपली मनोवृत्ति असते व अगदी शेवटच्या क्षणाला आपण मुळीच विचार न करता आपण एक कृति निश्चित करतो.

(४) अन्त.स्फूर्तप्रकार —कोणतेहि विशिष्ट कारण नसताना निव्वळ अत:प्रेरणेमुळे आपण कृतीचा निर्णय एखादे वेळी घेतो.

(५) क्रान्तिकारक प्रकार:—काही वेळा जीवनाच्या मूल्यातच एकदम इतका फेरबदल होतो की पूर्वीच्या मनोवृत्तीनुसार जी गोष्ट आपणाला मागच्या क्षणी त्याज्य वाटली असेल ती पुढच्या क्षणाला योग्य वाटू लागते.

एकदरीने पाहिले असता निश्चयशक्तीच्या जोरावर एखादी कृति करावयाची झाल्यास थोडा फार त्रास हा होतोच डिकन्सन्च्या मते परिणामाचे स्पष्ट चित्र जर मुलाच्या डोळ्यासमोर सतत उभे केलेले असले तर अतिशय कष्टदायक कामहि मुले आनदाने करावयास तयार होतात.

निश्चयशक्तीचा सतत उपयोग केल्यास सबध आयुष्याच्या दृष्टिकोनातच फरक पडतो. प्रत्येक व्यक्तीला सामाजिक जीवन यशस्वी करण्यासाठी थोड्याफार प्रमाणात या शक्तीचा उपयोग करावा लागतोच. प्रत्येक व्यक्तीने काही पशुतुल्य प्रवृत्तीवर सतत ताबा ठेवला तरच समाजांत स्थैर्य, शातता व सुव्यवस्था नादू शकेल. निश्चयशक्तीला एक विशिष्ट वळण लावण्यासाठी मनुष्याला कोणतेतरी ध्येय सतत डोळ्यासमोर ठेवावे लागतें. शिक्षकाने शिकविताना अशी ध्येयें मुलासमोर ठेवावीत की त्यांचे अनुकरण करताना मुलाची निश्चयशक्ति आपोआपच वाढेल. असामान्य लोकांच्या

गोष्टी त्याना वारवार सागत गेल्याने त्यानाहि मोठे व्हावेसे वाटते व त्यांच्या प्रयत्नास आपोआपच दिशा लागते निश्चयशक्तीच्या जोरावर सर्व तऱ्हेची उच्च सुखें माणसाने मिळवावीत. हाच धर्म व नीति याचा उद्देश असतो

**निश्चयशक्ति व ध्येयाचा विकास**:—मानवाच्या निरनिराळ्या मनोव्यापाराचे वर्गीकरण केल्यास त्यात तीन भाग आढळून येतात. (१) विचार, (२) विकार व (३) प्रेरणा. हे तीन विभाग प्रत्यक्ष आयुष्यात वेगळे कधी आढळून येत नाहीत फक्त अभ्यासासाठीच त्याचे स्वतत्र अस्तित्व मानायचे. मनाचा एक विशेष असा आहे की ते कोणतीहि गोष्ट बिनबोभाट करीत नाही. त्याला कार्यप्रवण करणारी स्वतत्र प्रेरणा असावी लागते. ही प्रेरणात्मक शक्ति कधी गोडीगुलाबीने तर कधी धाक दाखवून मनाकडून इष्ट कार्य करवीत असते. जितक्या प्रमाणात कार्य अधिक महत्त्वाचे व निकडीचे असेल तितक्या प्रमाणात ती प्रेरक शक्ति जास्त जोरदार असावी लागते. काही इष्ट कार्ये करण्यास मनास प्रवृत्त करणारी व अनिष्ट कार्यापासून मनास परावृत्त करणारी जी शक्ति तिलाच निश्चयशक्ति असे म्हणतात.

जोपर्यंत नैसर्गिक प्रवृत्ति हिताच्या आड येत नाहीत, तोपर्यंत निश्चयशक्तीचा विशेष काही प्रश्नच येत नाही. श्रेयस् व प्रेयस् अशा गोष्टीचा जेव्हा झगडा उत्पन्न होतो तेव्हा श्रेयस्कर गोष्टीकडे मनाचा कल वळवून प्रिय गोष्ट दूर सारण्यात जो कणखरपणा लागतो, तेथेच निश्चयशक्तीचा प्रभाव दिसून येतो. उदाहरणार्थ, मुलाची डावखुरेपणाची सवय घालविणे.

सकल्प व सिद्धि याच्यामध्ये निर्माण झालेल्या अडचणी दूर करून संकल्पाना प्रत्यक्ष सृष्टीत आणण्याचे काम निश्चयशक्ति करीत असते. या शक्तीचे प्रत्यक्ष कार्य सुरू होण्यापूर्वी मनात सर्व तऱ्हेच्या बऱ्यावाईट योग्यायोग्य कल्पनाचें द्वंद्व सुरू असतें. त्यातून कृतीचा मार्ग एकदा निश्चित ठरला की निश्चयशक्ति आपल्या बळाने मार्ग काढते व क्रिया पार पाडते.



## प्रकरण १९ वें

# मानसिक प्रवृत्तींचा विग्रह

प्राण्याच्या भोवतालची परिस्थिति जर नेहमीच त्याला अनुकूल व अगदी साधी अशी राहिली असती तर त्याच्या मनात झगडा किंवा द्वंद्व हे कधी उद्‌भवलेच नसते. पण अशी परिस्थिति नेहमी नसते. पुष्कळ प्रसंग आयुष्यात असे असतात की, त्यावेळी दोन किंवा दोहोंपेक्षा अधिक प्रवृत्ति कृतीत उतरू पाहतात. अशी कल्पना करा की, तुमचा शत्रु तुमच्यापुढे दीन होऊन उभा आहे त्याला दया दाखवावयाची व सोडून द्यावयाचा तर तो आपल्यावर परत केव्हा उलटेल याचा नियम नाही. सूड उगवावयाचा तर शरण आलेल्यावर हत्यार उगारणे हा शूराचा धर्म नाही अशा रीतीने मनात या दोन प्रवृत्तींचा झगडा निर्माण होतो व कोणती कल्पना कृतीत उतरावयाची याचा निश्चय होत नाही. दोन किंवा दोहोंपेक्षा अधिक कृति-प्रवृत्ति जेव्हा प्रत्यक्षात उतरू पाहतात तेव्हा कोणती प्रवृत्ति दाबून टाका-वयाची हे ठरविण्याच्या वेळची मनाची जी स्थिति त्या स्थितीस मानसिक विग्रह असे म्हणतात एखाद्या कुत्र्यास मालकाने शीळ घालून बोलावले की तो येतो पण हातात सापडल्यावर मालक बांधून ठेवील की काय, या भीतीने परत दूर दूर पळतो. हा त्याच्या मनातील गोंधळ त्याच्या प्रत्येक हालचालीत दिसून येतो.

**मानसिक विग्रहाचा प्रतिकार करण्याच्या पद्धति :—**अशा तऱ्हेचा झगडा मनात निर्माण झाल्यास त्याला कशा तऱ्हेने तोंड देता येईल, याच्या-संबधी तीन निरनिराळे दृष्टिकोन संभवतात

(१) विग्रह करणाऱ्या दोन्ही प्रवृत्ति जर सारख्याच शक्तिमान् असतील तर त्यातली कोणतीच प्रवृत्ति माघार घेणार नाही. अशा वेळी

मनुष्य क्रियाशून्य बनण्याचीच जास्त शक्यता असते. कृति झालीच तर ती अशा तऱ्हेची होते की तिला काहीच अर्थ नसतो या तऱ्हेच्या झगडयाचे उत्तम उदाहरण म्हणजे शेक्सपिअरचा हॅम्लेट बापाचा खून करून आईशी लग्न लावणाऱ्या चुलत्याबद्दल त्याला अत्यत तिरस्कार वाटत असतो व त्याचा सूड उगवावा असे त्याला एकीकडे वाटत असते. निरनिराळ्या कारणास्तव ही सूडाची कृति अमलात आणणे तर त्यास जमत नाही. म्हणून आयुष्यभर ‘ जगावे की न जगावे ’ हा प्रश्न त्याला सारखा भेडसावीत असतो

(२) विग्रह करणाऱ्या दोन प्रवृत्ति एकमेकीत समाधानकारक रीतीने मिसळतात व दोहोतील परिणामकारक भाग मिळून एक सुसूत्र प्रतिक्रिया तयार होते. व्यवहारात बाह्यात्कारी म्हणून आपण ज्या पुष्कळशा गोष्टी करतो त्या सर्व या प्रकारात जमा करता येतील. एखाद्या माणसाशी आपला एखाद्या मुद्द्यावर मतभेद झाला तर काही क्षण आपल्याला त्याचा अतिशय राग येतो व त्याच्याशी पुन्हा मुळीच बोलू नये असे आपणास वाटते पण लगेच दुसरा असा विचार पुढे येतो की, एखाद्या मुद्द्यावरच्या मतभेदावरून जर आपण माणसाला कायमचे तोडावयाचे ठरविले तर जगात एकाहि माणसाशी आपले पटणार नाही एका बाबतीत जो मनुष्य वाईट तो सर्वच बाबतीत वाईट असे आपणास म्हणता येणार नाही. अशा तऱ्हेच्या दोन बाजू जेव्हा डोळ्यासमोर येतात तेव्हा शेवटी आपण असा निर्णय करतो की ज्या मुद्द्याबाबत आपला एखाद्या माणसाशी मतभेद होईल तेवढा मुद्दा त्याच्याशी बोलताना वगळावयाचा व बाकीच्या बाबतीत स्नेहाचे सबध ठेवावयाचे असा समाधानकारक निर्णय केल्यानंतर मन शान्त होते व आपण न गोंधळता आपला निर्णय कृतीत उतरवितों

(३) विग्रहातील एका प्रवृत्तीचा पूर्ण पराभव होऊन दुसरी प्रवृत्ति विजयी होते. मनुष्य त्या विजयी प्रवृत्तीच्या पूर्णपणे अधीन होतो. सर्वसामान्य माणसाच्या बाबतीत ही विजयी प्रवृत्ति सात्त्विक असण्यापेक्षा आसुरी असण्याचाच अधिक सभव असतो याचे उत्कृष्ट उदाहरण ‘ एकच प्याल्या’तील सुधाकराचे देता येईल. त्याच्या आयुष्यात पश्चात्तापाचा असा एक क्षण येतो की, त्यावेळी दारूला पुन्हा स्पर्श न करण्याची शपथ घेऊन

सन्मार्गाला येण्याची इच्छा तो दर्शवितो, पण त्याच क्षणी चार सद्गृहस्थाच्या हेटाळणीने त्याची उमेद इतकी खचते की, तो सर्वस्वाचा नाश उघडया डोळयानी पाहण्याची तयारी करून परत दारूकडे वळतो सर्वसामान्यत जगात आपणास असे दिसून येते की, कर्तव्य व मोह याच्या झगडयात पुष्कळ वेळां मोहाचाच विजय होतो व वाईट परिणामाची कल्पना असूनहि आधळयासारखा मनुष्य त्या मोहाच्या दिशेने जाऊन नाशाच्या खड्डयात पडतो

## मानसिक विग्रहांतून निर्माण होणाऱ्या निरनिराळया मानसिक अवस्था

मानसिक झगडयाची भूमिका ही वैचारिक पातळीवर असते, तेव्हाच्या मनाच्या अवस्थेस सदेहावस्था (Condition of doubt) असे म्हणतात. जेव्हा एखाद्या प्रश्नाचे निश्चित उत्तर आपणास माहीत नसते, तेव्हा आपण "मला असे वाटते; पण खात्री नाही" अशा तऱ्हेचे उत्तर देतो दोन विचारापैकी एका विचाराकडे जेव्हा मन निश्चित झुकते तेव्हा त्या मानसिक अवस्थेस निश्चयावस्था असे आपण म्हणतो सदेहावस्था मनात अस्वस्थता निर्माण करने व त्यामळे एका कोणत्यातरी विचारावर स्थिर होण्याम मन फार उत्सुक असने दुसरी गोष्ट अशी की, प्रत्यक्ष कृति करण्याची वेळ आली म्हणजे मन एका विचारावर स्थिर करणेच भाग पडते. आपल्याला पुरोगामी मत पटते की प्रतिगामी मत पटते यावर नुसता वैचारिक भेद काही काळ चालू शकेल, पण एखाद्या निवडणुकीच्या वेळी जेव्हा प्रत्यक्ष मत देण्याचा प्रसग येईल तेव्हा मनाला एका मतावर स्थिर व्हावेच लागते अशा रीतीने मन एकदा एका बाजूवर स्थिर झाले की दुसरी बाजू मनातून आपोआप नाहीशी होते

आपला जीवर पूर्ण विश्वास बसला अशी वैचारिक बाजू जेव्हा कोणत्या तरी बाह्य कारणावरून सोडण्याची वेळ येते तेव्हा मन फार अस्वस्थ होते. बराच काल धडपड केल्यानतरहि आपण विश्वास ठेवलेली बाजू खोटी आहे असे सिद्ध झाले, तरच नाइलाजाने आपण ती बाजू सोडून देण्यास तयार होतो

काही माणसाचे व्यक्तिमत्त्व इतके कमकुवत असते की, त्याच्या मनातील झगड्याच्या दोन्ही बाजू तुल्यबल असतील तर माणूस दोन्हीच्याहि अधीन होतो व धडपणे त्याच्या हातून कोणतीच कृति होत नाही या मानसिक अवस्थेचे थाउलेस्‌ने मोठे मार्मिक वर्णन केले आहे तो म्हणतो, 'विचारप्रधान माणसे कृतीत कमकुवत दिसतात व कृतिप्रधान माणसाना विचार असह्य होतात.'

**मानसिक विग्रहाकडे पाहण्याचा आणखी एक दृष्टिकोन :—** मानसिक झगड्याचे आणखी एका दृष्टिकोनातून निरीक्षण केल्यास या झगड्यातील दोन प्रकार आपणास उघडपणे दिसतात (१) खूप काळ चालू राहणारा मानसिक झगडा. (२) प्रसगोपात्त निर्माण होणारा मानसिक झगडा

पहिल्या प्रकारची उदाहरणे खालीलप्रमाणे देता येतील (१) एखादा सैनिक लढाईवर गेला असता एकीकडे देशाविषयीची कर्तव्यबुद्धि त्याला लढण्यासाठी प्रवृत्त करीत असते तर एकीकडे जिवाची भीति त्याला लढण्यापासून परावृत्त करीत असते (२) आईबाप व मुले याच्यातील परस्पराच्या मतभेदामुळे निर्माण झालेले वैयक्तिक वैचारिक झगडे (३) एखाद्या गुप्त सघटनेत मनुष्य असल्यास देशहितबुद्धि त्याला त्या सघटनेशी एकनिष्ठ रहावे म्हणून खेचीत असते पण एखाद्याने लाखो रुपयाची लालूच दाखविल्यास गुप्त सघटनेची रहस्ये फोडण्याचाहि त्यास मोह होतो

दुसऱ्या तऱ्हेच्या झगड्याची उदाहरणेहि नेहमीच्या व्यवहारात हवी तेवढी सापडतात. आपण एखाद्या अत्यत जरुरीच्या कामासाठी घराबाहेर पडावे, अर्ध्या वाटेत गेल्यानतर रस्त्यात दंगा चाललेला दिसावा अशा वेळी मन एकदम घोटाळ्यात पडते. ' पुढे जावें की परत फिरावे ? ' पण लगेच आपण एक विचार निश्चित करतो व त्याप्रमाणे वागतो

आयुष्यात निर्माण होणाऱ्या मोठ्या झगड्याचे परिणाम फार मोठे होतात. अशा तऱ्हेच्या झगड्याना तोंड देताना त्रासदायक प्रवृत्ति दाबून टाकण्याचा मनुष्य एकसारखा प्रयत्न करीत असतो प्रवृत्ति दाबावी तरी लागते किंवा तिला वेगळ्या तऱ्हेने प्रगट होण्यास वाव द्यावा लागतो.

मोठे झगडे हे प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यांत एक दोन तरी असतातच नीति, धर्म वगैरे कल्पनाचे झगडे प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यात निर्माण होतातच अशा झगड्याचे निर्णय करताना शेकडो वर्षाच्या अनुभवाने समाजात मागे होऊन गेलेल्या व्यक्तींनी जे सर्वसामामान्य नियम घालून दिलेले असतात त्याचा आपणास फार उपयोग होतो

कोणत्याहि कारणाने माणूस कमकुवत झाल्यास, त्याला झगड्याचा ताण सहन होत नाही व मग त्यातूनच उन्माद (Hysteria), वेड (Madness) वगैरे विकृति दिसू लागतात. फ्राईडच्या मते दाबून टाकलेले हे मनोविकार स्वत्वासबधी अगर लैंगिक असतात. दाबलेल्या किंवा मारलेल्या भावना कधीच नाहीशा होत नाहीत. या ना त्या रूपाने त्याचा आविष्कार होतो या बाबतीत अनेक प्रयोग करून मनोविश्लेषणवादी पथाने मानसशास्त्रात फार मोठी कामगिरी केली आहे. डॉ फ्राईड्, डॉ यूग्, डॉ अॅड्लर् इत्यादि प्रसिद्ध विद्वानाची नावे या क्षेत्रात प्रथम डोळ्यासमोर उभी राहातात ज्याला आपण जाणीव किंवा बोध म्हणतों तो आपल्या मनाचा अगदी लहानात लहान भाग आहे, असे या शास्त्रज्ञाचे मत आहे हे लोक मनाची तुलना समुद्रात तरगणाऱ्या एखाद्या हिमखडाशी करतात पाण्याच्या पृष्ठभागावर या हिमखडाचा जितका भाग दृष्टिगोचर होतो, त्याच्या दसपट भाग पाण्यात असतो असे म्हणतात. दुसरी उपमा द्यावयाची म्हणजे महासागरात मध्येच दिसणाऱ्या बेटाची देता येईल त्या बेटाचा जास्तीत जास्त भाग पाण्यात असतो व वर फक्त लहानसे अग्र दिसते तोच प्रकार अनुभवाने भरलेल्या आपल्या मनाचा आहे जाणिवेच्या अत्यल्प भागाचा आपल्याला प्रत्यक्ष बोध होतो; पण जाणिवेच्या खाली कितीतरी मोठा अबोधाचा—नेणिवेचा—भाग असतो हे पुष्कळवेळा आपल्या ध्यानातहि येत नाही त्याचप्रमाणे जाणिवेतील अनुभवाच्या साहाय्याने ज्याप्रमाणे आपली कार्ये चाललेली असतात, त्याचप्रमाणे आपल्या हातून घडणारी कितीतरी कृत्यें नेणिवेच्या प्रेरणेने होत असतात. आपल्या हातून ती अजाणता होतात आणि मग आपण म्हणतो, "हे झाले कसें, तें माझे मलाच सागता येत नाही." या जाणिवे-नेणिवेमध्ये एक **अवेक्षक** (Censor) असतो, त्या अवेक्षकाची नजर चुकवून नेणिवेत बद असलेली एखादी तीव्र भावना बाहेर

डोकावते व आपणाला कार्यप्रवृत्त करते. माणसाच्या ठिकाणी जे अनेक गड निर्माण होतात त्याचे उगमस्थानहि या अबोधात असते अहगड, श्रेष्ठगड, न्यूनगड, पितृगड इत्यादिपैकी एकाने अगर अनेकानी घेरलेल्या माणसाचे आचरण आपण बारकाईने अभ्यासले म्हणजे मनोविश्लेषणशास्त्राने आपल्या ज्ञानात केवढी क्रान्ति केली आहे हे सहज दिसून येते. स्वप्ने, तन्द्री, आभास, उन्माद वगैरे विकृतीचा आरभ अबोधातूनच होतो, पण बोलण्यात, चालण्यात, लिहिण्यात, वाचण्यात, आपल्या हातून होणाऱ्या बारीक सारीक चुका ध्यानात ठेवण्याचा प्रयत्न करूनहि आपण काही गोष्टी करण्यास विसरतो याचेहि शास्त्रीय कारण आपल्या मनातील अप्रकट भागातच शोधावे लागते पुष्कळदा असे होते की आपण पत्र लिहितो; परतु पोस्टात न पडता कित्येक दिवस ते आपल्या खिशातच रहाते याचे कारण त्या पत्रासंबधी काहीतरी प्रतिकूल विचार आपल्या मनात वावरत असतात. विकृतमज्ज (Neurotic) रोग्याच्या बाबतीत आज अनेक प्रयोग चालू असून त्या रोग्याचे क्लेशनिवारण नेणिवेच्या सशोधनाच्या साहाय्याने करण्यात बरेच यशहि मिळाले आहे. मानसिक झगडयाच्या विवेचनात मनोविश्लेषणाचे हे थोडेसे विवेचन ओघाने आले. याबद्दल अधिक माहिती यासबधी लिहिलेल्या स्वतत्र प्रकरणात पुढे येणारच आहे

## प्रकरण २० वें

# उपसामान्य व असामान्य मुलें

## (Behaviour of Abnormal Children)



काही मुलाची नैसर्गिक वाढ अपुरी होते. अशा मुलाना सर्वसामान्य मुलाना लागू होणाऱ्या शिक्षणपद्धतीचा उपयोग होत नाही. गेल्या काही वर्षात अशा मुलासाठी वेगळ्या शाळा काढण्यात आल्या आहेत; पण सामान्य मुलाच्याच शाळेत जाणारी पण बुद्धीने अगदी मद अशा तऱ्हेची जी मुले असतात त्याच्याबाबत जर शिक्षकाने इतर मुलापेक्षा काही वेगळ्या पद्धति वापरल्या नाहीत तर समाजाचा बराचसा भाग वाया जातो तेव्हा अशा तऱ्हेच्या मदबुद्धि मुलासाठी कोणकोणते अधिक प्रयोग शिक्षकाने केले पाहिजेत याचा अधिक विचार येथे करावयाचा आहे

**डॉ. वॉर्नर्चे निरीक्षण.**—बुद्धीने मागासलेल्या बऱ्याचशा मुलाची शारीरिक तपासणी केल्यानतर डॉ वॉर्नर् यास असे आढळून आले की, मदबुद्धि मुलापैकी (१) काही मुलाच्या शारीरिक वाढीत दोष असतो (२) काही मुलाना मज्जाततूचे निरनिराळे विकार असतात (३) काही मुले जात्याच नाजुक प्रकृतीची असतात बुद्धीच्या मदपणास वरील कारणाखेरीज आणखीहि काही कारणे असू शकतात

(१) पूर्व आयुष्यात काही वेळा असे प्रसग येतात की, त्याचा मुलाच्या मनावर कायमचा परिणाम होतो व जात्या बुद्धिहीन नसलेली मुलेहि अशा घटनाच्या परिणामामुळे मदबुद्धि होतात (२) मॅन्चेस्टर्ला असलेल्या एका शाळेतील मुलाची या दृष्टीने तपासणी करून पाहिली. तेव्हा असे आढळून आले की, काही मुलाना वयाच्या चार वर्षांच्या आत एखादें मोठे दुखणे येऊन गेलेले होते व त्यानतर त्या मुलाच्या बुद्धीत मंदपणा

आला विषम, न्यूमोनिया, वगैरेसारख्या दुखण्याचा परिणाम मेदूवर काही वेळा कायमचा राहून जातो वयाच्या ५ ते १० वर्षांत जरी एखादे दुखणे आले तरी त्याचाहि मेदूवर कायमचा परिणाम होतो (३) **शिक्षणांत खंड** :– काही मुलाचे शिक्षण सरळ न होता मधे मधे सारखा खड पडतो व त्यामळेंहि त्याची बुद्धि मद होऊ लागते (४) **खाण्यापिण्याची आबाळ** :— मागासलेल्या मुलात काही मुले अशीहि दिसतात की जरूर ते पोषक अन्न मिळू शकत नाही. १९१२ साली इग्लडमध्ये भरलेल्या एका शिक्षकपरिषदेपुढे भाषण करताना सर जेम्स् क्रिक्टन् ब्राऊन् यानी असे स्पष्ट म्हटले आहे की भरपूर खावयास न मिळाल्याचा शरीरावर तर परिणाम होतोच; पण त्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक वाईट परिणाम मानसिक वाढीवर होतो. मुलाची ग्रहणशक्ति यथाक्रम (normal) असण्यास मुलाला सर्व तऱ्हेचे उत्तम अन्न मिळाले पाहिजे. यावरून असा निष्कर्ष काढता येईल की प्रत्येक मागासलेल्या मुलाचा इतिहास पाहिल्यास, बौद्धिक दोष व शारीरिक दोष याचा निकटवर्ती सबध आहे म्हणून शारीरिक दोषाचे मूळ नाहीसे करणे हे जेथे शक्य असेल तेथे ते जरूर केलें पाहिजे. शाळेंत निदान दर सहा महिन्यानी मुलाची वैद्यकीय तपासणी करून, मुलाना व त्याच्या पालकाना मुलातील दोष व ते नाहीसे करण्याचे उपाय समजावून सागितले पाहिजेत गरीब मुलाना सस्थाच्या अगर सरकारी खर्चाने दूध वगैरे देण्याची सोय केली पाहिजे हे उपाय जर निश्चयाने अमलात आणले, तर आज सामाजिक दृष्टीने वाया जाणाऱ्या कितीतरी मुलाचे आयुष्य सुखी होईल व ती समाजाच्याहि उपयोगी पडतील. डोळयाच्या दोषावरील उपायाबाबत, अध व मुके याना शिक्षण देण्याच्या पद्धतीबाबत जेव्हा अज्ञान होते तेव्हा अशा मुलाना काहीच शिक्षण मिळत नव्हते व त्यामुळे त्याचे जीवन दु:खी होते; पण वैद्यक शास्त्राच्या प्रगतीने अशी कितीतरी मुले आता शिक्षण घेऊन एखादा व्यवसाय उत्तम रीतीने करीत आहेत. पण यातहि एक महत्त्वाची गोष्ट आहे की, कोणताहि शारीरिक दोष जर लवकर उघडकीस आला तरच त्यावर यशस्वी रीतीने उपाययोजना करता येतो. हे उपाय सर्वच मुलाच्याबाबत वेळेवर होतील असे नाही. त्यामुळे समाजांत मागासलेल्या मुलाचा एक वर्ग नेहमीच राहणार त्याचा विचार आणखी कांही रीतीन करणे जरूर आहे

**मागासलेल्या मुलांचें शिक्षण**:—सामान्यत: सर्व शाळात अशी पद्धत असते की मुलाचे प्रगतीनुसार वर्ग बदलत असताना मागासलेल्या मुलाना खाली ठेवले जाते, पण यामुळे फायद्यापेक्षा तोटेच अधिक होतात खालच्या वर्गातून बुद्धिमंद मुलाची संख्या वाढू लागते वर्गातील इतर मुलावर, शिक्षकावर व वर्गाच्या एकदर वातावरणावर यामुळे वाईट परिणाम होतो

दुसरें असे की लहान व हुशार मुलातच बुद्धिमंद व वयाने मोठ्या मुलास बसावे लागते त्यामुळे त्याच्या मनात एक प्रकारचा संकोच, लाज व न्यूनत्वाची जाणीव निर्माण होते ही गोष्ट मुलाच्या स्वाभिमानास दुखावणारी असते ग्रीन्ने असे म्हटले आहे की मागासलेल्या मुलाच्या बाबतीत आपले पहिले कर्तव्य हे की अशा मुलाच्या स्वाभिमानास फार जपले पाहिजे अमुक मुलगा अमुक गोष्ट अधिक आवडीने करतो असे दिसून आल्यास त्या गोष्टीत तो मुलगा प्रावीण्य मिळवील अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे.

युरोपातील काही देशांत मंदबुद्धि मुलासाठी स्वतंत्र शाळा काढल्या आहेत. या शाळेतील प्रत्येक वर्गात तीस ते पस्तीसपेक्षा जास्त मुले असत नाहीत. अभ्यासक्रम बेताचा ठेवून पुनरावृत्तीवर खूप भर देण्यात येतो दोन इयत्ताच्या अभ्यासक्रमात फार थोडा फरक केलेला असतो. त्यामुळे वर्षाअखेरीस थोडाच पण पक्का अभ्यास होऊन परीक्षेत मुले पास होतात व वरच्या वर्गांत गेल्यावर ती अधिक उत्साहाने अभ्यास करतात.

वरील पद्धतीने मंदबुद्धि मुलाना शिक्षण देण्यात काही तोटेहि होतात असें आढळून येतें

(१) या शाळामधून जो अभ्यासक्रम आखण्यांत येतो तो प्रत्येक मुलांतील उणीव लक्षात घेऊन तयार केलेला नसतो. त्यामुळे काहीच मुलें, जी फक्त दुखण्यामुळे मागासलेली असतात, ती या अभ्यासक्रमात चागली प्रगति करतात व काही एक वर्षांच्या श्रमानंतरहि त्याच वर्गांत राहतात. (२) सामान्यतः बुद्धीने मंद असणाऱ्या मुलाना शारीरिक श्रमाचें काम दिल्यास त्याची प्रगति लवकर होते; पण या शाळातील अभ्यासक्रमात हस्तव्यवसायाचा समावेश केलेला नाही. (३) मागासलेल्या मुलांसाठी

स्वतंत्र शाळा काढल्याने ही मुले इतर मुलापासून आपोआपच दूर ठेवली जातात व त्यामुळे बाहेरच्या जगात गेल्यानतर ही मुले गोधळून जाऊन त्याच्यात एक प्रकारचा न्यूनगड उत्पन्न होतो

वरील सर्व दोप दूर करण्याच्या दृष्टीने अमेरिकेत मागासलेल्या मुलासाठी निरनिराळ्या शिक्षण पद्धतीचा अवलब केलेला आहे त्यापैकी एक म्हणजे 'विनाक्रम वर्ग' (Ungraded Class) ही एक होय हा वर्ग सामान्य मुलाच्या शाळानाच जोडलेला असतो व खेळताना वगैरे सर्व वेळी ही मागासलेली मुले सामान्य मुलातच मिसळत असल्याने त्याच्यात हा न्यूनगड उत्पन्न होत नाही.

अमेरिकन व जर्मन पद्धतीत फरक हा की अमेरिकन पद्धतीत मागासलेल्या मुलाना सामान्य मुलाचाच अभ्यासक्रम लागू करीत नाहीत मागासलेल्या व सामान्य मुलाना एक तऱ्हेचे शिक्षण देणे अशक्य आहे कारण अनुभव व ज्ञान याची सुरवात वेदनानी होते मागासलेल्या मुलाना चटकन् अवबोध होतच नाही ग्रहणशक्ति कमी असल्याने मागासलेल्या मुलास सुरवातीच्या अवबोधासच सामान्य मुलाहून जास्त वेळ लागतो तेव्हा मागासलेल्या मुलाच्या शिक्षणास जर कोठून सुरवात करावयाची असेल तर ती ज्ञानेंद्रियाच्या शिक्षणापासूनच करावयास हवी इद्रिय शिक्षणासाठी किंडर्गार्टन् पद्धतीतील सर्व गोष्टीचा उपयोग शिक्षक विनाक्रमवर्गामध्ये करतो. मुलाना आवाजातील फरक कसा ओळखावा, रग कसे ओळखावे, वास कसा ओळखावा वगैरे गोष्टी शिकवितो सामान्य मुलाच्या दृष्टीने या गोष्टी फार सोप्या असल्याने त्याना त्या वेगळ्या रीतीने मुद्दाम शिकवाव्या लागत नाहीत मागासलेल्या मुलाने कृति करण्यास व शिकण्यास उत्सुक व्हावे असे वातावरण निर्माण करून जेवढा शैक्षणिक भाग कृतीत बसेल तेवढा बसविणे हे विनाक्रमवर्गाच्या शिक्षकाचे काम आहे.

रोममध्ये प्रथम मॉंटेसोरी बाईने मागासलेल्या मुलासाठी शिक्षणक्रम तयार करून शिकविण्याची स्वतंत्र पद्धति तयार केली. स्वत. काढलेल्या शाळेत या पद्धतीने शिकविण्याचा तिने जो प्रयोग करून पाहिला तो फारच यशस्वी झाला. या प्रयोगाचे वेळी मॉंटेसोरी बाईस असें आढळून आलें की कांही मागासलेली मुले त्यांच्याच वयाच्या सामान्य मुलासाठी

तयार केलेल्या बौद्धिक चाचणी-परीक्षाहि देऊ शकली प्रत्येक देशातील परिस्थितीस योग्य असे बरेचसे फेरफार या पद्धतीत केल्यास ही पद्धत मागासलेल्या मुलाना फार उपयोगी पडते असे सिद्ध झाले आहे

मागासलेल्या मुलाकडे व्यक्तिगत लक्ष फार पुरवावे लागते त्यामुळे एका वर्गातील मुलाची सख्या जितकी थोडी असेल तितकी चांगली. म्हणूनच अमेरिकन विनाक्रमवर्गामध्ये १० ते १५ पेक्षा जास्त मुले घेत नाहीत. जर्मनीत व अमेरिकेत दोन्ही ठिकाणी जी मागासलेली मुले चागली प्रगति करतात, त्याना सामान्य मुलाच्या शाळेत दाखल करून घेतात

अमेरिकेतील विनाक्रमवर्गासारखे काही वर्ग इग्लडमधील शाळातहि आहेत. १९०० साली डकन् फोर्बस्च्या नेतृत्वाखाली मागासलेल्या मुलासाठी एक वर्ग एका शाळेत काढण्यात आला या वर्गासबधी फोर्बस्ने केलेल्या निरीक्षणाचा साराश असा --(१) वर्गात मुले थोडी असली तरी प्रत्येक मुलात इतका फरक दिसून येतो की, प्रत्येकास स्वतत्र रीतीने शिकविण्याखेरीज गत्यतर नसते (२) प्रत्येक विषय कृतीच्याच साहाय्याने शिकविल्यास अधिक चागला ध्यानात राहतो

अशा रीतीने काही शाळासून जरी असे वर्ग काढलेले असले तरी सर्व शाळाना ही गोष्ट शक्य होत नाही जेथे मागासलेल्या मुलासाठी निराळे वर्ग चालविणे अशक्य असेल तेथे काच शाळेत सामान्य व मागासलेली मुले घ्यावीत काही विषय शिकविताना सर्वांना एकत्र बसवावे व काही अवघड विषय शिकविताना मागासलेल्या मुलाना हस्तव्यवसायासारखी कामे देण्यात यावीत अशा रीतीने सर्व विषयाची सक्ती न केल्यास मागासलेली मुले काही विषयात समाधानकारक प्रगति करू शकतात ज्यात आवड निर्माण होईल त्या त्या हस्तव्यवसायात मागासलेली मुले भराभर प्रगति करू शकतात असे दिसून आले आहे.

**अकाल प्रौढ मुलें** (Precocious children) --काही मुले जशी सामान्य मुलापेक्षा बुद्धीने कमी असतात तशी काही मुले सामान्य मुलापेक्षा बुद्धीने अधिक चागली असतात. त्याना अकालप्रौढ असे म्हणतात.

अशा अतिहुशार मुलात दोन तऱ्हा दिसतात (१) एकाच विषयाल सामान्य मुलापेक्षा जास्त बुद्धिमत्ता दाखविणारी मुलें व (२) सर्वच बाबतीत वयाच्या मानाने बुद्धीची अधिक प्रखरता दाखविणारी मुले. या मुलाना जर योग्य संधि मिळाली तर त्यातूनच असामान्य व्यक्ति निघू शकतात

अकाल-प्रौढ मुलाचे जर लहानपणी खूप लाड केले, तर ती त्यामुळे शेफारून जातात व त्या घमेंडीत त्याची प्रगति खुटते दुसरी गोष्ट अशी की, सर्वच वाढ बुद्धिमत्तेत गेल्याने ही मुले पुष्कळवेळा शरीराने कमकुवत व अशक्त बनतात त्याना जास्त बौद्धिक श्रम घेतल्यास त्याचें शरीर त्या श्रमास टिकाव धरूं शकत नाही.

अतिबुद्धिमान् मुलाना ज्या तऱ्हेच्या शिक्षणाची जरुरी असते तशा तऱ्हेची व्यवस्था सर्वच पालक व सरकारहि करू शकत नाही व त्यामुळे त्याना स्वत:च्या इच्छाशक्तीस आळा घालून नाइलाजाने सामान्य मुलाबरोबरच शिक्षण घ्यावे लागते कर्सचेन्स्टीनर् नावाच्या एका गृहस्थाने म्यूनिच् शहरी शिक्षण घेणाऱ्या ५०,००० मुलाची एक ड्रॉइंगची चाचणीपरीक्षा घेतली स्मरणाने व प्रत्यक्ष पाहून काही वस्तु काढावयाच्या होत्या या मुलानी काढलेल्या चित्रात काही मुलाची चित्रे इतकी चागली होती की, शिकलेल्या कोणाहि कलावताच्या कलेशी त्याची बरोबरी होईल. ही कलावत मुले निवडून काढून त्याच्या आईबापाच्या परिस्थितीची चौकशी करता असे आढळून आले की, ती कुटुबे गरीब असल्याने त्याना मुलाच्या शिक्षणाची व्यवस्था करणे शक्य नव्हते म्हणून कर्सचेन्स्टीनर्ने स्वत: या मुलाना कलाभुवनात घालून तयार केले पण प्रत्येक प्रयोगकर्त्याला काही असे करणे शक्य नाही आईबापाच्या गरीबीमुळे कितीतरी अतिबुद्धिमान् मुलाना आयुष्यात जरूर ती सधि मिळू शकत नाही

दुसरा एक मार्ग म्हणजे नेहमीच्या शाळातूनच अधिक बुद्धिमान् मुलासाठी स्वतत्र वर्ग घ्यावेत हीहि शक्यता ज्या ठिकाणी नसेल तेथे शिक्षकानेच या मुलासाठी जास्त श्रम घेणे भाग आहे. सामान्य मुलाचा वर्ग घेत असताना असामान्य मुलाना निराळ्या तऱ्हेने गुतवावे, सामान्य मुलाचे गट करून त्यावर अतिबुद्धिमान् मुले नेमावीत व त्यानी इतर मुलाना विषय समजावून घेण्यास मदत करावी. विषयातील अवघड भागाचे

प्रात्यक्षिक हुशार मुलाकडून करून घ्यावे गणितासारख्या विषयात जेव्हा सामान्य मुलाना पुनरावृत्तीची जरुरी असते तेव्हा हुशार मुलाना अधिक गणिते करावयास द्यावीत या व इतर काही तऱ्हानी हुशार मुलाना जास्त चालना देणे हे काम शिक्षकास करता येण्यासारखे आहे.

अधिक बुद्धिमान् मुलाच्या शिक्षणाची सोय आणखी एका तऱ्हेने करता येईल एका वर्षाने परीक्षा घेऊन वरच्या वर्गात घालण्याऐवजी हुशार मुलाच्या परीक्षा दर सहा महिन्यानी किवा तीन महिन्यानी घेऊन त्याच्या इयत्ता बदलाव्यात, म्हणजे त्याचा शालेय अभ्यासक्रम लवकर पुरा होऊन ती उच्च अभ्यासक्रमास लवकर सुरवात करतील अर्थात् फार लहान मुलाना हा ताण देऊ नये हुशार मुलाबाबत एक काळजी नेहमीच घ्यावी लागेल व ती म्हणजे भराभर बौद्धिक उड्या मारताना शरीराची हानि होत नाहीना इकडे पालकानी व शिक्षकानी सदैव लक्ष पुरविले पाहिजे

प्रकरण २१ वें

# गुन्हा व शिक्षा

**( Crime and Punishment )**



प्रत्येक समाजाची एक ठराविक सस्कृति असते, व त्या सस्कृतीस अनुसरून त्या समाजातील प्रत्येक व्यक्तीची वागणूक कशा तऱ्हेची असावी हेहि ठरलेले असते. या कल्पनाच्या विरुद्ध कृति केल्यास समाजाचा रोष होतो; त्या कृतींना गुन्हा असे सबोधिले जाते. समाजाचा आपल्यावर रोष होईल, या कल्पनेनेच घाबरून काही कृति करण्यास मनुष्य धजत नाही. परस्त्रीसंबधी आकर्षण वाटले तरी सहजासहजी पुरुष तिच्या वाटेस जात नाही. असें असूनहि काही माणसे समाजास न रुचणाऱ्या गोष्टी धाडसाने करण्याचा प्रयत्न करतात; त्याना प्रत्यक्ष शिक्षा करणे समाजास भाग पडतें.

इटॅलिअन् गुन्हेगारशास्त्रतज्ज्ञ लोंब्रोसो याने असा सिद्धांत माडला आहे की गुन्हेगार प्रवृत्ति ही जन्मजात असते. ज्या माणसात ही प्रवृत्ति असतें त्याची शरीररचनाहि विशिष्ट प्रकारची असते. पण लोंब्रोसोचा हा सिद्धांत आता सर्वांनी अमान्य केला आहे. समाजात गुन्हेगार एखाद्या ठराविक जातीत किंवा गटातच निपजतात असे म्हणता येणार नाही काही अस्वाभाविक व विशिष्ट मनोवृत्ति पुष्कळ वेळा गुन्ह्यास प्रवृत्त होतात ही गोष्ट खरी आहे. काही वेळा समाजाकडून होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार म्हणून गुन्हे केले जातात. तर काही वेळा पोट भरण्याचा धंदा म्हणूनच माणसे गुन्हे करतात.

एवढी गोष्ट मात्र खरी की एकदा वाईट कृति केली व ती पचली तर ती पुन्हा पुन्हा करावीशी वाटते. एकदा लहान वयात जर अशा सवयी लागल्या तर पुढे त्या जाणे फार कठिण असते एकदा गुन्हा उघड-कीस येऊन त्याबद्दल शिक्षा झाली की तुरुगातून परत आल्यावर चागल्या लोकात मिसळणेच कठिण सर्व समाजाने अशी असहिष्णु वृत्ति दाखविली की गुन्हेगार प्रवृत्ति परत अधिकच बळावते व वैतागाने मनुष्य वाईट मार्गाकडे वळतो. म्हणून लहानपणीच मुलाच्या गुन्हेगार प्रवृत्तीस आळा घालणे जरूर असते या दृष्टीने लहान मुलात दिमणाऱ्या गुन्हेगार प्रवृत्ति व त्याचे निराकरण हा मानसशास्त्राच्या दृष्टीने फार महत्त्वाचा प्रश्न आहे.

(१) काही गुन्हे अतिसामान्य मनोवृत्ति किवा शरीरबल यामुळे होतात. एखाद्या माणसात उपजतच लैंगिक प्रवृत्ति फार प्रबल असते. त्यामुळे कोणतीहि स्त्री समोर आली की तो असभ्य वर्तन करतो एखाद्या माणसाचे शरीरबल इतके अचाट असते व स्वभाव इतका रागीट असतो की, थोडीहि खोडी सहन न होऊन तो विरुद्ध बाजूवर एकदम तुटून पडतो व त्या माणसाला भयकर दुखापत करतो.

(२) गुन्हेगार-प्रवृत्ति निर्माण होण्यास मनुष्य ज्या समाजात रहात असेल त्या समाजाची सस्कृतिहि कारणीभूत असते. एखाद्या समाजात जो स्वभाव सामान्य समजला जाईल तोच स्वभाव दुसरा समाज असामान्य अगर विकृत म्हणून मानील. अत्यत रागीट व बलवान् मनुष्य मध्ययुगात लोकाना फार आदरणीय, पण आजचे जग त्याला रानटी या सदरात घालील. उत्तम व्यापारी मनुष्यात गुन्हेगारीची सुप्त लक्षणेच असतात असें रशियात मानले जाईल. इतर एखाद्या राष्ट्रात त्या माणसाचा उदो-उदोहि केला जाईल.

मनोवृत्तीतील वैशिष्टय जर अगदी निरुपद्रवी असेल तर समाजाने तिकडे दुर्लक्ष करावें. उदाहरणार्थ समसभोग प्रवृत्ति (Homo-sexuality) किवा अचकट विचकट शिव्या देण्याचा स्वभाव जर असामान्य· शरीर बळामुळे गुन्हे घडत असतील तर त्या माणसाला भरपूर अग-

मेहनतीच्या कामात गुतवावे अगर मुष्टियुद्धासारख्या खेळाची त्यास अभिरुचि लावावी. एकूण स्वभाववैशिष्टयामुळे निर्माण झालेल्या गुन्हेगार-प्रवृत्तीस चागल्या दिशेने वळविण्याचा प्रयत्न करणे हेच इष्ट होय.

(३) शिस्त लावण्याचा फाजील प्रयत्नहि काही वेळा मुलात गुन्हेगार-प्रवृत्ति निर्माण करतो सिनेमा पाहण्याची मुलाला पूर्ण बदी केल्यास मुलाला चोरून पैसे घेऊन सिनेमा पाहवासा वाटेल त्याचप्रमाणे खाण्याबाबतहि फार कडकपणा दाखविल्यास मुले चोरून खाण्याचा प्रयत्न करू लागतात.

(४) भोवतालच्या माणसाचे अनुकरण करण्याच्या प्रवृत्तीतूनहि मुलाला गुन्हे करण्याची सवय लागते आई किंवा बाप गुन्हेगार असल्यास मुलाला त्याचेपासून शक्यतो दूर ठेवणे चागले. मित्राच्या सगतीनेहि मुलात गुन्हेगारप्रवृत्ति वाढते

गुन्हेगाराचा मोठा सुधारक म्हणून प्रसिद्ध असलेल्या होमर् लेन्चे म्हणणे असे की पुष्कळशा गुन्ह्याचे मूळ अधिकाऱ्याबद्दल वाटणाऱ्या शत्रुत्वाच्या भावनेत असते ही द्वेषाची भावना लहान मुलात उत्पन्न करण्यास आईबापहि कारणीभूत होतात अतिशय धाकात मुलाला वाढविण्याचा प्रयत्न केल्यास मुलाला हळूहळू आईबापाचा राग येऊ लागतो उघडउघड ज्या गोष्टी करता येणार नाहीत त्या चोरून करण्याकडे त्याची प्रवृत्ति झुकू लागते प्रथम आईबापाबद्दल निर्माण झालेला हा द्वेष पुढे प्रत्येक अधिकारी व्यक्तीबद्दल वाटू लागतो व पुढे हा द्वेष सर्व कायदा व अमलबजावणी या खात्याबद्दलच वाटू लागतो

बालगुन्हेगारासाठी हल्ली सुधारशाळा (Reformatory schools) काढण्यात आलेल्या आहेत तेथे मूल जितके अधिक आडदाड असेल तितके अधिक जबाबदारीचे काम त्याला देण्यात येते. यामुळे त्याच्या उच्छृखल मनोवृत्तीस आपोआपच आळा बसतो या शाळामध्ये काही काल ठेवल्यास मुले खूपच सुधारतात असा आतापर्यतचा अनुभव आहे. प्रथम जी मुले अत्यत वाह्यात व बडखोर प्रवृत्तीचीं असतात ती पुढे अत्यत शात व समजस झालेली दिसून येतात याबाबत होमर् लेन्ने बालगुन्हेगारा-

साठी चालू केलेली 'बाल-राज्य' (Little Commonwealth) ही संस्था आदर्श म्हणून सुप्रसिद्ध आहे

गुन्हा केला की शिक्षा करण्याची पद्धत सर्व कालात व सर्व देशात आढळून येते कोणत्याहि गुन्ह्यास शिक्षा करण्याचे मागे तीन प्रकारचे हेतु असू शकतात (१) गुन्हेगाराची सुधारणा करणे. (२) शिक्षा करून गुन्हेगाराला व समाजाला अशी दहशत बसवावयाची की तसा गुन्हा परत करण्यास कोणी धजू नये (३) शिक्षेचा हेतु पुष्कळ वेळा सूड उगविणे किंवा नुकसान-भरपाई करून घेणे हाहि असतो वरील तीन्ही हेतूंपैकी तिसरा हेतु सर्वांत जास्त हीन व टाकाऊ आहे. ठोशास ठोसा या तत्त्वाला धरून अशी शिक्षा दिली जाते पण त्यामुळे समाजातील गुन्हेगार-प्रवृत्ति नाहीशी होणे शक्य नाही. दुसऱ्या व तिसऱ्या हेतूत पुष्कळ-वेळा निकट संबंध येतो. कारण या दोन्ही हेतूंनी केलेल्या शिक्षा वाटेल तितक्या क्रूर असू शकतात शिक्षा जितकी अधिक क्रूर तितकी ती गुन्हे-गाराची सुधारणा करण्यास निरुपयोगी ठरते. शिक्षेत सूडबुद्धि केव्हाहि असता कामा नये. दहशत घालून एखाद्या गुन्ह्यापासून समाजाला परा-वृत्त करणे हे काही वेळा जरूर असते हे खरे, पण त्याहूनहि उच्च हेतु म्हणजे गुन्हेगाराला पुन्हा सन्मार्गावर आणणे हा होय. अर्थात् सुधारणा करणे हा एकच शिक्षेचा हेतु डोळ्यापुढे ठेवल्यास गुन्हेगारी-प्रवृत्ति अगदी लहान वयात उघडकीस आली पाहिजे. वाईट सवयी एकदा पक्क्या झाल्या-वर मोठेपणी त्या सुधारणे फार बिकट असते

गुन्हेगार मुलगा जर रिकामटेकडा व उनाडटप्पू असेल तर त्याला कारखान्यासारख्या ठिकाणी भरपूर अंगमेहनतीचे काम द्यावे. जर मुलांत एखादी अस्वाभाविक मूलप्रवृत्ति आढळली तर एखाद्या मनोविश्लेषण-शास्त्रज्ञाकडून त्याची परीक्षा करून घेऊन त्याला मानसोपचार करून पहावेत. त्याच्या भोवतालचे वातावरण बदलून पहावे. अशा निरनिराळ्या प्रकारांनी गुन्हेगार-प्रवृत्ति घालविण्याचा प्रयत्न करून पहावा. योग्य तेवढी करडी नजर ठेवून बाकीच्या बाबतीत मुलाला प्रेमळपणें वागवावें व मोकळेपणे वागू द्यावे. होमर् लेन्चे 'बालराज्य' स्वयंशासित तत्त्वा-वरच आधारलेले आहे. तेथील सर्व व्यवस्था मुलेच पाहतात. मुलांवर जबाब-

दारी व विश्वास टाकल्यास तीं कामात कुचराई व आळस मुळीच करीत नाहीत, असा होमर् लेन्ला अनुभव आला. मोठ्या माणसांच्या एका तुरुंगातहि रशियामध्ये एकदा असाच प्रयोग करून पाहण्यांत आला, तेव्हा त्यांतहि पुष्कळ यश आलें.

गुन्हेगाराचा द्वेष करून त्याच्याबद्दल सूडबुद्धि बाळगण्यापेक्षा त्याच्यावर प्रेम केल्यास तो सुधारण्याचा अधिक संभव असतो. ही गोष्ट आतापर्यंत केलेल्या सर्व प्रयोगात सिद्ध झाली आहे. गेल्या काही वर्षांत सर्व देशातील तुरुगात गुन्हेगाराना वागविण्याची पद्धत खूपच बदलली आहे. सुधारणा हा एकच उद्देश पुढे ठेवन तुरुंगाची रचना करावी याबद्दल कोठेहि दुमत नाही. मानसशास्त्रदृष्टया प्रत्येक गुन्हेगार म्हणजे मानसिक विकृति झालेला रोगी आहे असेच मानले पाहिजे.



प्रकरण २२ वें

# सामाजिक आचरण-प्रवृत्ति

**Social Behaviour Tendencies.**



सर्वसामान्यत' असे दिसून येते की माणूस इतर माणसाच्या सह-वासात सतत राहूं इच्छितो. काही व्यक्ति एकमेकाबद्दल आपलेपणा वाटून गट तयार करतात. ज्याच्याबद्दल व्यक्तीला द्वेष वाटतो, त्याच्यापासून दूर राहण्याचा ती प्रयत्न करीत असते हॉब्स्च्या मते दुसऱ्याचा द्वेष करणे हीच प्रत्येक माणसाची मूलप्रवृत्ति असते. मनुष्य सहाकार्यवृत्तीने गट करून राहतो, तो केवळ स्वसरक्षणासाठी व अधिकाऱ्याकडून होणाऱ्या शिक्षेच्या भीतीने

क्रोपोट्किन्च्या मते सहकार्य व गट तयार करून राहण्याची प्रवृत्ति माणसाने खालच्या प्राण्यापासूनच घेतली असून ती स्वाभाविक आहे. कांहीच्या मते माणसातील सर्व सामाजिक प्रवृत्तीचा उगम सघप्रवृत्ती-मधूनच झालेला आहे. निरीक्षणाअन्ती असे दिसून येते की मनुष्याच्या सामाजिक प्रवृत्ति या त्याच्या विशिष्ट मानसिक घडणीवरच अवलबून आहेत. प्राण्यामध्येसुद्धा सर्व प्राणी सघप्रिय असत नाहीत पण विकास-वादाच्या दृष्टीने मनुष्याच्या जवळचे प्राणी शिपाझी, गोरिला वगैरे मात्र कळप करूनच राहताना दिसतात. या प्राण्याना कळपातून काढून एकटे ठेवल्यास एक प्रकारची अस्वस्थता वाटते व काही प्राणी एकटे राहिल्यास झुरून मरतात मनुष्य प्राण्यातहि कळप करून राहण्याची वृत्ति थोडयाफार प्रमाणात उपजतच असते, हे नाकबूल करता येणार नाही. पण त्याच्या सामाजिक वर्तनाचें स्पष्टीकरण करण्यास ही एकच

प्रवृत्ति पुरेशी नाही. कारण मनुष्य नुसते कळप नव्हे तर हजारों वर्षे टिकणारे समाज निर्माण करतो. या सामाजिक इमारती टिकाऊ करण्यासाठी धर्मतत्त्वें, नीतितत्त्वें वगैरेसारख्या तत्त्वांच्या अभेद्य भितीहि तो उभारतो. समाज टिकविण्यासाठी शेकडो व्यक्ति आपले प्राणसुद्धा खर्ची घालण्यास तयार होतात.

मधमाशी अगर मुगी याच्यामध्येहि अतिशय गुतागुतीचे सामाजिक जीवन असलेलें आढळून येते मुग्यात, एकच मुगीपासून निर्माण झालेल्या असख्य मुंग्या एक गट करून राहतात. या गटातील मुग्या शरीर-रचनेनुसार निरनिराळी कामे करताना दिसतात त्यात काही मुग्या गुलाम व काही मालक गणल्या जातात. या सर्व साम्यावरून मुग्याच्या सामाजिक जीवनाची माणसाच्या सामाजिक जीवनाशी तुलना करणे बरोबर होणार नाही. कारण मुग्याचे सर्व जीवन फक्त सहजप्रवृत्तीवरच अवलंबन असते. त्यात वाढहि होत नाही व फरकहि होत नाही. पण माणसाजवळ जन्मतः फक्त ठोकळ मानसिक घडण असते व गुतागुतीचे सर्व सामाजिक जीवन त्याने बुद्धीच्या साहाय्याने निर्माण केलेलें असते.

सामाजिक जीवनाशी व्यक्तीला समरस करणाऱ्या पुष्कळ वृत्ति आहेत उदाहरणार्थ, दुसऱ्याच्या विचाराच्या व मताच्या आहारी जाणे (सूचना ग्रहणवृत्ति) दुसऱ्याच्या भावनाच्या आहारी जाणे (महानुभववृत्ति) व दुसऱ्याची कृति पाहून तशीच कृति करण्याची आपल्यात इच्छा निर्माण होणे (अनुकरण-वृत्ति), इतर सर्व व्यक्ति ज्या मार्गाने जात असतील त्या मार्गाच्या विरुद्ध जाण्याची व्यक्तीला भीति वाटणे प्रत्येक व्यक्तीत वरील सर्व प्रवृत्ति ज्या प्रमाणांत असतील त्या प्रमाणात तिचे सामाजिक जीवन अधिक सफल होईल या निरनिराळ्या जन्मजात वृत्तीमुळेच मनुष्याला समाजप्रिय प्राणी असे सबोधण्यात येते. कोणत्याहि लोकाचे सामाजिक जीवन कशा तऱ्हेचे आहे हे सागण्यासाठी फक्त निरनिराळ्या वृत्तिच घेऊन भागणार नाही; तर भौगोलिक व आर्थिक परिस्थिति व शिक्षणाने निर्माण केलेली सस्कृति, या गोष्टीहि सामाजिक जीवनाचा ओघ ठरवीत असतात

**सूचनाग्रहणवृत्ति** —हीबद्दलचे विवेचन "नैसर्गिक सामाजिक वृत्ति' या प्रकरणात मागे आले आहे. ही वृत्ति पुष्कळ वेळां खूप व्यक्तींना

एका केन्द्राभोवती लवकर आणूं शकते. व्यवहारांत सामान्य मनुष्य पुष्कळशा गोष्टी सूचनेनेच करूं शकतो. उदाहरणार्थ, भडक जाहिरात पाहून वस्तु विकत घेण्याची इच्छा होणें किंवा अतिशय प्रचारामुळे एखादी राजकीय विचारप्रणाली आपणाला पटू लागणें.

सूचना परिणामकारक होण्यास तीन गोष्टीची जरुरी असते. ( १ ) विश्वास उत्पन्न होणारा आवाज. ( २) सूचना देणाऱ्याच्या ठिकाणी असणारी प्रतिष्ठा व ( ३ ) पुनरावृत्ति. सूचनाग्रहणवृत्तीमुळेच मनुष्य समाजाच्या मताशीं चटकन् सहमत होतो. त्याने स्वतः विचार करून ठरविलेल्या मतांबद्दलहि त्याला इतकी खात्री नसते. निरनिराळ्या रूढि, पद्धति, चालीरीती, काडीचाहि विचार न करता मनुष्य मानतो; याचेहि कारण सूचनाग्रहणवृत्ति हेंच होय. सामाजिक सातत्य टिकविण्यासाठी निरनिराळ्या व्यक्तीच्या जीवनांत व वागणुकीत एकसूत्रीपणा आणण्याच्या कामी सूचनाग्राहकता फार साहाय्यक होते. सूचनाग्रहणवृत्तीप्रमाणेच व्यक्तींत स्वतःचें अस्तित्व प्रस्थापित करण्याची वृत्तीहि असते. त्यामुळे सूचना देणारा जर अनियत्रित प्रभुत्व गाजवू पाहील तर त्याने दिलेल्या सूचने-विरुद्ध कृति करण्याचीच वृत्ति अधिक बलवत्तर होते. यालाच विरुद्ध सूचना असें म्हणतात. प्रत्येक माणसात सूचनाग्रहणवृत्ति सारख्याच प्रमाणांत नसते. आज्ञापालनाबद्दल लहानपणापासून अतिशय कटाक्ष ठेवला तर सूचनाग्रहणवृत्ति वाढत जाते. सामान्यतः सैनिकी पेशाच्या माणसात ही वृत्ति फार असते. सर्व सैनिकात सूचनाग्राहकत्व जितके अधिक तितकी सर्वांची मिळून होणारी प्रतिक्रिया अधिक सुसूत्र व परिणामकारक होते. मॅग्डूगल्च्या शब्दात सागावयाचे झाल्यास "सूचना म्हणजे विचार-स्वीकार व सहानुभव म्हणजे भावनास्वीकार." समाजांत सहानुभव जितका अधिक तितकी त्या समाजाची दृढताहि अधिक. एका व्यक्तीचा अपमान झाल्यास सर्वांना राग येणें किंवा एका व्यक्तीला आनंद झाल्यास सर्वांना आनंद होणें यालाच सहानुभववृत्ति असें म्हणतात.

अनुकरणामुळे समाजांत निरनिराळ्या फॅशन्स्, रीति, रूढि, गणवेष वगैरे गोष्टी दिसून येतात. सूचनाग्रहण, सहानुभव व अनुकरण यांखेरीज

आणखीहि काही सामाजिक वृत्ति प्रत्येक व्यक्तींत दिसून येतात. त्या खालीलप्रमाणे :-

(१) **मूलगत बंधुभाव** (Primitive comradeship) :—समान स्वभावाच्या अगर प्रवृत्तीच्या माणसांना वाटणारे एकमेकांबद्दलचें नैसर्गिक आकर्षण. यामुळे सामाजिक दृढता वाढण्यास मदतच होते. सर्व कामगार एकत्र येतात. सर्व दरिद्री एकत्र येतात. या सघटना "समानशीलव्यसनेषु सख्यम्" हेच सिद्ध करतात.

(२) **श्रेष्ठत्व वृत्ति** (Assertive tendency) :—दुसऱ्यावर प्रभुत्व गाजवावे अशी इच्छा प्रत्येक व्यक्ति करीत असते. अर्थात् सत्ता चालवून घेणाऱ्या इतर अनेक व्यक्ति भोवती गोळा केल्याखेरीज प्रभुत्व कोणावर गाजविणार ?

(३) **नम्रत्व वृत्ति** (Polite tendency) :—सत्ता गाजविणे याप्रमाणेच विनम्रपणे दुसऱ्याची सत्ता मान्य करणें हीहि एक उपजत वृत्ति आहे. शेकडो सामान्य माणसाना स्वतः विचार करून प्रत्येक वेळी जबाबदारीने निर्णय घेण्यापेक्षा लोकानी सागितलेले ऐकणेच परवडतें. स्वतंत्र धद्यापेक्षा नोकरी बरी असें म्हणणारे फार लोक आढळतात ते या प्रवृत्तीमुळेच

(४) **संसक्ति** (Tendency to conservation) :—एकदा अनुभवलेल्या गोष्टींचा चागला परिणाम दिसून आल्यास ती गोष्ट सोडण्यास मनुष्य सहसा तयार होत नाही माणसाच्या या प्रवृत्तीमुळेच समाजाची एक स्थिर घडी शेकडो वर्षे राहू शकते.

(५) **विधायक सामाजिक वृत्ति** (Social Constructive Tendency) :— व्यक्तीपुरतेच जीवन मर्यादित करण्यापेक्षा त्याचा विस्तार अनेक व्यक्तीच्या जीवनापर्यंत नेऊन पोंचविण्याची एक वृत्ति माणसांत असते. निरनिराळ्या धार्मिक व सामाजिक संघटना तयार करून त्याच्या हितासाठीच आपले सर्व जीवन व्यतीत करणारे लोक कितीतरी असतात.

**समूहाचें वर्तन** (Crowd behaviour) :—पुष्कळशा व्यक्ति एकत्र जमून कांही सामुदायिक प्रतिक्रिया करण्याचे प्रसंग समाजाच्या

दैनदिन आयुष्यक्रमात नेहमीच येत असतात निरनिराळ्या प्रसगी शेकडो व्यक्ति एकत्र येऊन जे समूह तयार होतात त्याच्या वर्तनाचे निरीक्षण केल्यास त्यात खालील वैशिष्टचें दिसून येतात —

(१) समूहात अगर जमावात असताना व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व फारसे जागृत नसते सबध समूहाला प्रेरणा देणारी जी एक प्रमुख भावना असते तिच्याशी समूहातील व्यक्ति इतक्या एकरूप होऊन जातात की, तात्पुरते त्या स्वत चे स्वतत्र व्यक्तिमत्त्व पार विसरून जातात. व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व अस्पष्ट होण्यास समूहाचे दडपण हेहि एक कारण असते.

(२) उघड्या मैदानावरील जमाव व एखाद्या सभागृहातील समूह यात फरक असतो उघड्या मैदानावरील जमावात जबाबदारीची भावना फार कमी असते म्हणून अशा जमावात गडबड किवा गोधळ होण्याचा सभव अधिक असतो उलट सभागृहात अगर नाटकगृहात जमलेल्या समहात सयुक्त जबाबदारी जरा अधिक प्रमाणात असते

(३) कोणत्याहि जमावात सूचनाग्रहणवृत्ति फार मोठ्या प्रमाणावर असलेली दिसते. कारण जमाव हा भावनेच्या पातळीवर एकत्र आलेला असल्याने त्या प्रमुख भावनेच्या अनुरोधाने येणाऱ्या सूचना ताबडतोब ग्रहण केल्या जातात विचारापेक्षा विकारच पुष्कळ व्यक्तीना अधिक लवकर एकत्र आणू शकतो भावना जितकी अधिक उत्तेजक तितका विचार जास्त कमकुवत

(४) एकाच भावनेने भारलेला समूह फार आज्ञाधारक असतो व अशा जमावाकडून वाटेल तो अत्याचार घडवून आणणे सहजासहजी शक्य असते

(५) काही व्यक्ति जमावात असूनहि जमावाच्या भावनेशी लवकर समरस होऊ शकत नाहीत अतिशय हुशार व स्वतत्र बुद्धीचा मनुष्य जमावाच्या भावनेशीं लवकर एकरूप होऊ शकत नाही किवा जी माणसे अत्यत भावनाप्रधान व डोकेफिरू असतात त्यानाहि जमावाच्या भावनेशीं एकरूप होणें कठिण असते. अतिशय अप्रबुद्ध माणूसहि जमावाशी लवकर एकरूप होऊ शकत नाही.

(६) शेकडो सामान्य व्यक्ति एकत्र येऊन जो जमाव तयार होतो त्या जमावाचा बुध्यंक सुमारे २० ते २५ इतका असतो.

(७) व्यक्तीच्या नैतिक पातळीपेक्षा जमावाची नैतिक पातळीहि बरीच खालच्या दर्जाची असणे संभवते. एखाद्या ठिकाणी बरीच माणसे जमून जर लुटालूट करीत असतील तर सभ्य माणसे सुद्धा त्यात हाताला लागेल ते घेण्याचे धाडस करू शकतात.

(८) जी व्यक्ति समाजाचे पुढारीपण चटकन् घेऊ शकते तीच व्यक्ति समाजाच्या रोषालाहि तितक्याच लवकर बळी पडते. इतिहासात अशी कित्येक उदाहरणे आहेत की, ज्या व्यक्ति समाजात एका काळी अत्यंत लोकप्रिय होत्या त्याना थोड्या कारणावरून सुद्धा समाजाने पायाखाली तुडवून टाकण्यास कमी केले नाही

(९) जमाव हा क्षणभंगुर असतो. कारण जमावाची बैठक विकारावर आधारलेली असल्याने व विकाराची तीव्रता फार काल राहू न शकल्याने जमावाचे एकरूपहि फार काल टिकू शकत नाही

(१०) जमावाच्या कृतीचे हेतु बदलण्यास क्षुल्लक कारणहि पुरेसें होतें.

(११) भडक रंगात रंगविलेल्या घटनाकडे जमावाचे लक्ष अधिक लवकर वेधते

(१२) कोणत्याहि तऱ्हेचे नकारात्मक निर्णय जमावाकडून मान्य करून घेणे अधिक सोपे असते एखादी कृति करण्याची जबाबदारी मात्र जमाव लवकर मान्य करीत नाही

सूचनाग्रहणाप्रमाणेच अनुकरण आणि सहानुभूति या वृत्तीचाहि जोर समूहात फार मोठ्या प्रमाणात असलेला दिसून येतो ज्या भावना व्यक्ति एकटेपणाने सहजासहजी व्यक्त करू शकत नाही, अथवा जी कृति एखाद्या व्यक्तीकरवी होत नाही ती भावना जमावाकरवी व्यक्त होऊं शकते अगर कृतीचेहि निर्बंध कमी होतात, पुष्कळदा सार्वजनिक संस्थाचे निर्णय हास्यास्पद होतात. याचे कारणहि सभासदास आपली व्यक्तिगत बुद्धि बाजूला सारून जमावाच्या आहारी जावे लागते हेच होय. योग्य नेत्याचे अभावी जमाव वाटेल ती अघोर कृत्ये करण्यास तयार होतो.

आतापर्यंत अनिबंध जमावाच्या आचारणासंबंधानें आपण विचार केला; पण या प्रश्नाला दुसरीहि एक बाजू आहे. ती ध्यानांत आली म्हणजे लोक-समुदायाचे आचरण नेहमी अविचारी असतें, असें म्हणता येणार नाही. कोणत्याहि समूहाचे अनेकविध प्रकार पाडता येतात. जमाव हा जो प्रकार वर वर्णिलेला आहे तो समूहाचा अगदी कनिष्ठ प्रकार होय. यात काही तापुरत्या कार्यासाठी लोक एकत्र येतात, एखाद्या माथेफिरूच्या आहारी जातात, काहीतरी करणी करतात व नंतर जमाव पांगून व्यक्ति आपा-पल्या वाटेने निघून जातात. जमावाचे विचार, आचार, उच्चार क्षणिक असतात. एखाद्या लहान मुलासारखी जमावाची अवस्था असते. मनांत आले, टाकलें करून! त्याचा परिणाम काय होईल, याचा विचार कोण करतो?

लोकसमुदायाचा दुसरा प्रकार म्हणजे लहान लहान गट करून राह-ण्याचा. जमाव व लहान गट यात फरक असा की, जमाव हा एखाद्या क्षणजीवी भावनेवर आधारलेला असतो; उलट गटांतील सदस्य एकत्र येतात याचे कारण त्याना एकत्र आणणारें काहीतरी जोरदार सामुदायिक हितकारक बंधन असतें. त्या गटापुढे कांहीतरी सामाजिक ध्येय असतें. जमावापेक्षा या गटाचे जीवन अधिक दीर्घ असते. यापुढील प्रकार म्हणजे जाति अगर समाज. फार मोठ्या व्यापक अशा बंधनाने या प्रकारांत लोक एकत्र येतात. त्याची एकजूट कायमची पिढ्यान् पिढ्या चालणारी असते. समाजाच्या साहाय्यानेच व्यक्तीचा पूर्ण विकास व्हावयाचा असतो, आयु-ष्यांतील ध्येय गाठावयाचे असते. अनेक समाजानी अगर जातीनी एकत्र बनलेला गट म्हणजे राष्ट्र होय. राष्ट्रीयता यांतील अर्थ आता आपल्या ध्यानात येईल. विशिष्ट राष्ट्रातील लोकात विशिष्ट परंपरा निर्माण होते. त्यामुळे प्रत्येक घटकाची विशिष्ट मनोवृत्ति बनते. प्रत्येक व्यक्तीच्या आचारात, विचारांत व उच्चारात एक प्रकारचा सुसूत्रपणा येतो.

जमाव, गट, समाज, राष्ट्र या चढत्या श्रेणीच्या लोकसमहाचें विवेचन केल्यावर आपणांपुढे साहजिकच असा प्रश्न उभा राहातो की, व्यक्ति-मना-हून निराळें असें सामुदायिक मन म्हणून स्वतंत्र वस्तु मानावयाची का? वैयक्तिक आचार, विकार, विचार हे सामुदायिक आचार-विकार-विचाराहून

वेगळे असतात ? प्रत्येक व्यक्तीच्या आचार–विकार–विचाराना जसे व्यक्तीचे मन कारणीभूत होते, तसेच समुदायाच्या बाबतीत सामुदायिक मन मानावे का ? प्रश्न बिकट खरा; पण त्याचे उत्तर देताच येत नाही असे नाही मनाची व्याख्या हेतुगर्भ शक्तीची एक सुसंघटित रचना अशी केली, तर जमावाच्या बाबतीत मनाला ही व्याख्या लागू पडत नाही पण गटाच्या बाबतीत अगर समाजाच्या बाबतीत आचार-विचाराच्या मागे एखादी संघटित शक्ति व जोरदार हेतु असावा हे निश्चित प्रत्येक सुसंघटित समाजाला स्वतःची म्हणून परपरा, स्वत चें असे वैशिष्टय इत्यादीची पूर्ण जाणीव असल्याचे दिसून येते. म्हणून तर आपल्या बोलण्यात " समाज काय म्हणेल ? राष्ट्राचे असे मत आहे, आपली राष्ट्रीय परंपरा अशी आहे" इत्यादि विधाने नेहमी येतात

मात्र सामुदायिक मन म्हणजे त्या समुदायातील प्रत्येक व्यक्तीच्या मनाची गोळाबेरीज नव्हे या दोन्हीतील सबध वाटतो तितका सोपा नाही

श्रीखडातील दही, साखर, केशर इत्यादि प्रत्येक घटक आपणाला माहीत असतो परतु या सर्व घटकाच्या एकत्रीकरणाने ज्याप्रमाणे श्रीखड हा निराळा व स्वतत्र पदार्थ निर्माण होतो, त्याचे गुणधर्म त्याच्या घटकातील प्रत्येकाच्या गुणधर्माहून वेगळे असतात तीच गोष्ट सामुदायिक मन व त्याचे घटक याची असते मात्र या सामुदायिक मनाच्या व्यापारात समुदायाच्या पुढाऱ्याचा फार मोठा भाग असतो. पुढारी मनाने जेवढा उन्नत तेवढाच तो समुदाय मानवजातीला उपकारक ठरेल या उलट पुढाऱ्याच्या नादान वर्तनाने तो समुदाय लोकाचे अहित करण्यालाहि तयार होईल

अगदी पुरातन काळापासून आताच्या क्षणापर्यंत मानवी समाजाची उन्नति करण्याचा प्रयत्न असामान्य विभूतीकडून होत आहे अधूनमधून हिटलर, मुसोलिनी यासारखे तामसी वृत्तीचे पुढारी मानवी समाजाची प्रगति थाबविण्याला कारणीभूत होतात हे खरे; पण विकासवादाच्या दृष्टीने विचार करता हे केवळ मधले अडथळे होत. मानवी जीवनाचा विकास 'अनिबंध रीतीने चालूच राहणार.

---

## प्रकरण २३ वें

# मानसशास्त्रांतील आधुनिक मतप्रणालींची पार्श्वभूमि



गेल्या शतकात मानसशास्त्राचा प्रान कितीतरी विस्तृत झाला आहे. शरीरशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, शिक्षणशास्त्र यांच्याशी मानसशास्त्राचा सबध जास्त जास्त निगडित होत असून गेल्या तीस वर्षांत मानसशास्त्राचा विषय व अभ्यासपद्धति याबद्दलहि निरनिराळे दृष्टिकोन पुढे माडले जात आहेत या दृष्टिकोनातूनच निरनिराळ्या मतप्रणाली निर्माण होत आहेत या मतप्रणालीत मानसशास्त्राने काय सागावे व ते कशा पद्धतीने सागावें या दोन्ही मुद्द्याबाबत वेगवेगळी मते आहेत एक गोष्ट मात्र निःसंशय खरी की, मानसशास्त्र यापुढे तत्त्वज्ञानाचा एक भाग म्हणून राहणार नाहीच, त्याचे स्वरूप जास्त स्वतंत्र व वैज्ञानिक असे झालेले दिसून येईल

आधुनिक काळातील निरनिराळ्या मतप्रणालीचा दृष्टिकोन समजावून घेण्यापूर्वी या मतप्रणाली निर्माण होण्यास कोणती पार्श्वभूमि कारणीभूत झाली त्याचा विचार अगोदर करणे भाग आहे सर्व आधुनिक विचारवतानी जुन्या मानसशास्त्राविरुद्ध बडाचे निशाण उभारले तुलनात्मक दृष्टीने पाहिल्यास आधुनिक विचारप्रवाह १९ व्या शतकातील मानसशास्त्रीय सिद्धान्तात क्रान्ति करीत आहेत पण १९ व्या शतकातील मानसशास्त्र त्याहून जुन्या तत्त्वज्ञाना तसेच क्रान्तिकारक वाटत होते १७ व्या शतकांत महत्त्वाची क्रान्ति घडवून आणणाऱ्या मुख्य व्यक्ति म्हणजे दकार्त् व हॉब्स् ह्या होत.

१९ व्या शतकाच्या सुरवातीस मानसशास्त्रांत 'मानसिक शक्ती'चे (Faculties) महत्त्व अतिशय वाढलेले होतें, पण या मानसिक शक्तीचे समाधानकारक स्पष्टीकरण मात्र कोणताच मानसशास्त्रज्ञ करू शकत नसे. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, १९ व्या शतकातील मानसशास्त्राचा शरीरशास्त्राशी व प्राण्याच्या प्रत्यक्ष वर्तनाशी फारच थोडा संबंध होता. वेदन, कल्पना, स्मृति वगैरे कार्ये संपूर्णतया मानसिक आहेत. त्यात शरीरातील ज्ञानतंतूचा अथवा मेंदूचा काही विशेष संबंध नाही अशी १९ व्या शतकातील मानसशास्त्रज्ञाची समजूत होती पण गेल्या काही वर्षांत या सर्व समजुती चुकीच्या ठरल्या आहेत.

## आधुनिक मानसशास्त्राची सुरुवात

आधुनिक मानसशास्त्रज्ञानी शरीर व मन याच्यात एकात्मता आणण्याचा प्रथमच प्रयत्न केला असे मात्र म्हणता यावयाचे नाही कारण पूर्वी गॅलिलिओने सर्वच भौतिक घडामोडी गति व स्थितिस्थापकता या दोन तत्त्वानी स्पष्ट करता येतील असा सिद्धात माडला आहे. दकार्तने सर्व प्राण्याचे वर्तन पदार्थविज्ञानशास्त्राच्या साहाय्याने स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला त्याच्या मते सापेक्ष प्रतिक्षेप हाच सर्व सजीव प्राण्याच्या वर्तनाचा पाया व आदर्श आहे असे मानता येईल, आत्मा हा मेंदूत असतो व खालच्या दर्जाच्या प्राण्याना आत्माच नसतो, असें त्यानें म्हटलें आहे. हॉब्स् याहिपुढे एक पाऊल गेला. त्याच्या मते सर्व मानसिक व शारीरिक क्रिया गतीच्या आधाराने उलगडून दाखविता येतील हॉब्स्च्या या सिद्धान्ताने शक्तिवादी मानसशास्त्राला (Faculty Psychology) चागलाच धक्का बसला पण हॉब्स्ने आपल्या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण पूर्ण केलेले नाही. म्हणून हे कार्य अपुरे राहिले.

मानसशास्त्राच्या दृष्टीने शक्तिवादी मानसशास्त्राच्या पुढची पायरी म्हणजे साहचर्यवाद ( Associationistic Psychology ) ही होय. १८ व्या शतकात व १९ व्या शतकाची पहिली काही वर्षे साहचर्यवादाने मानसशास्त्रावर बराच पगडा बसविला होता. मेंदूमध्ये तयार झालेल्या साहचर्याच्या आधाराने सर्वच मानसिक क्रियाचे स्पष्टीकरण करता

येईल असें या वादाच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें होतें. भीति, उपरोध, सहानूभूति वगैरे मुलाच्या मनात पक्के झालेले भाव, त्याच्या सान्निध्यांत आलेल्या निरनिराळ्या वस्तु व व्यक्ति याच्या साहाय्यानेच स्पष्ट करतां येतात. साहचर्याचे सामान्य नियम शोधून काढून या लोकानी असा एक सिद्धान्त सागितला की, जेव्हा अनेकविध कल्पना एकत्र येतात किंवा पुनरावृत्त होतात तेव्हा त्या वेळच्या अनुभवाचे साहचर्य मुख्यतः पौनःपुन्य, अचिरत्व व स्पष्टत्व या तीन गुणानुरूप कमीअधिक होत असतें.

## १९ व्या शतकांतील मानसशास्त्र

१९ व्या शतकाच्या सुरवातीला आणखी दोन नवीन शास्त्राचा परिणाम मानसशास्त्रावर होऊ लागला होता व ती म्हणजे (१) रसायनशास्त्र (Chemistry) व (२) शरीरशास्त्र (Physiology). रसायनशास्त्रातील सयुक्त पदार्थांचे पृथक्करण करून त्यांचे मूलघटक शोधून काढणारी पद्धति अनुभवाचे पृथक्करण करण्यास व त्याने मूलघटक शोधून काढण्यास उपयोगी पडेल अशी कल्पना काही मानसशास्त्रज्ञाना सुचली व यातूनच मानस-रसायनशास्त्राची कल्पना उदयास आली.

शरीरशास्त्राचा मानसशास्त्रावर झालेला परिणाम याहिपेक्षा निर्णायक स्वरूपाचा होता. याचा उघड पुरावा म्हणजे मानसशास्त्रात प्रयोगपद्धतीस सुरवात. शरीरशास्त्राच्या प्रयोगशाळेवरूनच मानसशास्त्राच्या प्रयोगशाळेची कल्पना निघाली इ स १८७९ मध्ये वुढ्टने अशा तऱ्हेची पहिली मानसशास्त्रीय प्रयोगशाळा लिप्झिक् येथे स्थापन केली. यानंतर लवकरच अन्यत्र पुष्कळ ठिकाणीहि अशा तऱ्हेच्या प्रयोगशाळा स्थापन झाल्या व १९ व्या शतकातील मानमशास्त्राचे स्वरूप 'प्रायोगिक मानसशास्त्र' असे झाले. यापूर्वी सर्व मानसशास्त्रीय सिद्धान्त स्मृति व सामान्य अनुभव याच्याच साहाय्याने निर्णीत केले जात; पण यानतर असे प्रतिपादन करण्यांत येऊ लागले की परिस्थिति नियंत्रित करून शास्त्रीय पद्धतीने निरीक्षण केल्याखेरीज कोणताहि मानसशास्त्रीय सिद्धान्त काढणे चुकीचें होईल.

याच शतकांत आणखीहि दोन नवीन शास्त्रें मानसशास्त्राचें स्वरूप बदलण्यास कारणीभूत होत होतीं. सर्वसामान्य जीवशास्त्र (General

Biology) व विशेषतः विकासवाद याच्या सिद्धाताच्या अनुरोधाने मानसशास्त्राचे क्षेत्रहि खूपच वाढले. सहजप्रवृत्तीचा विकास, अनुवंश, परिस्थिति व शिक्षण यामुळे प्राण्यात होणारा मानसिक फरक, मुलाचे मानसशास्त्र, प्राण्याच्या वर्तनाच्या निरीक्षणावरून त्याच्यासबधी तयार केलेले मानसशास्त्रीय सिद्धान्त वगैरे कितीतरी नवीन प्रात मानसशास्त्रास खुले झाले. डार्विन् व गॅल्टन् याच्या लेखनाने मानसशास्त्रावर प्राणिशास्त्र (Zoology) व मानवशास्त्र (Anthrology) या दोन शास्त्राचा पगडा अधिकाधिक बसत चालला.

१९ व्या शतकातील मानसशास्त्रावर परिणाम करणारें आणखी एक शास्त्र म्हणजे मानसोपचारशास्त्र (Psychiatry) हे होय असामान्य मनाचे, विकृत मनाचे, अपूर्ण वाढ झालेल्या मनाचे शास्त्रीय पृथक्करण करून, त्याना मानसोपचार करण्याचे तत्रहि शास्त्रज्ञानी बसविले व यामुळे मानसशास्त्रांत सामान्याबरोबरच असामान्य मन या भागाचा समावेश करण्यात आला. मानसोपचारशास्त्रात पुढे दोन भाग पडले. एक मानसिक विकृतीचे कारण इतर मनोव्यापारातच सापडेल असे म्हणणारा मानसवादी (Psychic) गट व दुसरा मानसिक विकृतीचे कारण मेंदूच्या विकृतीत शोधले पाहिजे असे म्हणणारा शरीरवादी (Somatic) गट.

वरील सर्व विवेचनावरून गेल्या १००–१५० वर्षांत मानसशास्त्रास कसें स्वतत्र व वैज्ञानिक स्वरूप येत चालले होते याची कल्पना येईल एवढे मान्य करूनहि असे म्हणावे लागेल की, जवळजवळ दोन हजार वर्षे मानसशास्त्रावर असलेला तत्त्वज्ञानाचा पगडा अजिबात नाहीसा होणे कठीण होते. याचे मुख्य कारण असे की, १८९० पयत मानसशास्त्रात काम करणारी बरीचशी मडळी तत्त्वज्ञानी प्रवृत्तीची होती याची उत्तम उदाहरणे वुट्ट व वुइल्यम् जेम्स् ही देता येतील. अर्थातच कोणत्याहि प्रश्नाचा विचार करताना त्यांत तत्त्वज्ञानाची छाया याच्या लिखाणांतून आपोआपच पडलेली दिसून येते. पण प्रायोगिक मानसशास्त्राची स्वतंत्र अस्तित्वासाठी धडपडहि सारखी चालूच होती. इ. स. १८९० च्या पुढे निरनिराळ्या विश्वविद्यालयातून मानसशास्त्रास स्वतंत्र स्थान मिळूं लागलें व याच विषयाला वाहिलेली अशीं स्वतंत्र नियतकालिकेंहि निघू लागली.

मानसशास्त्रातील बदलत्या दृष्टिकोनाविषयी आपण आतापर्यंत विचार केला. पण १९ व्या शतकात जेव्हा मानसशास्त्राची व्याख्या करण्याचा प्रसंग येई तेव्हा मानसशास्त्र म्हणजे बोधजीवनाचें शास्त्र ( Psychology is the Science of Consciousness ) असेच काहीसे स्पष्टीकरण देण्यांत येई वुइल्यम् जेम्स्ने असे म्हटले आहे की "सर्व तऱ्हेच्या मानसिक घटना व त्यांची कारणपरंपरा याचा अभ्यास करणारे जे शास्त्र ते मानसशास्त्र होय" इ स १८९२ मध्ये वुंड्टने मानसशास्त्राचे स्वरूप वर्णन करताना असे म्हटले आहे की, मनाच्या अंत सृष्टीतील अनुभवाचा अभ्यास करणें हे मानसशास्त्राचे कार्य होय या अनुभवात वेदन, भाव, विचार, निर्णय वगैरेंचा समावेश होतो. याच्या उलट बाह्य सृष्टीतील प्रत्येक वस्तु इतर भौतिक शास्त्राचा अभ्यासविषय असते *

अशा तऱ्हेच्या व्याख्यानी मानसशास्त्र जाणीव व अनुभव घेणारी व्यक्ति याच्यापुरतेच मर्यादित केले गेले अर्थातच अंत:सृष्टीचा शोध लावण्यास दृष्टि अंतर्मुख करून अनुभवाचा अभ्यास करणें ही एकच पद्धति शक्य होती वुंड्टनेहि असे स्पष्टच म्हटले आहे की, प्रयोगशाळेचा हेतु अंतर्निरीक्षणास योग्य ती परिस्थिति निर्माण करणे हाच होय

मानसशास्त्राच्या प्रयोगशाळेचे प्रत्यक्ष काम मात्र वरील व्याख्येनुरूप होत नसे. प्रयोग करताना प्रत्यक्ष कृति करणारा (Performer) व त्या कृतीच्या अनुभवाचे निरीक्षण करणारा एकच नसे निरीक्षण करणारा दुसरा मनुष्य परीक्ष्य (Subject) प्रतिक्रिया कशी करतो, त्याला चेतकाचे आकलन कितपत स्पष्ट व किती वेळात होते, मागे घडलेले अनुभव तो कितपत आठवू शकतो वगैरे गोष्टी पाहून स्वतःचे आडाखे

* Psychohogy is the Science of mental life, both of its phenomena and their conditions

Psychology has to investigate that which we call internal experience—i. e. our own sensation and feeling our thought and volition—in contradistinction to the objects of external experience which form the subject-matter of natural science.

बसवी. कृति करणाऱ्याला त्याचा अनुभव वर्णन करून सांगण्याची जरूर नसे. विकार, भावना वगैरेंचा अभ्यास करतांना श्वासोच्छ्वास, नाडीची गति वगैरे मोजणाऱ्या यत्रांचा उपयोग केला जात असे. परीक्ष्याने कृति करताना स्वतःचे काही विशेष अनुभव सांगितले, तर त्याचा कृति स्पष्ट करण्याकडे उपयोग करून घेतला जाई. अशा तऱ्हेने प्रायोगिक मानसशास्त्र निरनिराळ्या तऱ्हेने आपले प्रयोग यशस्वी करण्याच्या खटपटींत होतें व हें करताना पुष्कळ वेळा पुस्तकी सिद्धात व व्याख्याच्या मर्यादा आपोआपच ओलाडल्या जात

अशा तऱ्हेने प्रगतीचा नवीन मार्ग आखण्यात इ स १९०० पर्यन्त मानसशास्त्र गुतले होते जरी व्याख्येपुरते मानसशास्त्र अजूनहि जाणिवेला चिकटून होते, तरी प्रत्यक्षात मात्र वर्तन व अनुभव या दोहोचा अभ्यास शास्त्रज्ञ करीत होते

शास्त्रदृष्टया रसायनशास्त्राप्रमाणे अनुभवाचे मूलघटक ते मानीत होते, प्रत्यक्षात मात्र अनुभवाचे पृथक्करण केले जाईच असे नाही. त्याच-प्रमाणे कल्पनाच्या साहचर्याची भमिका त्यास अमान्य नव्हती, तरी ते फक्त साहचर्यास चिकटून राहण्यास मात्र तयार नव्हते तत्त्वदृष्टया मानसशास्त्राचा पाया शरीरशास्त्राचाच हवा, असे त्याचे म्हणणे असले तरी प्रत्यक्षात मात्र मेदूच्या सर्व भागाच्या कार्याची सूक्ष्म माहिती उपलब्ध नसल्याने पुष्कळशा क्रियाचे व वर्तनाचे मेदूत निश्चित मूळ दाखविणे अशक्य होई.

## विसाव्या शतकांतील मानसशास्त्र

कोणत्याहि विज्ञानविषयात नवीन सिद्धान्त मांडण्यापूर्वी जुने सिद्धान्त कसे असमाधानकारक आहेत, हे दाखविण्यात नवीन कार्यकर्ते गर्क झालेले असतात मानसशास्त्रातहि विसाव्या शतकाच्या सुरुवातीला हीच प्रवृत्ति दिसून येते निरनिराळ्या मानसशास्त्रीय मतप्रणालीनी जुन्या सिद्धान्तातील दोष दाखविण्यापासूनच स्वतःच्या प्रगतीची सुरवात केली. प्रत्येक मतप्रणालीचा स्वतःचा विशिष्ट दृष्टिकोन जरी अजून पक्का तयार

झाला नसला तरी एकंदरीने विसाव्या शतकातील मानसशास्त्रांत घडून येणारे फरक खूपच आशादायक व प्रगतिपूर्ण आहेत हे निश्चित.

वर्तनवाद ( Behaviourism ) हा शब्द आतापर्यंत बहुतेकांच्या परिचयाचा झाला आहे. पण वर्तनवाद म्हणजे काय हे निश्चित शब्दांत सांगणें अतिशय कठीण आहे. एवढें मात्र खरे की, मानसशास्त्र हे जाणिवेचा अभ्यास करणारें शास्त्र होय. या व्याख्येस या पंथाचा फार तीव्र विरोध आहे. विषयाप्रमाणेच मानसशास्त्रातील अंतर्निरीक्षण पद्धति हीहि या लोकांना मान्य नाही. असामान्य मनाचा अभ्यास हाच सामान्य मनापेक्षा कितीतरी पटीने अधिक महत्त्वाचा आहे असे मानणाऱ्या मानसोपचार-शास्त्रज्ञांनाहि वर्तनवाद्याप्रमाणेच मानसशास्त्र हे जाणिवेचें शास्त्र होय ही व्याख्या पसंत नाही याच्या मते नेणीव हा मनाचा भाग जाणिवेच्या भागा-पेक्षा कितीतरी महत्त्वाचा व मोठा आहे. तेव्हा मानसशास्त्राचा खरा विकास नेणिवेच्या अभ्यासानेच होणार आहे. अशा तऱ्हेने मानसोपचार-शास्त्रज्ञानी नेणिव व लैंगिक मानसशास्त्र ( Psychology of sex ) या दोन मुद्द्यांवर सर्व भर दिला. यातूनच पुढे मनोविश्लेषण वादाचा ( Psycho-analysis ) उदय झाला.

हेतुवाद्यांच्या ( Purposivist School ) मते मानसशास्त्राने सर्व सामाजिक प्रश्नाचा सखोल अभ्यास केल्याखेरीज मानसशास्त्राचा अभ्यास पुरा होणार नाही. मनुष्य हा समाजप्रिय प्राणी असल्याने त्याच्या व्यक्ति-मत्त्वाचा बहुतेक भाग सामाजिक संबंध व व्यवहार यांतूनच तयार होत असतो. व्यक्तीने केलेल्या सर्व कृतीच्या मागे काहीतरी सहेतुक प्रेरणा (Drive) असते व या मूलप्रेरणेचा अभ्यास करणें म्हणजेच मानसशास्त्राचा अभ्यास करणे होय. अंतर्निरीक्षण किंवा साध्या बाह्य शारीरिक प्रति-क्रियांचा अभ्यास या दोन्हीच्या साहाय्याने मानसशास्त्रांत खरीखुरी प्रगति होऊं शकेल की नाही याबद्दल हेतुवाद साशंक आहे.

मानसशास्त्र हें जाणिवेचें शास्त्र होय ही व्याख्या त्याज्य ठरविण्या-बाबत मात्र वर्तनवादी, मानसोपचारवादी व हेतुवादी या तिघांचें एक मत आहे. मनोविश्लेषणवादाने नेणिवेचा पाठपुरावा केला, हेतुवादाने जाणीव

ह्या मानसशास्त्राचा फक्त एक भाग आहे, असें प्रतिपादन केलें, तर वर्तन-वाद्यानी मानसशास्त्राच्या दृष्टीने जाणिवेचे अस्तित्वहि मान्य करण्यास नकार दिला.

अशा रीतीने जुन्या मानसशास्त्रावर चोहोकडून हल्ले होत असतां जुन्या मताचे लोक आपला दृष्टीकोन जास्त जोराने व स्पष्टपणे मांडण्याचा प्रयत्न करीत होते. व या प्रयत्नातूनच मानसद्रव्यवाद (Existentialism) या मतप्रणालीचा उदय झाला. या लोकाच्या मतें अंतर्निरीक्षण जर शास्त्रीय स्वरूपाचे केले तर त्यापासून निश्चित फायदा होईल. आधुनिक कालांत पुढे येत असलेल्या कोणत्याहि मतप्रणालीच्या प्रयत्नाने वस्तुस्थिति निदर्शक असे नवीन मानसशास्त्र निर्माण होऊ शकणार नाही. मनोविश्लेषणवाद, हेतुवाद व वर्तनवाद यांचे ध्येय मानवी जीविताचा, त्यातील सर्व क्रियाप्रक्रियाचा व त्यांच्या बुडाशी असलेल्या तत्त्वांचा अभ्यास करणें हें आहे, पण यातून मानसशास्त्र किवा पदार्थविज्ञानशास्त्र याच्यामधील विश्वव्यापी सिद्धातासारखे सिद्धात मानसशास्त्रातहि काढता येतील का, असा प्रश्न विचारल्यास त्याचे उत्तर होकारार्थी देता येणार नाही. ही दोन्ही शास्त्रें मानवी जीविताच्या विकासाशी व सुखाशी निगडित झालेली आहेत. पण या शास्त्रात दिलेले त्रिकालाबाधित सिद्धान्त घेऊन त्यावर नंतर, प्रगतीस पोषक अशी रेडिओ, वीज, तारायत्र वगैरे प्रत्यक्ष साधनें निर्माण झाली. मानसशास्त्रानेहि याच शास्त्राच्या पावलावर पाऊल टाकून प्रथम सत्यस्वरूपाचे त्रिकालाबाधित सिद्धान्त बसविले पाहिजेत व त्यातून आपोआपच नित्याच्या वागणुकीला पोषक असे बारीकसारीक नियम बसविता आले पाहिजेत. अशा रीतीने मानवद्रव्य-वादाच्या मते विश्वव्यापी सिद्धान्त अगोदर ठरवावे व नंतर त्यातून प्रत्यक्ष नित्याच्या वागणुकीचे नियम तयार करावे.

आतापर्यंत उद्धृत केलेल्या मतप्रणालीखेरीज समष्टिवाद (Gestalt Psychology) नावाचा आणखी एक विचारप्रवाह उदयास आला आहे. अनुभवाचें पृथक्करण करून त्याचे मूलघटक शोधून काढण्याचे १९ व्या शतकांतील मानसशास्त्राचें जें ध्येय त्याच्या अगदी विरुद्ध अशी या

वादाची भूमिका आहे क्रिया व अनुभव निराळी करण्याची कल्पनाच या लोकांना मान्य नाही. अनुभव जसाच्या तसाच घेऊन त्याच्या पार्श्वभमि-सहित त्याचा अभ्यास केला, तरच महत्त्वाचे मानसशास्त्रीय सिद्धांत मिळू शकतील, असें साकल्यवादाचे म्हणणे आहें.

एकंदरीने काही लोकांचे प्रयत्न मानसशास्त्राला जास्त जास्त वैज्ञानिक स्वरूप देण्यासाठी चालू आहेत, तर काही मानसशास्त्राचा प्रत्यक्ष जीविताशी जितका जास्त सबध जोडता येईल तितका जोडण्यासाठी धडपड करीत आहेत. आधुनिक मानसशास्त्रात जरी इतके निरनिराळे नवीन विचारप्रवाह निर्माण होत आहेत तरी एका गटाची प्रगति दुसऱ्याच्या आड येत नाही. याचे कारण पुष्कळसे शास्त्रज्ञ एकाच मतास चिकटून न राहता प्रत्येक मतप्रणालीतील उपयुक्त भाग घेऊन मानसशास्त्रीय सशोधनाचे काम पुढे चालवीत आहेत. व त्यामुळे एकदर मानसशास्त्राचें पाऊल पुढेच पडत आहे



## प्रकरण २४ वें

# वर्तनवाद ( Behaviourism )



जे. बी. वॉट्सन्ने मानसशास्त्रात केलेली कामगिरी म्हणजेच मानसशास्त्रातील वर्तनवादाचा इतिहास असे यथार्थतेने म्हणता येईल. शिकागो विश्वविद्यालयात काम करीत असतानाच जुन्या मानसशास्त्राच्या सिद्धातामधील अपूर्णता त्यास तीव्रतेने जाणवू लागली व इ स १९१२ त वर्तनवादासबधीच्या लिखाणात प्रथमच त्याने असे म्हटले की ज्या गोष्टी इन्द्रियगम्य नाहीत अशाचा अभ्यास मानसशास्त्र यापुढे करणार नाही. त्याच्या मने मन, आत्मा, जाणीव वगैरे फक्त समजुतीवर आधारलेल्या गोष्टीचा अभ्यास करण्यापेक्षा मानसशास्त्र नाहीसेच झाले तरी हरकत नाही. इतर शास्त्राप्रमाणे शास्त्रीय पायावरच फक्त आगामी मानसशास्त्राची उभारणी करणे शक्य आहे वुट्ट पर्यन्तच्या सर्व अभ्यासकानी 'आत्म्या' ऐवजी 'जाणीव' हा शब्द वापरण्यापलीकडे मानसशास्त्रात काहीहि भर घातली नाही असे वॉट्सन्चे स्पष्ट मत होते "बिहेविअर—अँन् इन्ट्रोडक्शन् टु कंपॅरिटिव्ह् सायकॉलॉजी" या १९४८ साली लिहिलेल्या पुस्तकात वॉट्सन्ने ही गोष्ट स्पष्ट केली आहे. *

मन, जाणीव, इच्छा, मानसिक प्रतिमा, अनुभव वगैरे सर्वच कल्पना अर्थशून्य आहेत. मानसशास्त्र जर 'शास्त्र' या सदरात बसावयाचे असेल

* The time seems to have come when Psychology must discard all reference to consciousness. It is possible to write a psychology, to define it as Pillsbury does ( as the science of behaviour ) and never go back upon the definition; never to use the terms, consciousness, mental states, mind, content, will, imagery and the like."

तर प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या व वास्तवतेने अभ्यसनीय अशा वर्तणुकीचाच अभ्यास करून निश्चित सिद्धान्त ठरविले पाहिजेत. वुइल्यम् जेम्स्, जॉर्ज् ट्रम्बुल् लॉड्, व स्टॅन्ले हॉल् वगैरे अमेरिकन मानसशास्त्रज्ञांना "मानसशास्त्र म्हणजे जाणिवेचा अभ्यास" ही व्याख्या प्रथमपासूनच फारशी पसंत नव्हती, त्यांचा कल सुरुवातीपासूनच अनुभवापेक्षा मानवी कृतीच्या अभ्यासाकडे होता रचनात्मक (Structural) व कार्यात्मक (Functional) मानसशास्त्र यातील वादहि याच सुमारास बराच रंगला होता. रचनात्मक मानसशास्त्राचा भर जाणिवेचे निरनिराळे भाग वर्णन करण्याकडे असे, तर कार्यात्मक मानसशास्त्राचा भर जाणिवेचे प्रत्यक्ष कार्य वर्णन करण्याकडे असे. नैसर्गिक विकासात कल्पना, विचार, सकलन वगैरे कार्ये कशी सुरू झाली व त्याचा उपयोग व्यक्ति व परिस्थिति याना ताब्यात ठेवण्याचे बाबतीत कसा होतो हें अभ्यासाने निश्चित ठरविणे हेच कार्यात्मक मानसशास्त्राचे ध्येय असे. जॉन् ड्युई, एन्जल् वगैरे शिकागो युनिव्हर्सिटीतील लोक कार्यात्मक मानसशास्त्राचे प्रमुख पुरस्कर्ते होते; व त्याच्याच हाताखाली वॉट्सन् तयार झाला होता. परंतु वॉट्सनच्या मने कार्यात्मक मानसशास्त्राचा दृष्टिकोनहि यथार्थतया शास्त्रीय नव्हता. कारण वेदनें, अवबोध, वासना, इच्छा वगैरे शब्दप्रयोग रचनात्मक मानसशास्त्राप्रमाणेच कार्यात्मक मानसशास्त्रातहि वापरले जातात. इ. स. १९१२ च्या सुमारास मानसशास्त्रात कृतीच्या अभ्यासावर जास्त भर दिला जात होता तरी कृति करणाराचे अंतर्निरीक्षणहि त्यात मिसळले गेल्याने त्या अभ्यासाचें शास्त्रीय दृष्ट्या महत्त्व कमी होत होते असे वॉट्सन्ला वाटे. अंतर्निरीक्षण पूर्णपणे वगळून परीक्ष्याने (Subject) केलेल्या क्रियाचा शास्त्रीय विचार इ. स. १८८० त गॉल्टन्नेच प्रथम सुरू केला १८८५ साली एबिंगहॉस्ने केलेला स्मृतीचा अभ्यासहि पूर्णपणे अंतर्निरीक्षणविरहित असा होता

**मानसशास्त्राची वस्तुनिष्ठ (Objective) व्याख्या ठरविण्याचे बाबतींत वर्तनवादापूर्वीचे धोरण** :—प्रयोगशाळेत जरी वर्तणुकीचा अभ्यास इ. स. १८७९ पासून चालू होता तरी सामान्यतः इ. स. १९०४ पर्यन्त मानसशास्त्राच्या व्याख्येवर या नव्या दृष्टिकोनाचा कांहीच परिणाम झाला नव्हता. १९०४ साली सर्व शास्त्रांतील तज्ज्ञांची एक परिषद् भरली व

प्रत्येकाने आपापल्या शास्त्राचें यथार्थ स्वरूप दर्शविणारी अशी व्याख्या तयार करून द्यावी असें ठरलें. स्टॅन्ले हॉल् व वुद्ट् याचा शिष्य कॅटेल् याजवर मानसशास्त्राची व्याख्या तयार करण्याची कामगिरी सोंपविली गेली. 'Popular Science Monthly मध्ये कॅटेल् म्हणतो, " माझ्या प्रयोगशाळेंत मी व माझ्या सहकाऱ्यानी अंतर्निरीक्षणाची मदत मुळीच न घेता स्मृति, कल्पनासाहचर्य, निर्णय, अवबोधाची परिणति, रंगज्ञान, विचारांबरहुकूम होणारी क्रियात्मक मज्जातंतूची हालचाल, वगैरे कितीतरी विषयांचें निरीक्षण करून महत्त्वाचे निर्णय केले आहेत." इतके असूनहि कॅटेल्ने अंतर्निरीक्षण अगदीच निरुपयोगी आहे, असें म्हटलेलें नाही. वॉट्सन्ला अंतर्निरीक्षण व मन याचे अस्तित्वहि मान्य नव्हते. इतका त्याचा दृष्टिकोन एकातिक होता. याच मुद्द्यावर त्याचा मॅग्ड्गल् व पिल्स्बरी यांच्याशी मतभेद होता. मॅग्ड्गल् जरी हेतुवादाचा पुरस्कर्ता होता तरी त्याने बाह्य वर्तणुकीस पुरेसें–भरपूर–महत्त्व दिलें होतें. ही गोष्ट त्यानें इ. स १९०५ त प्रकाशित केलेल्या आपल्या एका पुस्तकांत स्पष्ट केली आहे.*

मानसशास्त्राची सर्वोत्कृष्ट व सर्वव्यापी व्याख्या करणें झाल्यास असें म्हणावे लागेल की, मानसशास्त्र हे जिवत प्राणिमात्राच्या प्रत्यक्ष आचरणाचा विचार करणारें सत्तात्मक शास्त्र (Positive Science) आहे.

इ. स. १९०८ मध्ये लिहिलेल्या 'Introduction to Social Psychology या पुस्तकातहि त्याने स्पष्ट म्हटलें आहे की यापुढे मानसशास्त्राने फक्त जाणिवेला चिकटून राहून मुळीच चालणार नाही. इतर शास्त्राप्रमाणेच मानसशास्त्रानेंहि वास्तव बनले पाहिजे. फक्त अंतर्निरीक्षणाच्या साहाय्याने अनुभवाचे विवेचन केल्याने मानसशास्त्रास शास्त्र ही संज्ञा प्राप्त होऊंच शकणार नाही. इ. स. १९११ त प्रसिद्ध केलेल्या Essential of Psychology या पुस्तकात केलेली मानसशास्त्राची व्याख्या त्या काळी बहुतेक सर्वांनी मान्य केली होती. त्याने असें म्हटले आहे की

---

* Psychology may be best and most comprehensively defined as the positive science of the conduct of living creatures. ( Physiological Psychology. )

"आचारावरून माणसाची माहिती मिळते. म्हणून मानवी आचरणाचें शास्त्र म्हणजे मानसशास्त्र ही व्याख्या समाधानकारक आहे."

निसर्गांतील इतर वस्तूप्रमाणेच माणसाच्या वर्तणुकीचे निरीक्षण करून मानसशास्त्राची शुद्ध पायावर उभारणी करणें अशक्य नाही असें त्याचे म्हणणे होते

इतके असूनहि मॅग्डूगल् व पिल्स्बरी या दोघाना जाणिवेचे महत्त्व अमान्य नव्हते. वर्तनाची जाणीव ही गोष्टहि मानसशास्त्राच्या दृष्टीनें कमी महत्त्वाची नाही. साराश मानसशास्त्र हे वर्तनाचे शास्त्र होय व वर्तनाच्या जाणिवेचे शास्त्रदृष्टचा महत्त्व कमी नाही असे यथार्थाने म्हणता येईल.*

प्रत्यक्ष वर्तनवादाच्या जन्माचे वेळी मानसशास्त्राचा दृष्टिकोन वरीलप्रमाणे होता. वर्तन या शब्दात बाह्य कृतीप्रमाणेच जाणिवेचा समावेश केला जाई. वर्तन व जाणीव हे शब्द परस्परविरोधी मानले जात नसत; पण वॉट्सन्ला मात्र ही विचारसरणी मान्य नव्हती. त्याच्या मते वर्तन व जाणीव ही दोन्ही परस्पर विरोधी आहेत म्हणून जाणीव हा शब्दहि मानसशास्त्रांत येता कामा नये.

### पशु-मानसशास्त्राची वाढ (Growth of Animal Psychology)

खालच्या दर्जाच्या प्राण्याच्या वर्तनाचा अभ्यास प्राणिशास्त्रांत डार्विन्पासूनच सुरू झाला होता; पण मानसशास्त्राच्या प्रयोगशाळेंत प्राण्याच्या वर्तणुकीचा अभ्यास प्रथम थॉर्न्डाइक्ने केला. या अभ्यासावरून प्राण्यांतील सहजप्रवृत्ति व शैक्षणिक पात्रता याचें संशोधन त्यास मुख्यतः करावयाचें होतें. कोंबडीचे अगदी लहान पिलूसुद्धा उंच पेटीवर ठेवल्यास जमिनीवर उडी मारण्यास धजत नाही. यावरून अंतराची जाणीव व आत्मनिरीक्षण या गोष्टी त्याला न शिकविता समजतात हे थॉर्न्डाइक्ने सिद्ध केले. प्राण्याची शिकण्याची पात्रता शोधून काढण्यासाठी त्याने

*Psychology is the science of behaviour. Behaviour is to be studied through the consciousness of invidual and by external observation.

निरनिराळ्या कूटपेट्याचा (Puzzle Boxes) उपयोग करून कोंबडीं, कुत्री, माजरे, माकडे वगैरे प्राण्यांवर बरेच प्रयोग केले. यर्कस्, वॉट्सन् वगैरे शास्त्रज्ञांनी थॉर्न्डाइक्च्या प्रेरणेने प्राण्याच्या वर्तनाचा बराच अभ्यास केला. शिकविलेली गोष्ट ग्रहण करण्याची पात्रता शोधून काढण्यास या प्रयोगाचा फार उपयोग झाला. शेकडो प्रयोग केल्यानतर थॉर्न्डाइक्ने असा निर्णय दिला की सारासार विचार करून योग्य कृति करण्याइतकी पात्रता प्राण्यात नसते. एका प्राण्याची कृति पाहून योग्य प्रतिक्रिया करण्याइतकीहि बुद्धिमत्ता पुष्कळ वेळा प्राण्यात दिसत नाही. त्याच्यापुढे कूटप्रश्न उभा केला की, क्रियात्मक मज्जाततूकडून धडपड सुरू होते व अजाणताच त्यातून योग्य ती प्रतिक्रिया केव्हातरी बाहेर पडते.*

थॉर्न्डाइक्ने असेंहि म्हटले आहे की यत्नस्खलितपद्धति फक्त बुद्धिहीन प्राणीच वापरतात असें नाही. क्रीडानैपुण्यहि मनुष्यप्राणी प्रायः याच पद्धतीने मिळवितो. सारासार विचारशक्ति व कल्पकता याचा पाया यदृच्छाप्राप्त शिक्षण (Brute learning) हाच आहे. थॉर्न्डाइक्च्या मते शिकण्याची क्रिया म्हणजे क्रियात्मक व प्रतिक्रियात्मक ज्ञानततूमध्ये विशिष्ट तऱ्हेचे सबध निश्चित होणे ही होय. त्याने शिकण्याच्या क्रियेबद्दल दोन सामान्य नियम बसविले आहेत. (१) अभ्यासनियम (Law of Exercise) :— पुनरावृत्तीने व नियमितपणाने कृति पक्की होते व नियमितपणा न राहिल्यास ती पुसट होत जाते. (२) परिणाम-नियम (Law of Effect) :— सुखदायक परिणाम असल्यास कृति दृढ होत जाते व परिणाम दुःखदायक असल्यास ती परत करण्याकडे प्राण्याची प्रवृत्ति होत नाही.

थॉर्न्डाइक्चे हे नियम मुख्यतः साहचर्याच्या कल्पनेवर आधारले आहेत. पण थॉर्न्डाईक् विचारांच्या साहचर्यासंबंधी न बोलता फक्त क्रियात्मक ज्ञानतंतूच्या साहचर्याबद्दल बोलला. शैक्षणिक मानसशास्त्राच्या अभ्यासांतहि थॉर्न्डाइक्ने वर्तनाच्या निरीक्षणाचीच पद्धति अवलंबिली होती. इ. स. १९०५ मध्ये मानसशास्त्राचे वर्णन करतांना त्याने जाणिवेला खूपच प्राधान्य दिलें

---

*The animal learned not by watching not by considering but by doing........Trial and error was the animal method of learning.

पण इ. स. १९११ त वर्तन व जाणीव यांचें तुलनात्मक वर्णन करतांना त्यानें असें म्हटलें आहे की, वर्तनांत जाणीव, कृति, मानसिक अवस्था व त्यांचे परस्पर संबंध या सर्वांचा समावेश होतो. *

अशा तऱ्हेने वर्तनवादाची भूमिका तयार होत होती. थॉर्न्डाइक्‌नें प्राण्यांच्या वर्तनाचा मानसशास्त्रदृष्टचा केलेला अभ्यास हीच खऱ्या वर्तन-वादाची सुरवात मानतां येईल. वर्तनाचा अभ्यास हा मानसशास्त्राचा भागच होऊं शकत नाही अशी पूर्वकालीन मानसशास्त्रज्ञांची हाकाटीहि याच वेळी जोरानें सुरू झाली. कारण दकार्तपासून तत्कालील शास्त्रज्ञांची अशी समजूत होती की, फक्त मनुष्याखेरीज इतर प्राण्यांना आत्मा, मन वगैरे कांही नसतेंच. अर्थात् थॉर्न्डाइक्‌नें केलेला प्राण्यांच्या वर्तनाचा अभ्यास हा मानसशास्त्राचा भाग होणें शक्य नाही असें त्याचे म्हणणें. वर्तनावरून जाणिवेचें प्रत्यक्ष अस्तित्व केव्हाच सिद्ध करतां येणार नाही. जाणीव ही फक्त अनुमानात्मक राहील व असें अनुमान काढण्यास मुळीच आधार देता येणार नाही. म्हणून जुन्या मानसशास्त्राच्या दृष्टीनें वर्तनाच्या अभ्यासास कांहीहि किंमत नाही.

वरील मुद्दा सर्वांत जास्त जोरानें वॉट्सन्‌नें खोडून काढला. त्यानें असा युक्तिवाद केला कीं वर्तनावरून जसें जाणिवेचें निश्चित अनुमान काढतां येणार नाही तसेंच तें अंतर्निरीक्षणावरूनहि काढतां येणार नाही. खऱ्या मानसशास्त्रास वर्तनाच्या अभ्यासानेंच सुरुवात केली पाहिजे. शेवटीं त्यानें असें म्हटलें आहे की, " अंतर्निरीक्षणाचें तत्त्व सोडलें नाही तर मानसशास्त्र हें मतामतांतरांचा आखाडाच होऊन बसेल व शास्त्र या पदवीला तें केव्हाच पोंचणार नाही." वॉट्सन्‌च्या मतें अंतर्निरीक्षण करतांना मानस-शास्त्रज्ञ अतीन्द्रिय अशा मनाचें परीक्षण करायाचा आव आणतात. पण तें मन म्हणजे काय हें त्यांना मुळीच सांगतां येत नाही. तत्त्वज्ञानांत आत्मा हें ज्याप्रमाणें एक फक्त गृहीतक आहे, त्याचप्रमाणे मानसशास्त्रांत मन हें आहे. आत्मा ज्याप्रमाणे दाखवितां येत नाही, त्याचप्रमाणे

* Behaviour includes consciousness and action, states of mind and their connections.

मनाचे अस्तित्वहि सिद्ध करणे शक्य नाही आपण आपल्या क्रियाचे बर्णन करू शकतो येथपर्यंत जाणिनेचे अस्तित्व वॉट्सन्‌ला मान्य आहे. पण जाणीव ही क्रियेहून वेगळी व स्वतंत्र आहे हे मात्र त्यास मान्य नाही. एकदा प्रत्यक्ष अनुभवलेली गोष्ट स्मृतीच्या साहाय्याने पुन्हा आपण मनःचक्षूसमोर उभी करू शकतों, व अनुभवाविषयी सुखदुःखात्मक भाव आपल्या मनात उद्‌भवू शकतात या दोन्ही गोष्टींवर वॉट्सन्‌चा विश्वास नाही मेंदूचेहि अवास्तव महत्त्व वॉट्सन् मान्य करीत नाही. अन्तर्बाह्य सर्व क्रिया म्हणजे मज्जाततूंना होणारी वेदने व त्यामुळे उत्पन्न झालेला शारीरिक प्रक्षोभ व प्रतिक्रिया वर्तन काही वेळा डोळयांस दिसते तर काही वेळा दिसत नाही. वर्तनाचे काही प्रकार जन्मापासूनच पक्के झालेले असतात तर काही शिक्षणाने पक्के होतात. वर्तनवादाचे प्रधानकार्य व्यक्तीच्या व्यक्ताव्यक्त वर्तनाचा व तिच्या विकासाचा अभ्यास हे होय

वर्तनवादाच्या क्षत्रात रशियाने इ. स १९१२ पर्यंत केलेली प्रगति फार अभ्यसनीय आहे अमेरिकेत वर्तनवादाची सुरवात जुन्या मानसशास्त्राला करण्यांत आलेल्या विरोधातून झाली. तर रशियात वर्तनवादाची सुरवात सापेक्ष प्रतिक्षेपाच्या संशोधनातून झाली. सापेक्ष प्रतिक्षेपाचा सिद्धान्त इ. स १९०५ च्या सुमारास सेंट पीटर्सबर्गच्या प्रयोगशाळेत निश्चित झाला. बेक्टेरेव्ह हा रशियन शास्त्रज्ञ १८८० पासून शरीरविच्छेदनशास्त्र व मज्जाततूचे रोग यावर संशोधन करीत होता या संशोधनांतूनच त्याने सहवर्ती प्रतिक्षेपाचे (Associated Reflexes.) सिद्धान्त माडले. यानाच पुढे पॅव्हलॉव्हने सापेक्ष क्रिया किंवा प्रतिक्षेप ( Conditioned Reflex ) असे नाव दिले. बेक्टेरेव्हने फक्त कारक ज्ञानततूचा अभ्यास केला; पण पॅव्हलॉव्हने ग्रंथिक (Glandular) व स्रावक (Secretory) प्रतिक्रियाचाहि अभ्यास केला. बेक्टेरेव्हने आपला सिद्धान्त खालीलप्रमाणे माडला आहे :—समजा 'अ' या चेतकाने श्वसनक्रियेवर कांही परिणाम होत नाही व 'ब' ने होतो. अशा वेळीं 'ब' बरोबर पुन्हा पुन्हा जर 'अ' हा चेतक वापरला तर कांही पुनरावृत्तीनंतर नुसत्या 'अ' नेहि श्वसनक्रियेवर परिणाम होऊं लागतो. यासच त्याने सहवर्ती अथवा अधीत प्रतिक्रिया असें म्हटलें

आहे. सर्व वर्तनाचा पाया प्रतिक्षेप हा धरून मानसशास्त्रातील सर्व प्रश्नांचें स्पष्टीकरण करता येईल असे त्याने आपल्या 'वस्तुनिष्ठ मानसशास्त्र' या १९०७ साली लिहिलेल्या पुस्तकात दाखविले आहे.

पॅव्ह्लॉव्ह :—पॅव्ह्लॉव्हचा जन्म १८४९ साली झाला तो प्रथम धर्म-गुरु होता, पण पुढें वैद्यक व शरीरशास्त्र याच्या अभ्यासाकडे त्याचें लक्ष वळलें. पचनशक्तीवर त्याने बरेच महत्त्वाचे प्रयोग केले कुत्र्याच्या लाळेच्या प्रतिक्रियेवर प्रयोग करतानाच १९०० सालच्या सुमारास त्यास सापेक्ष प्रतिक्षेपाचा सिद्धान्त समजून आला सापेक्ष प्रतिक्षेप ( Conditioned reflex ) हा शब्दप्रयोगहि प्रथम पॅव्ह्लॉव्हने सुरू केला. नैसर्गिक चेतका-ऐवजी दुसराच एखादा चेतक त्या नैसर्गिक चेतकाची प्रतिक्रिया करतो तेव्हा त्या क्रियेस सापेक्ष-प्रतिक्षेप असे म्हणतात.

प्रतिक्षेप कसा तयार होतो हे ठरविणे हा पहिला महत्त्वाचा मुद्दा. पॅव्ह्लॉव्हला असे आढळून आले की, घटा वाजवून पुढे ठराविक वेळाने अन्नाची ताटली दिली की हळूहळू कुत्र्याच्या डोक्यात घटेचा आवाज व अन्न या दोहोंचे साहचर्य पक्के होत जाते व काही पुनरावृत्तीनतर तें पूर्णतया दृढ होते अशा तऱ्हेने प्रतिक्षेप स्थिर झाला की नुसत्या घटेच्या आवाजानेहि लाळ सुटण्याची प्रतिक्रिया सुरू होते. याच्या उलट घंटा वाजवून अपेक्षेप्रमाणे अन्न न देण्याची क्रिया जर बरेच वेळा केली तर सापेक्ष प्रतिक्षेप नाहीसाहि होतो. पहिल्याला त्याने धनात्मक प्रतिक्षेप (Positive Response) व दुसऱ्यास निरोधात्मक प्रतिक्षेप (Inhibitory Response) असे नाव दिले. प्रतिक्षेपाच्या सिद्धान्तावरून मेंदूच्या कार्या-सबधी काही सामान्य नियम बसविण्याचाहि प्रयत्न पॅव्ह्लॉव्हने केला. त्याच्या मतें सर्व प्राण्याच्या व मानवाच्याहि सर्व तऱ्हेच्या गुतागुतीच्या वर्तनाचा पाया प्रतिक्षेप हाच असला पाहिजे. निरनिराळ्या सवयी, आवडी-निवडी व शिक्षण या सर्वांचा अर्थ निरनिराळ्या तऱ्हेचे सापेक्ष प्रतिक्षेप पक्के करणे हाच होय असें त्याने प्रतिपादन केले. मोठ्या मेंदूच्या निर-निराळ्या भागात सापेक्ष प्रतिक्षेप तयार होतात असे दिसून येते. कारण प्राण्याच्या मोठ्या मेंदूस जर इजा झाली तर सापेक्ष प्रतिक्षेपासंबंधीच्या

सिद्धान्ताचा एकूण मानसशास्त्रावर–विशेषतः वर्तनवादावर–फार महत्त्वाचा परिणाम होतो

## वॉट्सन्‌ने घडवून आणलेली प्रगति

सापेक्ष-प्रतिक्षेपाच्या आधाराने वर्तणुकीचे निरीक्षण करणे या पद्धतीस मानसशास्त्राच्या प्रयोगशाळेत इ. स. १९१९ च्या सुमारास फार महत्त्वाचे स्थान मिळाले भावनाचे स्पष्टीकरणहि सापेक्ष प्रतिक्षेपाच्या आधाराने करण्याचा प्रयत्न वॉट्सन्‌ने केला. इ स. १९२४ च्या सुमारास वर्तनाचे सर्व प्रकार सापेक्ष प्रतिक्षेपाच्या साहाय्याने स्पष्ट करता येतील अशी त्यास खात्री वाटू लागली. इतर काही शास्त्रज्ञानीहि वॉट्सन्‌च्या कल्पनेस पाठिंबा दिला थॉर्न्‌डाइक्‌ने तयार केलेल्या परिणाम-नियमामध्ये सुख व दुःख याचा निर्देश मान्य करणे म्हणज एका तऱ्हेने जाणिवेसच मान्यता देणे होय, अशा कल्पनेने वर्तनवाद्यानी परिणाम-नियम मान्य करण्याचेच नाकारले व फक्त अभ्यास-नियमच त्यानी मान्य केला वॉट्सन्‌च्या मते पौनःपुन्य (Frequency) व नूतनत्व (Recency) या सबधीचे नियमहि अभ्यासनियमाचे पोटविभाग म्हणून मानावेत.

सुरुवातीच्या काळात वर्तनवाद हा शरीरशास्त्राचा एक भाग आहे अशी टीका करण्यात येई या आक्षेपास वॉट्सन्‌ने असे उत्तर दिले आहे की, वर्तनवादाने मनुष्याच्या प्रत्यक्ष कृतीचा अभ्यास करण्यास जरी जास्त महत्व दिलें असले तरी त्या वर्तनाच्या पाठीमागील व्यक्तिमत्वाकडे दुर्लक्ष केलेले नाही शरीरशास्त्रांत फक्त निरनिराळ्या अवयवाचे कार्य व वर्णन येवढेंच येतें; पण वर्तनवाद्यानी केलेल्या वर्तनाच्या अभ्यासात समग्र व्यक्तिमत्त्वाचाहि समावेश होतो.

स्मृतीचे स्पष्टीकरण करण्यास मात्र वर्तनवाद असमर्थ ठरला. इ. स. १९२४ साली स्मृतीबद्दल वॉट्सन्‌ने असे उद्‌गार काढले आहेत की, वस्तुनिष्ठ मानसशास्त्रात स्मृतीला स्थान नाही. वर्तनवादाच्या दृष्टीने स्मृति म्हणजे भावनात्मक प्रतिक्रियाचे पुनरुज्जीवन इतकेच.

विचार, क्रिया व भावना यांचें वर्णन वर्तनवाद्यांकडून अस्फुट वर्तन ( Implicit behaviour ) असें केलें जातें. विचार करणें म्हणजे अगदी

अस्फुट बोलणें व भावना म्हणजे आतड्यातील काही सूक्ष्म क्रिया. थोड्या वेगळ्या तऱ्हेने असें म्हणता येईल की, ज्या वेळी वस्तूवर प्रत्यक्ष प्रतिक्रिया न करता ती करण्याचा आपण फक्त बेत करतो त्या क्रियेस विचार म्हणावे. विचार करताना प्रत्यक्ष विषय किंवा तो दर्शविणारें चिन्ह आपल्यासमोर असते. अव्यक्त व्यापाराशी निगडीत न होता वास्तव व सार्थ अशा वस्तूच्या स्थानी अगर क्रियाच्या स्थानी प्रतीकात्मक वस्तु अगर क्रिया आणणे याचेच नांव विचारक्रिया *

जुन्या काळात हावभावाच्या साहाय्याने विचार व्यक्त करीत असत. हे हावभावहि वॉट्सन्च्या मतें विचारातच जमा होतात.

पण विचार करणे म्हणजे स्वगत हळूहळू बोलणे, हे सिद्ध करण्यासहि अंतर्निरीक्षणाखेरीज दुसरा मार्ग नाही. हा सिद्धान्त बऱ्याच अंशीं खरा आहे; पण तो वर्तनवाद्याच्या आधीच पुष्कळानी मान्य केलेला आहे. म्हणून त्यात वर्तनवादाचे वैशिष्टय असे काही नाही. वुड्वर्थ्च्या मते विचार म्हणजे अव्यक्त भाषण हा सिद्धान्त मान्य करतां येणार नाही. कारण (१) पुष्कळ वेळा आपल्या डोक्यात विषयाची कल्पना बरोबर असूनहि योग्य शब्द सुचत नाही. (२) नेहमीचे बोलणे म्हणजे विचार करणे असे म्हणता येणार नाही. (३) पुष्कळ वेळां विचार प्रत्यक्ष कृतीचा मार्ग दाखवितो व कृतीतील संबध स्पष्ट करतो

## भावना व सहजप्रवृत्ति यासबंधी वॉट्सन्चे सिद्धान्त

वॉट्सन्च्या मते भावना म्हणजे शरीरान्तर्गत एकूण स्थिरतेंत व विशेषत: नसा व ग्रंथि यामध्ये होणाऱ्या तीव्र विक्रिया प्रत्येक भावना शरीरातील विशिष्ट भागाच्या अंतर्गत स्थिरतेत होणारा फरक दाखविते. या व्याख्येचे स्वरूप सर्वसाधारणत: जेम्स्–लँग्च्या भावनेसंबंधीच्या सिद्धान्तासारखेच आहे. निरनिराळ्या अवयवाच्या प्रतिक्रियातून व्यक्त होणारी

* Thinking is substituting of symbolic objects and activities for the real and important ones without limiting ourselves to implicit movements as our symbols.

हीच भावना ही व्याख्या वॉट्सन्‌ला मान्य होती. कोणताहि भाव व्यक्त होतांना श्वासोच्छ्वास, नाडीचे ठोके, रक्ताचा दाब, चेहऱ्यावरील फेरफार व इतर अवयवाची हालचाल, वगैरे दृश्य गोष्टीचा प्रयोगशाळेंत आतापर्यंत बराच अभ्यास करण्यात आला आहे.

भावनेच्या वरील स्पष्टीकरणासंबधी अशी शका निर्माण करतां येईल की, दोन निरनिराळ्या भावना व्यक्त होताना सारखेच शारीरिक फरक दिसतील उदाहरणार्थ, राग आला म्हणजे ज्याप्रमाणे हात कापतील, हृदयाचे ठोके जलद पडू लागतील, डोक्याकडे जोराने रक्त वाहू लागेल, त्याचप्रमाणे भीति वाटल्यासहि हीच चिन्हे दिसतील तेव्हा फक्त शारीरिक फरकाच्या निरीक्षणाने भावना कशी निश्चित ठरविता येणार? वॉट्सन्‌ने लहान मुलात व्यक्त होणारे भाव तीन तऱ्हेचे असतात असे म्हटले आहे. भीति (fear), राग ( rage ) व प्रेम ( love ) या प्रत्येकाचे वर्णनहि केले आहे. नुकत्याच जन्मलेल्या मुलात या तीहीखेरीज इतर कोणतेच भाव व्यक्त होत नाहीत यावरून वॉट्सन्‌ने असें म्हटलें आहे की, मूळ भाव हे तीनच असतात. लहान मुलावर केलेल्या प्रयोगावरून असे सिद्ध झालें आहे की, एकदा लहानपणी मुलाच्या मनांत एखाद्या वस्तूबद्दल किवा व्यक्तीबद्दल मुद्दाम भीति निर्माण केली की ती कायम राहते

वॉट्सन्‌ने वर्तनवादाचे विशिष्ट म्हणून जे सिद्धान्त माडले त्यात सहजप्रवृत्तीचे जन्मापासून व आनुवंशिक दिसून येणारे वैशिष्टच अमान्य करण्यासबधीचा सिद्धान्त अत्यंत महत्त्वाचा मानला जातो. कोणत्याहि सामान्य मुलास योग्य ती परिस्थिति व शिक्षण दिल्यास त्याचा वाटेल त्या तऱ्हेचा माणूस यशस्वी तऱ्हेने बनविता येईल, असा वॉट्सन्‌ने दृढविश्वास प्रकट केला आहे. तर्कशास्त्रदृष्टचा या सिद्धान्ताने वर्तनवादाची बाजू कोणत्याहि तऱ्हेने बळकट होत नाही. कारण यांत जाणीव व अंतर्निरीक्षण अमान्य किवा मान्य करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही, व ही दोन्ही अमान्य करणें हाच वर्तनवादाचा पाया होय. वंशदाय व परिस्थिति यांबाबत वॉट्सन्‌चा सिद्धान्त मान्य किंवा अमान्य करण्यात वर्तनवादाची बाजू उचलून धरणें किंवा विरुद्ध बाजू घेणें यांपैकी कोणतीच गोष्ट साध्य

होत नाही. थोडक्यात असें म्हणता येईल की वशदाय व परिस्थिति हा प्रश्न मानसशास्त्रांतील कोणत्याहि पंथाच्या विशिष्ट दृष्टिकोनांतून सोडवित येणारा नसून तो अगदी स्वतंत्र आहे.

वॉट्सन्च्या सर्व लिखाणावरून एवढा निष्कर्ष मात्र निश्चित काढतां येईल की, तत्पूर्वकालीन मानसशास्त्राच्या सर्व कल्पना अमान्य करणे व नवीन शास्त्रीय पायावर मानसशास्त्राची उभारणी करणे हाच वॉट्सन्चा खरा उद्देश होता, व या उद्देशानुसारच वर्तनवाद तयार झाला

## इतर वर्तनवादी

( १ ) **मॅक्स् मेयर** :—इ स १९११ त याने लिहिलेल्या "The Fundamental Laws of Human Behaviour," या पुस्तकात वर्तनवादाचाच पुरस्कार केलेला दिसून येतो मेंदू व काय यांच्या कार्यावर मेयर्ने बरेच प्रयोग केले, व नतर त्याने असे सागितले की मज्जाततूच्या क्रियाचा अभ्यास म्हणजेच मानसशास्त्राचा अभ्यास होय मेयर्च्या मते मज्जाततूच्या प्रत्यक्ष क्रिया कशा घडून येतात, याचे वर्णन देण्यापुरता मानसशास्त्राने अतर्निरीक्षणाचा जरूर उपयोग करावा इ स १९२१ मध्ये मेयर्ने "The Psychology of the Other One" या पुस्तकात मानसशास्त्राने कशाचा अभ्यास करावा यासबधीचा स्वतःचा दृष्टिकोन माडला आहे मानसशास्त्राचा खरा विषय म्हणजे 'दुसऱ्याचे निरीक्षण' खरे पाहिले असता दुसऱ्या व्यक्तीचा किंवा प्राण्याचा अभ्यास करतानाहि अतर्निरीक्षणाची झाल्यास थोडीफार मदतच होते

(२) **वेज्** ( Weiss ):— हा मेयर्चाच विद्यार्थी होता. इ. स १९२५ मध्ये लिहिलेल्या 'A Theoretical Basis of Human Behaviour.' या पुस्तकात त्याने मानसशास्त्राचे वैज्ञानिक स्वरूप वर्णन केले आहे. मानसशास्त्राची मूलतत्त्वे इतर शास्त्राहून भिन्न असण्याचे काहीच कारण नाही. पदार्थ-विज्ञानशास्त्राप्रमाणेच मानसशास्त्राचीहि विद्युदणु (Electron) आणि प्राणु (Proton) हीच मूलतत्त्वे मानावीत असा वेज्चा दृष्टिकोन होता. त्याच्या मतें मनुष्य जे एकूण वर्तन करतो ते तो समाजात राहिल्या-

मुळे व इतर व्यक्तीशी त्याचा संबंध असल्यामुळेच करतो. म्हणून मानसशास्त्राला सामाजिक स्वरूप देणें ही गोष्ट फार महत्त्वाची आहे.

वर्तनवाद्याचें एकूण लिखाण पाहिले म्हणजे असें दिसून येईल की, आपला स्वतःचा असा नवीन दृष्टिकोन मांडण्यापेक्षा जुन्या मानसशास्त्रावर टीका करणे हाच त्याचा मुख्य हेतु होता. मन हा विषय व अंतर्निरीक्षण ही पद्धति नाकबूल करणे ह्याच गोष्टी वर्तनवादाच्या दृष्टीने जास्त महत्त्वाच्या होत्या.

**लॅश्ले** :— मेदूतील निरनिराळ्या भागाचा विशिष्ट वर्तनाशी संबंध जोडून वर्तनवादात महत्त्वाची भर टाकणारी जी कांही मंडळी आहेत त्यात लॅश्लेला प्रमुख स्थान द्यावे लागेल आत्मनिष्टता ( Subjectivism) ही मानसशास्त्राच्या दृष्टीने अगदी निरुपयोगी आहे वेदन, मानसिक प्रतिमा, वगैरे शब्दाना शास्त्रीय दृष्टया काही महत्त्व नाही असे याचे म्हणणे होतें. लॅश्लेचे अत्यंत महत्त्वाचे कार्य म्हणजे मेंदूच्या निरनिराळ्या भागाशी निरनिराळ्या तऱ्हेच्या वर्तनाचा निश्चित संबध दाखविणे हे होय. या तऱ्हेच्या संशोधनास इ. स १८०० त गॉल् याने प्रथम सुरवात केली होती. बऱ्याच प्रयोगानंतर लॅश्लेने असे सिद्ध केले की, मेंदूच्या ठराविक भागाकडून ठराविक क्रिया होत असतात व एखाद्या भागास दुखापत झाल्यास त्या भागाकरवी होणाऱ्या क्रियाहि थाबतात १९१४ सालच्या महायुद्धात दुखावलेल्या मेंदूच्या बऱ्याच लोकांची पाहणी करून लॅश्लेने आपल्या कल्पना सिद्ध करून दाखविल्या.

**मानसशास्त्राच्या इतिहासांत वर्तनवादाचें स्थान** :— वर्तनवादाचे मूल्यमापन करताना खालील गोष्टीचा विशेष उल्लेख करणे जरुरीचे आहे.

(१) मानसशास्त्राच्या अभ्यासपद्धतीत सुधारणा घडवून आणणें हें वर्तनवादाचे पहिले महत्त्वाचे कार्य होय. थॉर्न्डाइक् हा जर वर्तनवादाचा पहिला पुरस्कर्ता मानावयाचा असेल, तर वर्तनवादास इ. स. १८९८ पासूनच सुरवात झाली असे म्हणावे लागेल; पण त्याचे सर्वच सिद्धान्त पुढच्या वर्तनवाद्यानी मान्य केले नाहीत. पॅव्हलॉव्हची प्रतिक्षेपाची पद्धति वगळल्यास दुसरी कोणतीहि स्वतन्त्र अभ्यासपद्धति शोधून काढण्याचें श्रेय वर्तन-

वादास देतां येणार नाही. अंतर्निरीक्षण पद्धतीवर टीका केली; तरी ती पद्धत पूर्णपणें त्याज्य आहे, असे सर्व वर्तनवादी मानीत नाहीत. शाब्दिक निवेदन (Verbal Report) या नावाखाली केलेले अंतर्निरीक्षण बऱ्याच जणानी प्रयोगशाळेत मान्य केलेले दिसून येते.

(२) अभ्यासपद्धतीपेक्षाहि जुन्या मानसशास्त्रातील काही शब्द-प्रयोगास वर्तनवादाचा तीव्र विरोध असलेला दिसून येतो. मन, जाणीव, भावना, कल्पना, वगैरे शब्दापेक्षा शरीर-विज्ञानशास्त्रातले शब्दप्रयोग त्याना अधिक पसत पडतात.

(३) प्रतिक्रियेचा प्रत्यक्ष अभ्यास करून मानसशास्त्रात भर घालण्याची वर्तनवादाची कल्पना मात्र मानसशास्त्राच्या प्रगतीस खूप उपयोगी पडली.

(४) वर्तनवादाच्या दृष्टिकोनामुळे मानसशास्त्राच्या मर्यादा बऱ्याच वाढल्या. सामाजिक दृष्टीने व्यक्तीच्या वर्तनाचा अभ्यास करताना मानस-शास्त्र व समाजशास्त्र ही शास्त्रे एकमेकाच्या अगदी जवळ आली वॉट्-सन्च्या 'वर्तनवाद' या पुस्तकावर एक असा अभिप्राय आहे की "या नवीन पुस्तकाने एक नवीन पद्धति वाचकापुढे ठेविली आहे. इतकेच नव्हे तर एक मानसशास्त्रीय उपपत्ति आपल्यासमोर माडली आहे. जी उपपत्ति नीति-शास्त्र, धर्मशास्त्र, मानसशास्त्र इत्यादि आध्यात्मिक शास्त्रात क्रान्तिकारक ठरेल". वुड्वर्थ्च्या मते ' वर्तनवाद ' ही विचारप्रणाली नसून कार्यपद्धति आहे किवा कार्यपद्धतीपेक्षाहि ' वर्तनवाद ' हा एक आशावाद आहे असे म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल

वर्तनवादाचा आशावाद कितपत यशस्वी होईल, हा जरी विवाद्य मुद्दा असला तरी या विचारप्रणालीने मानसशास्त्रज्ञाला वैज्ञानिक स्वरूप देण्याचा जो महत्त्वाकाक्षी प्रयत्न केला तो खरोखरच कौतुकास्पद होय. सिद्धान्त शंभर टक्के खरे ठरोत वा न ठरोत ते ठासून सागण्याचे वर्तनवाद्याचे मनोधैर्य वाखाणण्यासारखें आहे.



प्रकरण २५ वें

# साकल्यवाद (Gestalt Psychology)



अमेरिकेंत जेव्हा वर्तनवादाचा प्रसार होत होता त्यावेळी जर्मनीमध्ये काही तरुण मडळी एका निराळ्याच दृष्टिकोनातून मानसशास्त्रावर टीका करू लागली होती याचेच पुढे एका स्वतत्र विचारप्रणालीत रूपान्तर झालें. Gestalt या शब्दाचा अर्थ आकार (Form किंवा Pattern) असा आहे. Gestalt या शब्दास Configuration हा इंग्रजी प्रतिशब्द सुचविला गेला व यावरून या मतप्रणालीस समाकारवाद अथवा समष्टिवाद असेहि सबोधण्यात येते; पण या मतप्रणालीच्या अतर्गत स्वरूपावरून तीस साकल्यवाद म्हणणेच अधिक चागले. कारण Gestalt याचा अर्थ सकल स्वरूप (whole) असा आहे व त्याची छाया या मतप्रणालीवर फार आहे.

इतर आधुनिक विचारप्रणालीप्रमाणे साकल्यवाद ही विचारप्रणालीहि जुन्या मानसशास्त्राविरुद्ध बड करण्याच्या प्रवृत्तीतूनच निर्माण झाली. हिच्या टीकेचा सर्व रोख साहचर्यवादाविरुद्ध, विशेषतः वुढ्ट् विरुद्ध होता. रसायन शास्त्राप्रमाणेच मानसशास्त्रातहि अनुभवाचे मूलघटक व त्याच्या एकत्रीकरणाने तयार झालेले सयुक्त अनुभव याचे अस्तित्व वुढ्ट्ने गृहीत धरले व त्याच्या प्रयोगशाळेत सयुक्त अनुभवाचे पृथक्करण करून त्याचे मूलघटक शोधून काढणे या दोन्ही कल्पना साकल्यवादाला पसंत नव्हत्या. फक्त बौद्धिक पातळीवरून अनुभवाकडे पाहण्याचा साहचर्यवादाचा दृष्टिकोनहि या लोकाना पसंत नव्हता. अभ्यासाच्या दृष्टीने शुद्ध वेदने ही संयुक्त अनुभवाचे मूलघटक मानणे हीच पहिली चूक आहे. कारण वुइल्यम् 'जेम्स्ने म्हटल्याप्रमाणे 'शुद्ध वेदन ही मानसशास्त्रातील एक दंतकथा आहे.'

वर्तनवाद व साकल्यवाद या दोघानीहि जुन्या मानसशास्त्राविरुद्ध टीका केली; पण त्याच्या दृष्टिकोनात बराच फरक होता हे खालील मुद्द्यावरून स्पष्ट दिसून येईल.

(१) अनुभवाच्या पृथक्करणाने ज्ञेयाचे सम्यक् स्वरूप कळत नाही, असे साकल्यवादाचे म्हणणे आहे. वर्तनवादाच्या मते पृथक्करण करावे; पण ते अनुभवाचें न करता वर्तनाचे करावे.

(२) साकल्यवादाला कोणत्याहि साहचर्याची कल्पनाच मान्य नव्हती. वर्तनवादाला कल्पनेचे साहचर्य जरी मान्य नव्हते, तरी चेतकाची व मज्जातंतूची प्रतिक्रिया याचे साहचर्य मान्य होते

(३) वेदने म्हणजे अनुभवाचे मूळ घटक ही कल्पना साकल्यवादास अमान्य होती. कारण अनुभवाचे पृथक्करणच अशक्य आहे असे त्याचे म्हणणे होते वर्तनवादाला पृथक्करण व मूळघटक याची कल्पना अमान्य नाही. फक्त त्याच्या मते वेदनाऐवजी प्रतिक्षेप क्रिया (Reflex) ही अनुभवाची मूलघटक मानावी.

(४) वर्तनाचे स्पष्टीकरण करण्यास निरुपयोगी म्हणून वर्तनवादास अंतर्निरीक्षणपद्धति अमान्य, तर साकल्यवादाला अंतर्निरीक्षणपद्धति तितकीशी अमान्य नव्हती. फक्त अनुभवाचे पृथक्करण करणे हे अंतर्निरीक्षणाचे कार्य नव्हे असे त्याचे म्हणणे होते

साकल्यवादाचा विरोध स्पष्ट करण्यासाठी प्रथम वुंद्ट्चा मानसशास्त्रासंबंधीचा दृष्टिकोन स्पष्ट करणें जरूर आहे. वुंद्ट्च्या मानसशास्त्राचा अभ्यासविषय जो अनुभव तो नेहमीच आपणास सयुक्त किंवा मिश्र स्वरूपात मिळतो. त्याचा प्रयोगशाळेत अभ्यास करताना कोणत्या मूलघटकापासून तो संयुक्त किवा मिश्र अनुभव तयार झाला, हें शोधून काढणे हें मानसशास्त्राचे मुख्य काम आहे. मूलघटक शोधावयाचे व ते कसे एकत्र येतात, त्या एकत्रीकरणाचे नियम तयार करावयाचे साकल्यवादाच्या पुरस्कर्त्यांनी या तऱ्हेच्या मानसशास्त्रास 'वीट-चुन्याचे मानसशास्त्र' (Brick and Mortar Psychology) असे विनोदाने म्हटले आहे. कारण अनुभवाची इमारत तयार करण्यास लागणारी वेदनें वुंद्ट्ने निर्माण केली;

पण त्याना सांधणारे दुवे मात्र शोधणें त्यास शक्य झाले नाही. व या अर्थीच जेम्स्‌ने म्हटलें आहे की, मानसशास्त्रातील पृथक्करणात्मक व संकलनात्मक प्रश्न हे सर्व बनावट आहेत, ते खरे प्रश्नच नव्हेत.

साकल्यवादाने फक्त जुन्या मानसशास्त्रावर टीका केली नाही. त्याचें मुख्य कार्य म्हणजे मानसशास्त्राचा अभ्यासविषय जो अनुभव, त्याला अंतर्गत विभागापलीकडे जें स्वतत्र समष्टिरूप आहे, त्याच्या अभ्यासाचे महत्त्व लोकाना पटवून देणें हे होय. या समष्टिरूपास त्यानी आकार-गुण (Form-quality) असे म्हटलें आहे. समष्टीची निर्मिति करणाऱ्या व्यक्तिघटकात न दिसणारा परतु समष्टीत स्वतत्रपणे व्यक्त होणारा विशिष्ट धर्म म्हणजेच आकार-गुण हा होय.

उदाहरणार्थ, निरनिराळे सूर मिळून एक आलाप तयार होतो, तरी आलापाला स्वतंत्र असे अस्तित्व आहेच प्रत्येक सुराचे वेगळें वर्णन हे आलापाचे वर्णन होणार नाही. कोणत्याहि अनुभवाचा अभ्यास करावयाचा अमल्यास त्याच्या वेगवेगळ्या भागाचा फक्त अभ्यास करून चालणार नाही. तो अनुभव जशाचा तसाच साकल्याने घेऊन त्याच्या एकूण स्वरूपाचा स्वतत्र अभ्यास केला पाहिजे. मूलघटक व सयुक्त घटक ही निरुपयोगी कल्पना टाकून देऊन जसा अनुभव मिळेल तसाच त्याच्या पार्श्वभूमीसकट तो विचारात घेऊन त्याचा अभ्यास केल्यासच मानसशास्त्राची खरी प्रगति होईल, असे साकल्यवादाचे म्हणणे आहे.

**संघटित समष्टिरूपास साकल्यवादाने दिलेलें महत्त्व**.— स्वतःच्या सिद्धान्तास पाठिबा देणारे असे बरेच प्रयोग साकल्यवाद्यानी करून पाहिले. व त्यामुळे त्याच्या दृष्टिकोनास बरेच महत्त्व प्राप्त झाले. त्यानी जे जे प्रयोग केले त्यापैकी भावना व व्यक्तिमत्त्व दर्शविणारे चेहऱ्यावरील भाव या संबधीचे प्रयोग विशिष्ट म्हणून सागता येतील. आतापर्यंत यासंबधी झालेल्या प्रयोगात पृथक्करणपद्धतीचा अवलंब केला गेला होता. पण समष्टिवाद्यानी प्रथमच असे दाखवून दिलें की, चेहऱ्यावरील सर्व भाव एकत्र घेऊन त्याचा स्वतंत्र विचार व निरीक्षण केल्याखेरीज व्यक्तिमत्व अभ्यासताच येणार नाही. आपल्या सिद्धान्ताच्या पुष्टचर्थ हे लोक सूर्यमालिकेचे (Solar System) उदाहरण नेहमी देतात. सूर्य-

मालिकेतील प्रत्येक ग्रह वेगळा विचारात न घेता सर्व ग्रहाच्या परस्पर-संबधित हालचालीचा एकत्रित विचार करूनच सूर्यमालिकेसबधीची महत्त्वाची माहिती जमा करता येते. विजेवर चालणाऱ्या निरनिराळ्या यत्राची उदाहरणेहि साकल्यवादाचा दृष्टिकोन स्पष्ट करण्याकरिता दिली जातात मानवी किंवा इतर प्राण्याचे शरीर म्हणजेसुद्धा एक स्वतंत्र संघटना असे धरून चालले पाहिजे नुसत्या निरनिराळ्या अवयवाच्या प्रतिक्रियाचा वेगळा विचार करून सघटित प्रतिक्रियेसबधी निर्णय घेऊन भागणार नाही शेरिंग्टन्ने मज्जातंतूच्या सघटित प्रतिक्रियेच्या अभ्यासावर जास्त भर दिला पाहिजे असे प्रतिपादन केले. कारण त्याच्या मते मूलप्रतिक्षेप हे फक्त एक वैचारिक गृहीतक आहे. पॅव्हलॉव्हने असाच निर्णय दिला आहे की, एकटा सापेक्ष प्रतिक्षेप हा स्वतत्रपणे कार्यक्षम नसतो निरनिराळे सापेक्ष प्रतिक्षेप हे एकमेकावर अवलबन असतात. लॅश्लेने केलेल्या मेंदूच्या अभ्यासावरूनहि त्याने असाच निष्कर्ष काढला आहे की, मेंदूचे सर्व भाग मिळून एक सघटित प्रतिक्रिया करतात ( The Brain works as a whole ) अशा तऱ्हेने निरनिराळ्या प्रयोगाचा आधार घेऊन समष्टिवाद्यानी असे सिद्ध केले की, वर्तनाचा अभ्यास पृथक्करणपद्धतीने न करता सर्व वर्तन एकत्र घेऊन त्याचे त्याच्या पार्श्वभूमीसह निरीक्षण केल्यासच मानसशास्त्रात महत्त्वाचे सिद्धान्त बसविता येतील

साकल्यवादात बऱ्याच मडळीचा समावेश होत असला तरी त्यातल्या त्यांत प्रमुख म्हणून वेर्थॉय्मर्, कॉफ्का व कोह्लर् याचा निर्देश करावा लागेल. फ्रँक्फर्ट् युनिव्हर्सिटीत या तिघानी मिळून बरेच प्रयोग केले. वेर्थाय्मरने केलेल्या मुक्तसाहचर्यावरील प्रयोगातून अस्फुट ज्ञानासबंधी जे निर्णय शोधून काढले त्याना प्रयोगाच्या जगांत बरेंच महत्त्वाचे स्थान आहे. वेर्थाय्मर् व कोह्लर् बर्लिन युनिव्हर्सिटीत काम करूं लागल्यापासून बऱ्याचशा मडळीवर साकल्यवादाची छाप बसून या तऱ्हेच्या विचारप्रवाहाचे बर्लिन हे केन्द्र बनले. अमेरिकेत याच विचारप्रणालीचे जे पुरस्कर्ते आहेत, त्यात आर्. एम्. ऑग्डेन् व आर. एच्. व्हीलर् याचा निर्देश प्रामुख्याने करावा लागेल.

इ स. १९१२ च्या सुमारास फरँक्फर्ट्मध्ये वेर्थाय्मर्ने गति ही प्रत्यक्ष दिसते, की आपण निरनिराळी स्वतंत्र वेदने एका ठराविक कालातराने अनुभविल्यास त्यावरून गतीचे फक्त अनुमान काढतों यावर प्रयोग केला. यापूर्वी बरीच वर्षें प्लॅट (Plateau) या शरीरशास्त्रज्ञाने असा एक प्रयोग करून दाखविला होता की, एखाद्या प्राण्याची काही चित्रे जर एकामागून एकसारखी दाखविली तर दृष्टीला तीं स्वतंत्रच चित्रे आहेत असें न दिसता तो एकच प्राणी निरनिराळ्या हालचाली करीत आहे असे दिसते यावरूनच पुढे चलच्चित्रपटाची कल्पना बसविली गेली. वेर्थाय्मर्नेहि अशी पुष्कळशी चित्रे ठराविक कालातराने दाखवून, निश्चित किती कालातर ठेवल्यास गतीचे अनुमान निरीक्षक काढतो या-सबधी आडाखे बसविले. तेव्हा त्यास असे आढळून आले की, जेव्हा हे कालातर $\frac{1}{१५}$ सेकद इतके केले, तेव्हा बघणाऱ्यास दोन वेगळी चित्रे आहेत असे न दिसता एकाच चित्राच्या हालचाली आहेत असे दिसले. या प्रयोगावरून त्याने असा निर्णय काढला की, गति ही आपल्या एकूण वेदनातच सामावलेली आहे. यावरून वेर्थॉय्मरने असा सिद्धान्त माडला की, मेदूचे कार्य हे फक्त मिळविलेल्या वेदनावरच होते असे नसून चेतकाचे एकूण स्वरूपहि मेदूकडून ग्रहण केले जाते, म्हणून आपण सघटित अशी प्रतिक्रिया करतो.

बाह्य वस्तूच्या अवबोधाबाबत साहचर्यवादाचे म्हणणे असे की वेदने ही अगदीच अर्थशून्य असतात. आपण अभ्यासाने त्याचा अर्थ लावू शकतो. साकल्यवादाला हे म्हणणे मान्य नाही. त्याच्या मते वेदनातच काही एका मर्यादित अर्थाचा समावेश केलेला असतो. प्रथम वेदने हीसुद्धा अगदीच अर्थशून्य असतात साकल्यवादात आकार (Figure) व पार्श्वभूमि (Ground) याचे फार महत्त्व आहे.

साकल्यवादाचे मते चाक्षुषवेदनात आकृति व तिची पार्श्वभूमि यास फार महत्त्व आहे, जेथे नैसर्गिक शक्यता असेल तेथे एखादी सुस्पष्ट आकृति व तिच्यापेक्षा कमी स्पष्ट अशी तिची पार्श्वभूमि अशा तऱ्हेची वेदनें दृष्टीस पडतात. या आकाराची व्याप्ति सबद्ध असून मागील पार्श्वभूमि म्हणजे अतराल असे दिसतें. अर्थात् पार्श्वभूमीपेक्षा आकृतीची संवेदना

जास्त तीव्र असल्याने आपलें लक्ष आकृतीकडे सहजच जातें. याचे उदाहरण म्हणून एखाद्या पार्श्वभूमीवर काढलेले ठिपके हे सागता येईल. अशा आकृतीत एक स्वतन्त्र ठिपका आपल्या दृष्टीत भरत नाही, तर काही ठिपक्याचा गट एखाद्या आकृतीरूपाने आपल्या दृष्टीत भरतो. ठिपक्याचे गट कशा तऱ्हेने होतील याबद्दल पुढील नियम सागता येईल. जे ठिपके जवळ जवळ असतील ते बहुतेक एका गटात समाविष्ट होतात. किवा ठिपक्यात जर रगाच्या व आकारांच्या तऱ्हा असतील, तर समान रंगाचे किंवा आकाराचे ठिपके एका गटात आणले जातात.

आकृति व तिची पार्श्वभूमि अशाच तऱ्हेचें वेदनाग्रहणाचे कार्य होतें. हा नियम फक्त चाक्षुषवेदनालाच लागू आहे, असे नाही तर तो इतर वेदनानाहि लागू आहे. याचे उदाहरण म्हणजे भोवतालच्या वातावरणात असख्य सूक्ष्म आवाज निघत असतात, पण त्यात जर एखादा नगारा धडाधड वाजत असेल, तर सूक्ष्म आवाजाच्या पार्श्वभूमीवर नगाऱ्याचा आवाज विशिष्ट म्हणून ऐकू येईल. किवा त्वचेवर हालणारी वस्तु सर्व सामान्यत्वाच्या वेदनापेक्षा तीव्रतेने ज्ञात होते.

निरनिराळे ठिपके असतील तेथे आकाराचे वेदन होणे किवा जी वस्तु भोवतालच्या वातावरणापेक्षा जास्त तीव्र वेदना देईल ती त्या वातावरणाच्या पार्श्वभूमीवर उठून दिसणे या गोष्टी आपण अनुभवाने शिकतो असे आतापर्यंतच्या मानसशास्त्रज्ञाचे म्हणणे होतें. पण वेदनाची सुसबद्धताहि मेदूच्या कार्यातूनच निर्माण होते, असे साकल्यवादाचे म्हणणे आहे. सर्व वेदनाना मेदूकडून आणलेली सुसबद्धता सारख्याच प्रमाणात असते असे नाही. पण वस्तूचा एखादाच भाग अर्थशून्य तऱ्हेने आपण वेदनाच्या द्वारे ग्रहण केला आहे असे मात्र कधीच होत नाही. मेंदूच्या प्रवर्तनशक्तीमुळे वेदनेहि नेहमीच विषयाच्या सामान्य स्वरूपाचा अवबोध करून देतात. याचाच पर्याय म्हणून असें म्हणता येईल की, ज्यावेळी वेदनाच्या द्वारे वस्तूच्या सामान्य स्वरूपाचा अवबोध होणार नाही, त्या वेळी मेदूच्या कार्यात काहीतरी बिघाड झाला आहे असें समजावें. उलट ज्यावेळी वेदनें वस्तूच्या सामान्य स्वरूपाचें यथार्थ दर्शन देऊं शकतील त्यावेळीं मेंदूचें कार्य पूर्णपणे समतोल आहे असें मानण्यास प्रत्यवाय नाही.

मेंदूचे हे अवबोधात्मक कार्य ध्यानात घेतल्याखेरीज कोणत्याहि वर्तनाचे यथार्थ निरीक्षण करून त्यावरून सिद्धान्त काढताच येणार नाहीत असे साकल्यवादाचें ठाम मत आहे हटर् या वर्तनवाद्याचे असे म्हणणे होते की, मानसशास्त्राने फक्त सजीव प्राण्याच्या वर्तनाचा अभ्यास केला म्हणजे झाले. भोवतालाच्या वातावरणाचा मानसशास्त्राच्या अभ्यासांत समावेश करण्याचे काही कारण नाही. पण साकल्यवादाच्या मतें कोणत्याहि प्राण्याचे वर्तन |त्याच्या भोवतालच्या वातावरणापासून वेगळें काढताच येणार नाही. ज्या वातावरणात प्राणी वागत असेल त्या वातावरणासकट त्याच्या वर्तणुकीचा अभ्यास केल्यासच तिचा खरा अर्थ आपणास लावता येईल.

## साकल्यवादाच्या दृष्टिकोनांतून केलेला वर्तनाचा अभ्यास

**चेतक**—प्रतिक्रिया हा सर्व वर्तनाचा पाया मानण्याची कल्पना साकल्यवादास मान्य नाही. अशा तऱ्हेचे मूलघटक वर्तनाच्या पृथक्करणातून दिसतात हेच बुद्धीला पटण्यासारखे नाही. इतकेच नव्हे, पण चेतक व प्रतिक्रिया याच्यात निसर्गतः किवा अनुभवाने काही दुवे तयार होऊं शकतात हीहि कल्पना खरी नाही. प्राण्याच्या निरनिराळ्या प्रवृत्ति म्हणजे साध्या प्रतिक्षेपक्रियाच्या साखळ्याच होत, हा हर्बर्ट् स्पेन्स्‌चा बऱ्याच वर्तनवाद्यानी मान्य केलेला सिद्धातहि साकल्यवादास मान्य नाही. त्याचप्रमाणे अभ्यासप्राप्त वर्तन म्हणजे निरनिराळ्या प्रतिक्षेपक्रियाच्या मुद्दाम सापेक्षतेने एकमेकास जोडून तयार झालेल्या साखळ्याच होत, हेहि खरे नव्हे. साकल्यवादाच्या मते अशा तऱ्हेने वर्तनाचे पृथक्करण करणेंच चुकीचे आहे. मुलाच्या मेंदूच्या कार्यात प्रथम प्रथम सुसंबद्धता व काटेकोरपणा कमी असतो. व अनुभवाने हे दोन्ही गुण वाढत जातात. पण मेंदूच्या कार्याचे सामान्य स्वरूप मात्र प्रथमपासून शेवटपर्यत एकाच तऱ्हेचे असतें. दुसरें असे की, सापेक्षप्रतिक्षेप क्रियातून जो एकप्रकारचा यात्रिकपणा दर्शविला जातो, तोहि चुकीचा आहे. बाल्यावस्थेपासून सर्व प्राण्याच्या वर्तनात सहेतुकता असते ही गोष्ट सिद्ध करण्यासाठी प्रो. कर्ट् लेविन् याने पुढील उदाहरण दिले आहे. एखादे पत्र पोस्टाच्या पेटीत टाकण्यासाठी बाहेर जाताना मी

खिशांत ठेवतो. या वेळी पत्र व पोस्टाची पेटी या दोन कल्पनाचे साहचर्य माझ्या मनात पक्के होते. रस्त्यावर पहिलीच पोस्टाची पेटी नजरेस पडताच मला पत्राची आठवण होते व मी खिशातून पत्र काढून पेटीत टाकतों अशा तऱ्हेनें कार्य झाल्याबरोबर या दोन कल्पनाचे पक्के झालेले साहचर्य लगेच नाहीसे होते. पोस्टाची पेटी पाहणे व खिशातून पत्र काढून तीत टाकणे ही क्रिया जर सापेक्ष प्रतिक्षेप असती तर दुसरी पोस्टाची पेटी नजरेस पडताच पत्र काढण्यासाठी खिशात हात गेला असता, पण तसे होत नाही. याचाच अर्थ असा की, हेतु साध्य झाल्यानतर वर्तनातील निरुपयोगी दुवे आपोआप नाहीसे होतात. या उदाहरणावरून प्राण्याची वर्तणूक हेतुपूर्ण असते हे सिद्ध होते

जेव्हा प्राणी एखादी कृति करण्यास सुरवात करतो, तेव्हा त्याच्या मज्जाततूत एक प्रकारचा ताण ( Tension ) निर्माण होतो, व कृतीचे ध्येय साध्य झाले म्हणजे हा ताण आपोआप नाहीसा होतो कोणतीहि कृति सुरू झाल्यापासून सपेपर्यंत जे मध्यतर ( Gap ) असते ते भरून काढण्याचा प्राणी सतत प्रयत्न करीत असतो.

**साकल्यवादांतील अंतर्दृष्टीची कल्पना** Insight कोह्लर्ने माकडावर केलेल्या प्रयोगावरून उत्तम तऱ्हेने स्पष्ट होते. इ. स. १९१३ च्या सुमारास कॅनरी बेटात टेनेरिफ् येथे कोह्लर्ला शिपाझीचा मानसशास्त्रदृष्टया अभ्यास करण्यासाठी पाठविण्यात आले. पुढे महायुद्ध सुरू झाल्याने तो चार वर्षे तेथेच अडकून पडला. या कालात त्याने शिपाझी वानर नवीन गोष्ट कशी शिकतात, त्याच्या शिकण्यात काही बुद्धिमत्तेचा भाग दिसून येतो की फक्त यत्नस्खलितपद्धतीनेच ते सर्व गोष्टी शिकतात, यासबधी बरेच प्रयोग केले. त्याच्या मते बुद्धिमत्तेत काही भाग तरी उपजत असला पाहिजे. पुढे ठेवलेल्या एकूण जिनसाचे निरीक्षण करून न चुकता योग्य त्या वस्तूच्या मदतीने दिलेला प्रश्न जर सोडविता आला तर हे प्राणी नवीन ज्ञान मिळविताना काही बुद्धि वापरतात असें सिद्ध होईल. कुत्री, माजरे व इतर लहान प्राणी प्रयोगासाठी घेऊन थॉर्न्डाइक्ने असें सिद्ध केले होते की, या प्राण्याना विशेष बुद्धिमत्ता नसते. निरनिराळ्या बुद्धिहीन प्रयत्नातूनच शेवटी प्रश्नाचे योग्य तें उत्तर प्राणी

शोधून काढतात. सामान्यत: सर्वच प्राणी या पद्धतीने शिकतात, अशी तेव्हापासून सर्वांची समजूत होती. कोह्लर्ला हे पटेना त्याच्या मतें थॉर्न्डाइक्ने प्रयोगास घेतलेल्या प्राण्यासाठी जे पिंजरे व इतर कूटसाधने वापरली होती, त्यातील सर्व भाग प्राण्यास एकाच वेळी प्रत्यक्ष दिसत नसत. उदाहरणार्थ, काही अडथळे वाटेत ठेवून पलीकडे जर खाद्य ठेवले तर सर्व अडथळ्याचे स्पष्ट स्वरूप डोळ्यास न दिसल्याने प्राण्याला त्यातून मार्ग काढण्यास बुद्धीचा काही उपयोग होत नसे. अर्थात् परत प्रयत्न करीत राहणें त्यास भाग पडे. जर अडथळ्याचे सर्व मार्ग प्राण्यास दिसू शकले तर तो प्रथमच जो प्रयत्न करील त्यात त्याची उपजतबुद्धि नक्कीच दिसून येईल अशा तऱ्हेची विचारसरणी कोह्लर्ने मांडली. व शिपाझीवर बरेच प्रयोग केल्यानतर वरील स्पष्टीकरणास दुजोराच मिळाला पिंजऱ्यात खूप उचावर ठेवलेले खाद्य काढून घेण्यासाठी उपयोगी पडतील अशा वस्तूंचा (पेट्या, काठ्या वगैरे) नेमका उपयोग करून शिपाझी ते मिळवी असे दिसून आले. त्याच्या मते याचे मुख्य कारण असे की, इष्ट वस्तु मिळविण्यास भोवतालच्या कोणकोणत्या वस्तूंचा उपयोग करून घेता येईल याचा विचार करण्याची उपजतबुद्धि प्राण्यात असते. नवीन ध्येय गाठताना हीच बुद्धि प्राणी वापरतो अशा तऱ्हेच्या प्रयोगावरून कोह्लर्ने असा निर्णय दिला की, खालच्या दर्जाचे प्राणी शिकताना फक्त बुद्धिशून्य अशी यत्नस्खलितपद्धतिच वापरतात, हे थॉर्न्डाइक्चे म्हणणे खरे नाही

आतापर्यंत माणसे व इतर प्राणी याच्या शिकण्यासबधी बरेच प्रयोग झाले होते. जी. इ. मुलर्ने कोणतीहि नवीन गोष्ट स्मरणात ठेवताना पाठाचे, मजकुराचे विभाग वगैरे पाडून इतर काही युक्त्याप्रयुक्त्या लढवून माणसे कसे बुद्धिपुरस्सर पाठातर करतात हे दाखविले होते उलट पॅव्हलॉव्हच्या प्रयोगानी शिकण्याच्या क्रियेचे यात्रिक स्वरूप दाखविले गेले साकल्यवादाला प्रथमपासूनच साहचर्याची कल्पना पसंत नव्हती मग ते साहचर्य कल्पनेतील असो, किवा चेतक-प्रतिक्रियेतील असो, नैसर्गिक असो किंवा अनुभविक असो. कोह्लर्च्या प्रयोगावर आधारून कॉफ्कानेहि असाच सिद्धान्त मांडला की, कोणत्याहि प्राण्याचे अध्ययन किवा नैपुण्य-

सपादन अन्तर्दृष्टीच्या साहाय्यानेच होतें. यत्नस्खलित पद्धतीसबंधी थॉर्न्डाइक्ने मांडलेला सिद्धान्त चुकीचा आहे. प्राणी शिकत असताना त्याच्यांत हळूहळू कशी प्रगति होत जाते यासबधीचा जो आलेख थॉर्न्डाइक्ने काढून दाखविला आहे त्यावरून त्याने कोणत्याहि तऱ्हेची उपजतबुद्धि अमान्य केली आहे. काही वेळी मुळीच प्रयत्न न करता प्राणी प्रश्नाचे योग्य उत्तर शोधून काढतो, याचे स्पष्टीकरण थॉर्न्डाइक्च्या मतें प्रश्नाचा साधेपणा व काफ्काच्या मते अन्तर्दृष्टि कॉफ्काने असे म्हटले आहे की यत्नस्खलित-पद्धतीने कोणतीहि नवीन गोष्ट शिकणे अशक्य आहे. कारण या पद्धतीत प्राण्याचे होणारे वर्तन हेतुपूर्ण नसतें. यत्नस्खलितपद्धतिच जर सर्व प्राण्याच्या वर्तनाच्या मुळाशी असेल तर धडपडीचा हेतु व साध्याची कल्पना प्राण्यास आयुष्यात केव्हाच होत नाही, असें म्हणावे लागेल. प्राण्याच्या प्रगतीच्य अवस्था थॉर्न्डाइक् यात्रिक म्हणून वर्णन करतो. त्या यात्रिक नसून अन्तर्बुद्धीच्या निदर्शक आहेत, असे कॉफ्काचे म्हणणें आहे.

वरील सर्व स्पष्टीकरणावरून अ दिसून येईल की साकल्यवादाचा भर मुख्यत' शिकण्याच्या क्रियेतील अवबोधात्मक भागाकडे आहे. शिकणें म्हणजे काहीतरी नवीन ज्ञान आत्मसात् करणे व अशातऱ्हेच्या शिकण्याचें स्पष्टीकरण नुसत्या क्रियात्मक मज्जातंतूच्या हालचाली स्पष्ट करून होणार नाही. म्हणून कोणतीह गोष्ट शिकताना बुद्धीची सुरवातीची अवस्था व ती गोष्ट आत्मसात् केल्यानतरची बुद्धीची अवस्था या दोन्हीतील मध्यतर (Gap) भरून काढण्यास अन्तर्दृष्टीची मदत घेतल्याखेरीज गत्यतर नाही, असे साकल्यवादाचे म्हणणे आहे. या सिद्धान्ताला पुष्टि देणारे म्हणून पुढील उदाहरण देता येईल : एखाद्या प्राण्यापुढे दोन पेट्या ठेवून त्या पेट्यापैकी कोणतीत अन्न आहे हे त्यास ओळखण्यास लावावे या दोन पेट्यापैकी एकीचा रग अगदी फिकट निळा (किवा इतर कोणताहि) व दुसरीचा जरा गडद निळा ठेवावा. गडद रंगाच्या पेटीत अन्न आहे हे प्राण्याला एकदा समजून आले की त्यापैकी फिक्या निळ्या रंगाची पेटी काढून टाकून तिच्याऐवजी थोडी गडद व खूप गडद अशा निळ्या रंगाच्या पेट्या प्राण्या-पुढे ठेवल्यास तो गडद रंगाच्या पेटीत अन्न शोधतो. यावरून प्राण्याच्या चाक्षुषवेदनातून त्यास रंगाच्या तीव्रतांशाचीच कल्पना येते, अन्नाच्या विशिष्ट

पेटीची कल्पना येत नाही, असे दिसते, व यावरून प्राण्याच्या वेदनांत अवबोधाचा भाग असतो हे सिद्ध होते. शिकण्याची मानसिक क्रिया स्पष्ट करण्यासाठी आतापर्यन्त एकूण तीन निरनिराळे सिद्धांत, निरनिराळ्या लोकांनी, पुढे माडलेले आपण पाहिले.

(१) थॉर्न्डाइक्ची यत्नस्खलितपद्धति. हिच्यामध्ये बुद्धिमत्तेचा काही विशेष भाग नाही

(२) पॅव्हलॉव्हची सापेक्ष प्रतिक्षेप क्रिया. ही अध्ययनाचे स्पष्टीकरण करते, व यानुसार शिकणे म्हणजे निरनिराळे सापेक्ष प्रतिक्षेप प्रस्थापिणे ( Learning is conditioning ).

(३) साकल्यवादाच्या मते उपजतबुद्धीचे अस्तित्व मान्य केल्याखेरीज शिकण्याच्या क्रियेचा उलगडाच होणार नाही नवीन ज्ञान मिळविण्यापूर्वीची बुद्धीची अवस्था व ते मिळविल्यानतरची बुद्धीची अवस्था या दोन बिदूमधील अतर उपजतबुद्धीच भरून काढते

अशा रीतीने साकल्यवादाने स्वतःच्या स्वतत्र अशा दृष्टिकोनाने मानसशास्त्रात फार महत्त्वाची भर घातली आहे. कारण मज्जाततूच्या अभ्यासावरच वर्तनवादाने सर्व भर दिला, वेदनात्मक पृथक्करणावर घटकवादाने भर दिला, तर साकल्यवादाने अवबोधाचा शास्त्रदृष्टचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला. वेदनानी व कारक मज्जाततूनी केलेली प्रतिक्रिया, या क्रिया अध व यात्रिक नसून त्यात बुद्धीचा भाग आहे. अगदी खालच्या दर्जाच्या प्राण्यातसुद्धा उपजतबुद्धि असते ही गोष्ट मान्य केली पाहिजे. मेदूचे एकूण कार्य यात्रिक दुवे जळविणे एवढेच नसून त्यात अवबोधाचाहि समावेश होतो अशा रीतीने वेदने व मज्जातत् याचे प्रतिक्षेप व तद्गत संबध आणि त्याचप्रमाणे प्रगतिमान सघटनेची प्रक्रिया हे शिक्षणक्रियेतील मुख्य घटक आहेत, ही फार महत्त्वाची गोष्ट साकल्यवादानेच प्रथम मानसशास्त्रज्ञापुढे माडली.

## प्रकरण २६ वें

# मनोविश्लेषणवाद



आतापर्यंत आपण अभ्यासिलेले वर्तनवाद व साकल्यवाद याचा उगम मानसशास्त्रातच सापडतो पण मनोविश्लेषणवादाचा जन्म मानसशास्त्राच्या, विशेषत: विश्वविद्यालयीन मानसशास्त्राच्या कक्षेबाहेर झाला. वैद्यकात काही विशिष्ट रोगावर उपचार करतानाच मनोविश्लेषणाची कल्पना काही वैद्यकशास्त्रज्ञाना सुचली एका दृष्टीने मनोविश्लेषणवादी मानसशास्त्र हे वर्तनाचे मानसशास्त्र असे म्हणता येईल परतु येथे वर्तन या शब्दाचा अर्थ मात्र वर्तनवादातील वर्तनाच्या अर्थापेक्षा निराळा आहे काही वेळा मनोविश्लेषणवादास ' गाढ मानसशास्त्र ' ( Depth Psychology ) असेहि सबोधण्यात येते कारण जाणिवेच्या खाली खोल ज्या काही मानसिक कल्पना, विकार व विचार दडलेले आहेत, त्याचा अभ्यास मनोविश्लेषणवाद करतो काही वेळा मनोविश्लेषणवादास 'भावनिक मानसशास्त्र' (Feeling Psychology ) असेहि नाव देण्यात येते कारण याच्या मते मानवी जीवनाच्या इतिहासात बुद्धीपेक्षा भावनाच्या घडामोडीला जास्त महत्त्वाचे स्थान आहे. साराश, १९ व्या शतकात मानसशास्त्राच्या अभ्यासाला जे रुक्ष व केवळ बौद्धिक वळण लागत चालले होते, त्यात मनोविश्लेषण-वादाच्या भावनात्मक दृष्टिकोनाने बदल घडवून आणला. त्याचप्रमाणे १९ व्या शतकातील मानसशास्त्राची बरीचशी उभारणी शरीरशास्त्रावरच केली जावी असा सूर बऱ्याच शास्त्रज्ञाचा होता. तो मनोविश्लेषणवादास मान्य नव्हता. शारीरिक क्रियाचेच एका ठराविक दृष्टिकोनातून केलेलें स्पष्टीकरण म्हणजे मानसशास्त्र ही व्याख्या खोडून काढून मानसिक प्रक्रिया किती स्वतत्र स्वरूपाच्या असतात व त्याचा वर्तनावर कसा खोल परिणाम

होतो, हे मनोविश्लेषणवादाने दाखवून दिले. काही मानसिक विकृतीचा अभ्यास करताना त्याचे मूळ कारण मानसिक घडणीतील ठेवण, विकृति, सवयी, विचार किंवा कृति अथवा भावनात्मक प्रसंगातील चमत्कारिक घटना यात सापडते, असे दिसून आल्यामुळे मनोविश्लेषणवाद्यानी या दृष्टीने व्यक्तीचा अभ्यास करण्यास सुरुवात केली.

मनोविश्लेषणवादाचा ‘ मोहविद्येशी ’ (Hypnotism) फार निकटचा सबध आहे. १७८० च्या सुमारास मेस्मर्‌ने ही विद्या रोगनिवारणाच्या कामी बरीच उपयुक्त ठरते असे दाखवून दिलें. फ्रान्समध्ये १८२५ ते १८९३ या कालात पॅरिसचे काही शास्त्रज्ञ व नॅन्सीचे शास्त्रज्ञ या दोन गटात खपच तीव्र झगडा चालू होता मोहवश होणाऱ्या मनुष्यातच उन्माद किवा इतर मज्जाततुगत (Neurotic) विकार आढळून येतात असे पॅरिसच्या शास्त्रज्ञाचे म्हणणे होते. याच्या उलट नॅन्सीच्या शास्त्रज्ञाच्या मते मोहवशता ही थोड्याफार प्रमाणात प्रत्येक सामान्य माणसातहि आढळते; मोहविद्या म्हणजे सूचनाच्या साहाय्याने निर्माण केलेले ग्रहण-शक्तीचे उद्दीपन होय.

पॅरिसगटापैकी शॉरकॉसारख्या काही शास्त्रज्ञानी मज्जाततुगत विकृ-तीचा मोहविद्येच्या मदतीने बराच अभ्यास केला. १८५९ च्या सुमारास पॅरिसचा पेरी जेन् हाहि अशा तऱ्हेच्या विकृत मनस्थितीचा अभ्यास करीत होता. पुढे मज्जाततुगत विकृतीच्या अभ्यासाकडे त्याने आपले सर्व लक्ष केन्द्रित केले त्याला असे आढळून आले की मोहावस्थेत एरवी न आठव-णाऱ्या गोष्टी माणसाला आठवतात व त्यावेळी जर त्याचे परिमार्जन निश्चयात्मक आवाजात केले तर त्या माणसाची विकृति नाहीशी होते. भूतकालांत भावनाना मिळालेल्या धक्क्यांत पुष्कळशा मानसिक विकृतीचे मूळ आढळते. त्या धक्क्याचे परिणाम जर मानसशास्त्रज्ञ एखाद्या पद्धतीने नाहीसे करू शकला, तर बऱ्याचशा मानसिक व्यथा नाहीशा करता येतील. अशा तऱ्हेचा सिद्धान्त जेन्‌ने माडला. ही मनोविश्लेषणवादाची पार्श्वभूमि म्हणून सागतां येईल.

## फ्रॉइड्चे सुरवातीचे प्रयत्न

मनोविश्लेषणपद्धतीचा निर्माता सिग्मड् फ्रॉईड् याचा जन्म १८५६ साली झाला पूर्वायुष्याचा बराचसा भाग त्याने व्हिएन्नातच घालविला. वैद्यकशास्त्र शिकतानाच त्याच्या मानसशास्त्रीय बाजूकडे त्याचे लक्ष वेधले. पाचसहा वर्षे शरीरशास्त्राच्या प्रयोगशाळेत काम केल्यानतर त्याने वैद्यकीचा धदा सुरू केला. १८८१ सालच्या सुमारास त्याने मज्जाततूचा विशेष अभ्यास सुरू केला. व मेदूचे रोगनिदान व त्यावर उपचार याकडे त्याचें लक्ष वेधले. त्यावेळी व्हिएन्नात अशा तऱ्हेच्या मेदूच्या व मज्जाततूच्या विकृतीवर काहीच इलाज करता येत नसत इ. स. १८८५ च्या सुमारास शॉर्कॉची कीर्ति ऐकून फ्रॉइड् पॅरिसला गेला एक वर्षपर्यन्त शॉर्कॉ-जवळ त्याने अभ्यास केला. मोहिनीविद्येच्या साहाय्याने उन्मादावस्थेवर यशस्वी उपचार करण्याच्या शॉर्कॉच्या हातोटीचा फ्राईड्वर बराच परिणाम झाला. शॉर्कॉच्या तोडून त्याने असेहि ऐकले की पुष्कळशा मानसिक व्यथाच्या मुळाशी लैंगिक भावना असते. असे असेल तर अशा तऱ्हेच्या निरनिराळया रोग्याचे परीक्षण करताना शॉर्कॉ या तत्त्वाचा का उपयोग करीत नाही असा प्रश्न फ्राईड्च्या डोक्यात घोळू लागला.

इ. स. १८८६ त फराईड् व्हिएन्नाला परतला व त्याने मज्जाततूचे विकार व उन्मादावस्था या दोन्हीवर उपचार करण्यास सुरुवात केली. मोहिनीविद्येचाच उपयोग त्याने सर्व रोग्यावर चालू ठेवला होता पण पुढे पुढे त्याला अशी अडचण भासू लागली की प्रत्येक रोग्यात अशी मोहावस्था निर्माण होतेच असे नाही. व काही रोग्यात अशी अवस्था निर्माण झाली तरी रोगाचें मूळ कारण शोधणे अशक्य होई. ही अडचण दूर करण्यासाठी त्याने परत फरान्सला जाऊन नॅन्सी येथील शास्त्रज्ञाबरोबर विचार-विनिमय केला. तेव्हा त्याला समजले की त्या शास्त्रज्ञानासुद्धा हॉस्पिटल-मधील रोग्यात मोहावस्था ज्याप्रमाणात निर्माण करणे शक्य होई तितक्या प्रमाणात घरगुती रोग्यावर ही पद्धत यशस्वी करता येत नसे. ज्या प्रमाणात रोगी जास्त बुद्धिमान् असेल त्या प्रमाणात मोहावस्था निर्माण करणें अधिक जड जाई. अशा रीतीने नॅन्सीच्या शास्त्रज्ञाकडेहि निराशा झाल्या-

मुळे फ्राईड् परत व्हिएन्नाला आला, व त्याने धंद्याला सुरवात केली. डॉ० ब्रूअर् याची व त्याची भेट यानंतर झाली.

ब्रूअर्हि प्रथम शरीरशास्त्राचा अभ्यास करून नंतरच वैद्यकीकडे वळला. त्याने फ्राईड्बरोबर मज्जाततुविकार झालेल्या रोग्यावर उपचार करण्यास सुरवात केली. एका उन्माद झालेल्या बाईवर उपचार करता करतां त्यास असे आढळून आले की, मोहावस्थेत जेवढ्या गोष्टी रोग्याच्या डोक्यात येतील तेवढ्या बोलून टाकण्यास जर त्यास संधि दिली किंबहुना त्यातील चुकीच्या कल्पनाची जर दुरुस्ती केली तर त्याचा रोग्याच्या मेंदूवर चागला परिणाम होतो या तऱ्हेचा प्रयोग पुष्कळ रोग्यावर यशस्वी झाल्यानंतर इ. स. १८९३ ते १८९५ च्या सुमारास ब्रूअर् व फ्रॉईड् यानी आपले अनुभव प्रसिद्ध केले. त्याच्या या पद्धतीस उद्गीरण पद्धति (Talking out Method) असे नाव त्यानी दिलें याच सुमारास जेन्नेहि उन्माद झालेल्या रोग्याबाबत आपले अनुभव प्रसिद्ध करून त्यात असाच निर्णय दिला की मोहावस्थेच्या साहाय्याने भूतकाळातील घटनाची स्मृति जागृत करून कोणत्या विशिष्ट विकारात उन्मादाचे मूळ कारण आहे हे रोग्याच्या तोडून वदवून घेणे फार सोयीचे होते पुष्कळशा अभ्यासावरून असें दिसून आले की ज्या भावना अगर विचार व्यक्त करण्याची मनुष्यास लाज वाटते त्या भावना व विचार प्रयत्नपूर्वक दाबून मनातून नाहीसे करून टाकण्याचा ो प्रयत्न करतो. पण हे भाव नाहीसे न होता मनात खोल नेणिवेत दडून बसतात व जाणीव कमकुवत झाल्याबरोबर जोराने उफाळून येऊन त्याचा परिणाम मनुष्याला उन्मादासारखे मज्जाततुविकार होण्यात होतो.

उद्गीरण-पद्धतीने रोग्याना उपचार करता करता एक तरुण स्त्री दुखणें बरे झाल्यानंतरहि ब्रूअर्चा परिचय तोडण्यास तयार होईना. कारण तिला ब्रूअर्बद्दल विलक्षण आकर्षण वाटू लागले होते. यामुळे ब्रूअर् गोंधळून गेला. उद्गीरण-पद्धतीने रोग्यांना उपचार करण्यामुळे फारच चमत्कारिक परिणाम होतात, अशा समजुतीने फ्रॉईड्बरोबर पुढे काम करण्यास त्याने नकार दिला. फ्रॉईड्लाहि अशा तऱ्हेचे काही अनुभव आले; पण त्याने या घटनेचा असा उलगडा केला की मज्जाततुविकार

झालेल्या तरुण स्त्रिया डॉक्टरकडे प्रत्यक्ष आकर्षित होत नाहीत तर त्याच्या मनात जी सुप्त प्रेमव्यक्ति असते तिचीच प्रतिमा म्हणून त्या डॉक्टरावर ते अतृप्त राहिलेले प्रेम करू लागतात. म्हणून फ्रॉईड्च्या मते अशा घटनेने डॉक्टरने घाबरून जाण्याचे कारण नाही.

मोहावस्था निर्माण करून उद्गीरण-पद्धतीने रोगाचे मूळ शोधून काढून रोग बरा करण्याच्या प्रयत्नात फ्रॉईड्ला हळूहळू चागलेच यश येत चालले व त्याने मज्जाततुविकृतीसबधी माडलेल्या सिद्धान्तास व पद्धतीस मान्यताहि मिळू लागली. इ स. १९०० च्या सुमारास व्हिएन्नात फ्रॉईड्ला बरेच अनुयायी मिळाले १९०८ साली सर्व देशातील मानसोपचार तज्ज्ञाची पहिली परिषद भरली

## मानसोपचार पद्धतीची वाढ

याच सुमारास मानसोपचार-तज्ज्ञाना अशी कल्पना सुचली की काही लैंगिक कल्पनाचे काही वस्तूशी किवा घटनाशी दृढ साहचर्य असते. या चिन्हस्वरूप ( Symbolic ) गोष्टी जर स्वप्नात दिसल्याचे रोग्याने सागितले तर त्यावरून त्याच्या रोगाला कारणीभूत असलेल्या मूळ कल्पनाचा शोध ताबडतोब लागतो. काही काल या चिन्हस्वरूप गोष्टीना फार महत्त्व प्राप्त झाले होते, पण हल्ली ते परत कमी होत चालले आहे.

स्वप्नाचे पृथक्करण व मुक्त साहचर्य ( Free Association ) या दोहोच्या साहाय्याने फ्रॉईड्ने उन्माद, मज्जाततूच्या विकृतीने निर्माण होणारे भय, निरनिराळ्या भावनाचे व कृतीचे विरोध व वर्तनाची विसगति वगैरे व्याधि बऱ्याच प्रमाणात यशस्वी रीतीने बऱ्या केल्या. पण पुढे पुढे त्याला असे आढळून आले की अशी दुखणी जरी तात्पुरती बरी झाली तरी पुन्हा कोणत्या तरी निराळ्या स्वरूपात रोग्याला त्रास देऊ लागतात. हे पाहिल्यानंतर फ्राईड्ला असे वाटले की नेणिवेचे अपूर्ण उत्खनन हेच याचे कारण असले पाहिजे. म्हणून ज्या रोग्याना परत त्रास सुरू झाला होता अशा बऱ्याच जणावर उपचार करून आणखी कांही तापदायक कल्पना नेणिवेंत सांपडतात की काय हे त्याने पाहिले. परत उपचारानंतर काही रोग्याना चागलें बरें वाटू लागल्याचेंहि त्यास आढळून

आलें. बराच विचार केल्यानंतर फ्राईड्ला असें दिसून आलें की पुष्कळशा रोग्यात मज्जातंतुविकृतीचे कारण गतायुष्यात मनास बसलेला एखादा भयंकर धक्का हेच असतें. पुष्कळ वेळा हे भयंकर प्रसंग रोग्याच्या फक्त कल्पनेतच असतात. पण रोग्याच्या दृष्टीने मात्र या कल्पनाना सत्य घटनाइतकेच महत्त्व असते. काही वेळा एखादी तीव्र इच्छा अपुरी राहिल्यास त्यातून मज्जातंतुविकृति निर्माण होते.

जुन्या आठवणी जागृत करण्याची क्रिया ही एका ठराविक मर्यादे-पर्यंतच होऊ शकते. अर्थात काही वेळा नेणिवेतील ही त्रासदायक कल्पना जर अगदी बाल्यावस्थेतील असेल (जी स्मृतीला कितीहि ताण दिला तरी आठवणे शक्य नाही) तर प्रयत्न कुठित होतो. एकदा अनु-भवलेली घटना सपूर्णपणे विसरली जाणे केव्हाच शक्य नाही असा सिद्धांत जरी फ्राइड्ने माडला होता तरीसुद्धा प्रत्यक्ष व्यवहारात ही गोष्ट शभर टक्के खरी नाही असें पुष्कळवेळा दिसून येते.

प्रत्यक्ष रोग्याचे मनोविश्लेषण करताना फ्रॉईडला असे आढळून आलें की लहानपणच्या भावनाच्या झगड्यात ज्या व्यक्तीचा प्रामुख्याने समावेश झालेला असतो त्या व्यक्तीसबधीच्या त्या भावना मनोविश्लेषण करणाऱ्या भोवतीच रोगी केन्द्रित करतो. यालाच फ्रॉइड्ने 'सक्रमण' ( Transference ) अशी सज्ञा दिलेली आहे. या सक्रमणाचा रोग-निवारणाच्या कामी बराच उपयोग होतो असें फ्रॉईड्ला आढळून आलें. व्यक्तीसबधी ज्या भावनाचे सक्रमण मानसोपचार-शास्त्रज्ञाकडे होत असेल त्या जर प्रेमळ भावना असतील तर रोगी त्या भावनोत्कटतेच्या काळात फारच प्रेमदर्शन करतो व या भावना जर द्वेषमूलक असतील तर तो मानसोपचार-शास्त्रज्ञाचा द्वेषहि तितक्याच तीव्रतेने करतो असें फ्रॉईड्ला आढळून आले. भावनाच्या सक्रमणाचा फायदा असा होई की नेणिवेत कोडलेल्या भावनाना कोणत्यातरी स्वरूपात प्रगट होण्यास वाव मिळाल्याने मनावरचे बरेच दडपण कमी होऊन रोग्याला बरें वाटे. रोग्याच्या भावनाची ही संक्रमणावस्था फार नाजुक असते. कारण स्वतः मानसोपचार करणारा वैद्य या भावनाचे केन्द्रस्थान म्हणून फार वेळ राहूं शकत नाही. तर त्या भावनाचा उलगडा झाल्यानतर त्याना योग्य

त्या स्वरूपात व्यक्त होण्याचा राजमार्ग दाखवून दिला की वैद्याचे काम संपले. नतर रोगी स्वत:चा तोल स्वत: सावरू शकतो. ही शक्यता निर्माण झाली म्हणजेच रोगी बरा झाला असे म्हणावयास हरकत नाही.

पुस्तकी सिद्धान्त व प्रत्यक्ष अनुभव या दोहोंच्या साहाय्याने मुक्त साहचार्य व भावसंक्रमण या दोन साधनांचा उपयोग मानसोपचारात फ्राईड्ने कल्पनेबाहेर यशस्वी करून दाखविला. फ्राईड्ने स्वत: आपल्या मानसोपचारपद्धतीचे वर्णन खालीलप्रमाणे केले आहे

प्रथम नेणिवेतील भागाचा शोध घेऊन त्यात वास करणाऱ्या कल्पनांचे सकलन करणे व योग्य वेळी रोग्यास त्या कल्पना उघड करून सागणे येवढेंच काम काही डॉक्टर करीत असत. परतु एवढ्याने भागेना. रोग्याच्या नेणिवेतील कल्पना शोधून काढून त्याचा पुनरुच्चार करणे एवढ्याने रोग-निवारणास फार मदत होईना म्हणून रोग्याने स्वत आठवण करून नेणिवेतील महत्त्वाचे प्रसग सागावेत असा प्रयत्न करण्यांत येऊ लागला या प्रयत्नात मुख्य अडचण अशी येई की रोगी असहकार करी त्याने कोणतीहि हकीकत स्वत च्या तोंडाने सांगण्याचे नाकारल्यास डॉक्टरचा नाइलाज होई. अशा वेळी रोग्याला विश्वासात घेऊन त्याच्यात आपले-पणाची भावना उत्पन्न करून हर उपायानी नेणिवेत दडलेले गत अनुभव त्याच्या तोंडून वदविणे; त्या अनुभवातील महत्त्वाच्या व नाजुक भागाकडे त्याचे लक्ष वेधणे व त्याला आपल्या शिकवणुकीत पूर्ण सहकार करावयास लावणे यातच डॉक्टरचे खरे कौशल्य दिसून येई. काही कालानतर असे आढळून आले की याहि पद्धतीने मज्जातंतुविकार पूर्णपणे नाहीसे होत नाहीत. सर्वच वेळी रोगी नेणिवेतील महत्त्वाचे अनुभव आठवू शकत नाही अशा वेळी स्वत प्रत्यक्ष अनुभव घेत आहोत, अशी कल्पना त्यास करावयास लावून कांही गोष्टीचा पुनरुच्चार त्याच्या तोडून करविणें ही गोष्ट फार महत्त्वाची असते. डॉक्टरला त्याच्या रोगनिवारण-पद्धतीत या गोष्टीला फार महत्त्व द्यावें लागते स्मृतीतून पुसट झालेले पण रोग्याच्या दृष्टीने ज्यांची भावनात्मक किंमत फार मोठी आहे असे अनुभव काही काल परत निर्मिणे ही गोष्ट मज्जातंतूच्या रोगाच्या निवारणांत फार महत्त्वाची आहे.

वरील पद्धतीने मनोविश्लेषण करणारा मनुष्य फार तज्ज्ञ असला पाहिजे व ही निपुणता अंगी येण्यासाठी वैद्यकीय अभ्यासक्रमात धर्मकल्पनाचे शिक्षण, नेणिवेच्या कार्याची माहिती, रोगाच्या कारणामध्ये शारीरिक व बाह्य कारणाप्रमाणेच मानसिक कारणेहि कशी महत्त्वाची असू शकतात यासबधीचे शिक्षण, मनोविश्लेषण कसे करावे याचे प्रात्यक्षिक वगैरे गोष्टीचा समावेश केला पाहिजे बालपणी व तरुणपणी दिसून येणाऱ्या मानसिक विकृति नाहीशा करण्यास मनोविश्लेषणाचा फार उपयोग होईल असा फ्रॉईड्ला जबर विश्वास वाटे

## फ्रॉईड्चें मानसशास्त्र

फ्रॉईड्चे मानसशास्त्रीय सिद्धान्त व मनोविश्लेषणपद्धति ही दोन्ही एकमेकापासून पूर्ण भिन्न मानता येणार नाहीत त्याने मनोविश्लेपण-पद्धतीतील दोन मुख्य सिद्धान्त आपल्या "मनोविश्लेषण चळवळीचा इति-हास" या पुस्तकात दिले आहेत मनोविश्लेषणाचा मुख्य हेतु दोन तऱ्हेच्या अनुभवावर प्रकाश पाडण्याचा असतो हे दोन तऱ्हेचे अनुभव म्हणजे (१) मज्जाततुविकार झालेल्या रोगी नेणिवेतील घटना उकरून काढताना जो प्रतिकार दाखवितो तो व (२) प्रत्यक्ष मनोविश्लेपण करीत असताना रोगी आपल्या नेणिवेतून वर काढलेले जिव्हाळ्याचे अगर तिरस्काराचे भाव डॉक्टरवर केंद्रित करतो ती क्रिया भावसक्रमणात चागले व वाईट दोन्ही तऱ्हाचे भाव असू शकतात हे भाव मूळ विषयाकडून डॉक्टरकडे सक्रमित होतात हा फ्रॉईड्चा स्वत चा सिद्धान्त

रोग्याने मनमोकळेपणाने सर्व गोष्टी न सागणे ही गोष्ट मात्र सर्वा-नाच पटण्यासारखी आहे या ठिकाणी मनोविश्लेषण करणाऱ्याला जास्तीत जास्त कौशल्य खर्च करावे लागते काही विचार अत्यत क्षुल्लक म्हणून रोगी बोलून दाखवीत नाही तर काही गोष्टी उघडपणे बोलून दाखविण्यास त्यास लाज वाटते पण याहि पलीकडे नेणिवेच्या दाराशीच अशी एक प्रतिकारशक्ति असते की ती काही घटना स्मृतीपर्यंत लवकर पोचूच देत नाही. आठवण करण्याची पराकाष्ठा रोगी करतो पण त्याला जे आठवते ते अस्पष्ट असते या ठिकाणी साहचर्याचा कमकुवतपणा न दिसता नेणिवेच्या प्रतिकारशक्तीचा जोर दिसून येतो, असे म्हणणेच जास्त सयुक्तिक वाटलें.

अशा वेळी रोग्याच्या वर्तनाचे सूक्ष्म निरीक्षण करून त्यावरून नेणिवेंतील कल्पनाचा तलास लावणें हे शास्त्रज्ञाचें फार महत्त्वाचें कार्य असते. अशा निरीक्षणांतून काढलेलीं अनुमानें शंभर टक्के बरोबर असतीलच असे नाही.

कल्पनांच्या मुक्त साहचर्यास होणारा प्रतिकार व भावसंक्रमण या दोहोंच्या जोडीला फ्रॉईड्ने भावनाचा निरोध (Repression) व बाल्यावस्थेंतील लैंगिक जीवन (Infantile Sexuality) या दोन महत्त्वाच्या कल्पना सिद्धान्त रूपाने माडल्या. फ्रॉईड्च्या मते भावनाचा निरोध हा मनोविश्लेषणाचा पाया होय. कोणीहि कोणत्याहि तऱ्हेच्या रोग्याचे मनोविश्लेषण करावयाला निघाला तरी त्याला भावनानिरोध प्रामुख्याने लक्षात घेऊनच पुढें काम करावे लागेल. बाल्यावस्थेतील लैंगिक जीवनासबधीचा सामान्य सिद्धान्त फ्रॉईड्ने बऱ्याच मुलाचे मनोविश्लेषण केल्यानतर माडला. मुलाला होणाऱ्या पुष्कळशा आभासाच्या मागे त्याच्या बालजीवनातील कामुकता असते असे त्यास दिसून आलें. मुलाच्या आभासाचा अभ्यास करीत असताना बाल्यावस्थेतील त्याच्या लैंगिक जीवनावर चागला प्रकाश पडतो.

भावनाचा निरोध व बाल्यावस्थेतील लैंगिक जीवन या संबंधीचे सिद्धान्त नुसत्या तर्कावर अवलबून नसून प्रत्यक्ष निरीक्षणावर आधारलेले आहेत असे फ्रॉईड्चे म्हणणे आहे हे दोन भाग एकत्र केल्यास फ्रॉईड्च्या मानसशास्त्राची मूलतत्त्वे तयार होतात. निराळ्या तऱ्हेनें हाच सिद्धान्त अशा माडता येईल की सर्व तऱ्हेच्या मेंदूच्या, मज्जाततूच्या, व मानसिक विकृतीच्या बुडाशी बाल्यावस्थेतील निरोधित कामुकता (Repressed Infantile Sexuality) हेच कारण प्रामुख्याने आढळून येते

यातील निरोध, बाल्यावस्था व लैंगिक जीवन (कामुकता) या तिन्ही कल्पना फ्रॉईड् सारख्याच महत्त्वाच्या मानतो.

आपल्या या सिद्धातात फ्रॉईडने संपूर्ण मानसिक जीवनाचा समावेश कधीच केला नाही. त्याला फक्त मज्जाततुविकाराच्या बुडाशी असणाऱ्या स्वप्नसृष्टीतील कारणाचा उलगडा करावयाचा होता आणि शेकडो रोग्याच्या अनुभवानतर मज्जाततुविकाराच्या बुडाशी बाल्यावस्थेतील अप्रकट कामजीवनच असतें अशी त्याची खात्री झाली.

फ्रॉईड्‌ने आपले सिद्धान्त कोणत्या पद्धतीने बसविले हें पाहणेंहि फार महत्त्वाचें आहे. फ्रॉईड्‌च्या जीवनक्रमावरून असें दिसून येतें की लहानपणापासूनच तो फार बुद्धिमान् असून त्याची शोधक प्रेरणाहि फार दांडगी होती. नुसत्या पुस्तकी सिद्धान्तांपेक्षा प्रत्यक्ष घडलेल्या घटनांचें निरीक्षण करण्याची त्याला फार हौस वाटे. प्रत्यक्ष घटनाचा अभ्यास करा म्हणजे सिद्धान्त आपोआपच दृष्टीस पडतीलया शॉर्कॉच्या शिकवणुकीनुसार फ्रॉईड्नेहि पुष्कळ निरीक्षण केले व त्याने माडलेले सर्व सिद्धान्त अभ्यासावरूनच तयार केलेले आहेत. बऱ्याच निरीक्षणानंतर एखाद्या सिद्धान्तापर्यंत तो येऊन पोचला की त्याच्या बिनचुकपणाबद्दल फ्रॉईड्‌ला इतकी खात्री वाटे की तो परत कोणत्याहि कसाला लावण्याची जरूर आहे असे त्यास कधीच वाटत नसे. त्याच्या सर्व लिखाणावरून असे दिसून येते की अनुभवाचे मंथन करून त्याने कितीतरी लहानसहान सिद्धान्त छातीठोकपणें माडले आहेत. फ्रॉईड्‌ची एकूण विचारसरणी पाहिल्यास असे दिसून येते की त्याला ‘विरोधाभास’ फार प्रिय असे. त्याच्या मानसशास्त्रीय दृष्टिकोनास जुळते असे व्यावहारिक आडाखे त्याने बसवून ठेवले होते व अशा आडाख्यावर त्याचा पूर्ण विश्वास असे. या आडाख्यापैकी पहिला असा की ज्या ज्या गोष्टीचा उपभोग घेण्यास मनाई केली जाईल त्या त्या गोष्टीकडे मन सारखे जोराने ओढ घेत असते त्याचप्रमाणे वरवर भयंकर, भीतिदायक व अंगावर शहारे आणणाऱ्या गोष्टीबद्दलहि एक प्रकारचे विलक्षण आकर्षण वाटत असतें. पुष्कळवेळा गुन्हा या सदरात समाजाने घातलेल्या गोष्टीहि मुद्दाम कराव्या अशी नैसर्गिक इच्छा असते. अगदी जवळच्या नातेवाईक मंडळीशी लैंगिक संबध ठेवण्याची इच्छाहि प्रत्येक व्यक्तीत निसर्गतःच असते; याचे कारण समाजाने ही कृति गर्ह्य मानली आहे हेच होय. व्यक्तीत नैसर्गिक रीतीने वास करणाऱ्या अशा प्रकारच्या इच्छा दाबून टाकण्यास समाजास शिक्षांचा उपयोग करावा लागतो. गाढ मानसशास्त्राची सुरवात अशा तऱ्हेच्या समाजविरोधी व संस्कृतिविरोधी भावनाच्या शोधानेच होते.

ज्याच्याबद्दल भीति वाटते त्याच्याबद्दलहि एक प्रकारचें आकर्षण वाटत असतें असे फ्रॉईड्‌चे म्हणणे आहे. प्रत्यक्ष दुःख देणाऱ्या किंवा शारीरिक दुखापत करणाऱ्या गोष्टी करण्याचे माणसास भय वाटावें हें साहजिकच

आहे पण मज्जाततुविकृति झालेल्या लोकाच्या पुष्कळशा भीति अगदी अवास्तव असतात. फ्रॉईड्च्या मते अशा तऱ्हेच्या भीतीमागे समाजास रुचणार नाहीत अशा आकाक्षाच दडलेल्या असतात.

फ्रॉईड्च्या मानसशास्त्राच्या बुडाशी आणखीहि काही गृहीत प्रमेये असलेली दिसून येतात यापैकी पहिले प्रमेय असे की प्रत्येक वर्तनामागे काही तरी हेतु असतो उद्दिष्टाशिवाय वर्तन असूच शकत नाही. प्राण्याच्या हातून घडणारी प्रत्येक कृति, मग ती सहजप्रवृत्तिनुसार घडलेली असो, अथवा न कळत घडलेली असो, ती कोणत्या तरी इच्छेची पूर्तता करीत असते. मॅग्डूगल्ने आपल्या लिखाणात असे दाखवून दिले आहे की जेन्ने व इतर काही शास्त्रज्ञानी मज्जाततूच्या विकाराचे कारण रोग्याचा कमकुवतपणा असे गृहीत धरले आहे परतु फक्त फ्रॉईड्नेच मात्र मज्जाततुविकाराचे मूळ व्यक्तीच्या इच्छा व हेतु यातच शोधले पाहिजे असे प्रतिपादन केले जेनेटच्या मते मज्जाविकृत रोग्यामध्ये एक प्रकारचा सूक्ष्म मानसिक ताण असतो त्यामुळे त्याला भोवतालच्या वातावरणाशी समरस होता येत नाही व अपुरतेपणाची भावना त्याच्या मनाला सतत त्रास देत असते या अस्वस्थतेचा अर्थ रोगी आपल्या कल्पनेप्रमाणे लावतो फ्रॉईड्च्या मते ज्या इच्छा व आकाक्षा तृप्त न झाल्यामुळे मनातल्या मनात दडपल्या जातात त्यातूनच सर्व तऱ्हेचे मज्जाततुविकार निर्माण होतात या विकाराची बाह्य लक्षणे रोग्याचा नुसता कमकुवतपणा दाखवीत नाहीत तर अतृप्त इच्छा व आकाक्षा दर्शवितात.

अर्धांग किवा अधत्व यासारखे विकारहि अपूर्ण इच्छाचे परिणाम म्हणूनच मानता येतील या दुखण्याना फ्रॉईड् अतृप्त इच्छाचे शारीरिक विकृतीत झालेले परिवर्तन असे म्हणतो मनात निर्माण होणाऱ्या प्रत्येक इच्छेच्या पाठीमागे एक ठराविक शक्ति असते व इच्छा दाबून टाकली तरी ती शक्ति नाहीशी होत नाही इतकेच नव्हे तर राजमार्गाने इच्छापूर्ति न झाल्यास दुसऱ्या कोणत्या तरी अप्रत्यक्ष रीतीने ही इच्छा पूर्ण करण्याचा यत्न या शक्तीच्या साहाय्याने होत असतो. प्रत्येक कृतीपाठीमागे हेतु असतोच. या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण कशा तऱ्हेने होते ते पाहू व्यवहारात दिसून येणाऱ्या मानसिक विकृति स्पष्ट करण्यास हेतूचा सिद्धान्त फार उपयोगी आहे असे फ्रॉईड्चें म्हणणे आहे. बोलतांना अगर लिहिताना होणाऱ्या चुकांना

पूर्वीच्या शास्त्रज्ञानी ‘अकरणप्रमाद’ ( Errors of omission ) किवा ‘विनिमयप्रमाद’ ( Errors of substitution ) असे म्हटले आहे व अशा चुका निव्वळ कल्पनाचे साहचर्य ठराविक मार्गाच्या बाहेर गेल्यास होतात असा त्याचा समज आहे पण ही कारणमीमासा फ्रॉईड् मान्य करीत नाही त्याच्या मते कार्यकारणसिद्धान्त बाह्य जगाइतकाच मानसिक सृष्टीसहि लागू आहे लिहिताना किवा बोलताना घडून येणाऱ्या चुकातसुद्धा इच्छा-पूर्तीचाच सबध असला पाहिजे ज्या गोष्टी आपणास अप्रिय वाटतात त्या आपण विसरण्याचा प्रयत्न करतो. पण हा सिद्धान्त फ्रॉईड्ने सर्व बाबतीत लागू केला नाही कारण एकदा घेतलेला अनुभव कधीच विसरत नाही या फ्रॉईड्च्या सिद्धान्ताला हा सिद्धान्त पोषक नाही

“स्वप्नमीमासा” या पुस्तकात फ्रॉईड्ने आपले स्वप्नविषयक सिद्धान्त माडले आहेत जुन्या काळी स्वप्नावरून माणसाचे भवितव्य समजते अशी कल्पना असे फ्रॉईड्च्या मते स्वप्नावरून भतकाळातील विशेष गोष्टी व आकाक्षाचा इतिहास समजतो

फ्रॉईड्पूर्वीच्या शास्त्रज्ञानी स्वप्न म्हणजे कल्पनाचा अनिर्बंध विलास अशा तऱ्हेचे स्पष्टीकरण केले होते यापेक्षा जास्त महत्त्वाचे शोध स्वप्ना-सबधी लावण्याचा कोणी फारसा प्रयत्नच केला नाही फ्रॉईड्ने शेकडो लोकाच्या स्वप्नाचा अभ्यास करून असे सिद्ध केले की ज्या इच्छा जागृत सृष्टीत पुऱ्या होत नाहीत त्याची पूर्तता आपण स्वप्नात पाहतो इच्छा व तिची पूर्ति ह्या दोन्ही गोष्टीहि स्वप्नात अप्रत्यक्षपणेच साध्य होत असतात. काही इच्छा आपल्या स्वतःलाच इतक्या भयकर वाटतात की स्वप्नातसुद्धा त्या उजळमाथ्याने प्रगट होऊ शकत नाहीत म्हणून अशा इच्छा कोणत्यातरी दुसऱ्या रूपात स्वप्नात व्यक्त होतात अशा तऱ्हेने फ्रॉईड्च्या मते स्वप्न ही क्रियासुद्धा अहेतुक नसते प्रत्येक कृतीमागे काहीतरी हेतु असतोच हेतूचें स्वरूप मानसिक असते बोलण्यात अगर लिहिण्यात घडणाऱ्या चुका व स्वप्न या दोन्ही क्रिया सपूर्णतया मानसिक आहेत. व या क्रियापाठीमागे कोणत्या तरी इच्छाची पूर्ति हाच हेतु असतो

मानवी क्रियामागे हेतु असतात व सत्तात्मक असणारे हे हेतु संपूर्णपणें मानसिक स्वरूपाचे असतात. हे दोन सिद्धान्त फ्रॉईड्च्या मानसशास्त्राचे मूलसिद्धान्त होत असे म्हणण्यास हरकत नाही.

फ्रॉईड्ने आणखी एक असा सिद्धात माडला आहे की अतृप्त इच्छा व आकाक्षा याचा सबध फक्त भूत कालाशीच असतो. कोणत्याहि मज्जाततु-विकारास भूतकालातील अतृप्त इच्छाच कारणीभत असते. फ्रॉईड्चे असे स्पष्ट मत होते की वर्तमानकालातील कृतीचा अर्थ लावण्यासाठी भूतकालातील घटनाकडेच धाव घेतली पाहिजे कारण काही अनुभव इतके जिव्हाळ्याचे असतात की त्याची विस्मृति कधीच होणे शक्य नसते काही काल जरी हे अनुभव दबल्यासारखे वाटले तरी ते खोल नेणिवेत जाऊन दबा धरून बसतात. व पुढल्या कालातील एकूण वर्तणुकीचा दृष्टिकोन निश्चित करण्यात या अनुभवाचा फार महत्त्वाचा भाग असतो. प्रत्यक्ष उपचार चालू असताना रोगी मनोविश्लेषणशास्त्रज्ञाबद्दल जी प्रेमाची अगर द्वेषाची भावना दाखवितो तिला फरॉईड्ने भावसक्रमण या सदरात घातले आहे अगदी बाल्यावस्थेपासून ज्या इच्छा व आकाक्षा अपुऱ्या राहिल्या असतील त्याच्या प्रकटीकरणाचे केन्द्र या दृष्टीने रोगी डॉक्टरकडे पाहात असतो. या भावसंक्रमणाचा योग्य तो उपयोग केल्यास रोग सुलभतेने बरा होतो असें फ्रॉईड्चे म्हणणें आहे. जेव्हा लहानपणची एखादी भावना जागृत होऊन रोग्याच्या मनांत लोभ उत्पन्न होतो, तेव्हा तो लहान मुलासारखाच वागू लागतो. अशा वेळी मनोविश्लेषण करणाऱ्या डॉक्टरकडे आपोआपच पित्याची भूमिका येते.

लहानपणी एकदा मनात उद्भवलेल्या इच्छा आयुष्यभर मनात तशाच राहतात हे जर गृहीत धरले तरच फ्रॉईड्च्या भावसंक्रमणाच्या कल्पनेचा अर्थ लागू शकतो. इच्छा त्याच पण आयुष्यात त्याचे केद्र वेळोवेळी बदलत असतें असें फ्रॉईड्चें म्हणणे आहे.

आतापर्यंत आपण फ्रॉईड्च्या मानसशास्त्रांतील बाल्यावस्था, निरोध, व कामजीवन या मूलभूतकल्पनाबद्दल विचार केला. निरोधाच्या बुडाशीं प्रत्येक कृतीमागे काहीतरी हेतु असतोच ही कल्पना आहे. बालजीवना-बद्दलचा दृष्टिकोन स्पष्ट करतांना एकदा उद्भवलेल्या इच्छा आमरण तशाच

राहतात अशी कल्पना त्याने माडली त्याचप्रमाणे मुलाच्या लैंगिक जीवनासहि अगदी लहानपणापासूनच सुरवात होते असें फ्रॉईड्चे म्हणणे आहे. मुलाची अंगठा चोखण्याची क्रिया, कोणतीहि वस्तु चावणे अगर तोडात घालणे, थोपटण्याबद्दल आकर्षण वाटणे या व अशा तऱ्हेच्या क्रियांच्या पाठीमागे कामवासनेची पूर्ति हाच हेतु असतो असा फरॉईड्ला विश्वास वाटतो. मूल थोडे मोठे झाल्यावर मित्राबद्दलच्या आकर्षणातून कामवासनेची पूर्ति होते यावरून कदाचित् असे वाटण्याचा सभव आहे की फ्रॉईड्ने 'काम' ( Sex ) हा शब्द फक्त स्नेह या अर्थीच वापरला आहे. यात लैंगिक आकर्पणाचा काही एक सबध नाही पण फ्रॉईड्ने असे स्पष्ट म्हटले आहे की सर्व तऱ्हेच्या प्रेमात लिगकाम हाच विकार प्रमुख असतो. अगठा चोखताना मुलाला जे सुख वाटते ते या कामपूर्तीच्या भावनेनेच

पुष्कळशा लिखाणात व्यक्तिमत्त्वाचे दोन भाग मानण्याकडे फ्राईड्चा कल दिसतो जाणीव व नेणीव ही जोडी तर त्याच्या सर्व लिखाणातच आढळून येते काही ठिकाणी त्याने उपबोध (Preconscious) या शब्दाचाहि उल्लेख केला आहे याचा अर्थ इतकाच की जे प्रत्यक्ष जाणिवेच्या केन्द्रस्थानी नाही पण केव्हाहि जाणिवेत आणणे शक्य आहे ते 'उपबोध' या सदरात घालता येईल ज्या भावनाना अगर विकाराना आपण मुद्दाम दडपून टाकतो त्या सर्व नेणिवेत जातात उपबोध म्हणजे जाणीव व नेणीव या दोहोच्या मधील एक अवस्था व त्या दोहोस जोडणारा एक दुवा, असे मानल्यास चूक होईल बोध, उपबोध व अबोध ही वेगवेगळी केंद्रे ( Poles ) आहेत असें फ्रॉईड् मानतो

कामवासना व निरनिराळी व्यक्तिमत्त्वे याचा सबध जास्त स्पष्ट करताना खालील गोष्टी विचारात घेतल्या पाहिजेत क्षणिक सुखदायक होणाऱ्या ज्या ज्या कृति मूल सहजप्रेरणेनुसार करते त्या एका व्यक्तिमत्वात येतात. मनाला सुख देणारे प्रेमविषय यातूनच पुढे बाहेर पडतात व्यक्तिमत्त्वाच्या विकासात जाणीव व नेणीव या जोडीप्रमाणे फ्राईड्ने सुखतत्त्व (Pleasure Principle) व वास्तवता तत्त्व (Reality Principle) या दोन ध्रुवाचाहि उल्लेख केला आहे. साधारण मनुष्य सुखतत्त्वाप्रमाणेच वर्तन करीत असतो. पण पुष्कळ वेळा त्याला असे आढळून येतें की भोव-

तालची परिस्थिति व सामाजिक दडपण यांमुळे त्याच्या मनात येणाऱ्या सर्वच इच्छा त्याला पुऱ्या करता येत नाहीत. दूरच्या हितावर दृष्टि देऊन मनुष्य तत्कालीन सुख देणाऱ्या पुष्कळशा गोष्टी करण्याचे टाळतो. दिवसाहि मनुष्य ज्या वेळी मनोराज्ये करण्यात दग होतो त्या वेळी त्यात अतृप्त आकाक्षा पुऱ्या होत असल्याची स्वप्ने त्याम दिसतात. पण प्रत्यक्ष दिनक्रमात मात्र वास्तवता-तत्त्वानुसारच त्याम वागावे लागते प्रथम प्रथम अत:सृष्टीतील ही दोन व्यक्तिमत्त्वे व बाह्य परिस्थिति अशा स्वरूपाचे हे द्वित्व असते पण सवयीने परिस्थितीचा बराचसा भाग व्यक्ति आत्मसात् करते व त्यामुळे व्यक्तिमत्वाचे दोन भाग उघड उघड अत सृष्टीतच प्रतीत होऊ लागतात.

आत्मत्व व कामप्रेरणा हे व्यक्तिमत्त्वातील दोन ध्रुवहि फ्रॉईड्ने विचारात घेतले आहेत या ध्रुवाची चर्चा करताना फ्रॉईड्ने पुढील मुद्द्याचा उल्लेख केला आहे (१) आत्मकाम्या (Narcissism) : व्यक्तीचे स्वत:-बद्दलचे आकर्षण आवडणारा विषय मिळण्याच्या कक्षेबाहेरचा असला म्हणजे ती आवड स्वत भोवती केन्द्रित केली जाते स्वत्वात आणखीहि इतर बऱ्याच प्रेरणा असतात पण कामप्रेरणा त्यात इतकी एकरूप होऊन जाते की ती स्वत्वापासून स्वतत्र अशी दाखविताच येत नाही अशा रीतीने स्वसरक्षण व कामप्रेरणा या एकमेकात विलीन होऊन तयार झालेल्या स्वत्वास फ्रॉईड्ने 'जीवनासक्ति (Eros) असे संबोधिले आहे या जीवनासक्तीच्या विरुद्ध असलेल्या ध्रुवास फ्रॉईड्ने नाशप्रवृत्ति (Death Instinct) असे नाव दिले आहे काही माणसात आत्महत्या करण्याची प्रवृत्ति दिसून येते आसक्ति वाटणाऱ्या विषयाची छळणूक करण्यात काही माणसाना एकप्रकारचा आसुरी आनद वाटत असतो या प्रवृत्तीस फ्रॉईड्ने परक्लेशन प्रवृत्ति (Sadism) असे नाव दिले आहे निर्वाणाची अगर मुक्तीची इच्छा करणे हेहि नाशप्रवृत्तीचेच व्यक्त स्वरूप आहे

**नेणिवेसंबंधीच्या फ्रॉईडच्या सुरवातीच्या व नंतरच्या कल्पना**— जाणीव व नेणीव यासबधीच्या फ्रॉईडच्या कल्पना नतरच्या कालात थोड्याफार बदलल्या सुरुवातीची त्याची कल्पना अशी होती की 'स्वत्व' जाणिवेत असते व त्याच्या प्रतिकारामुळेच अनिष्ट आकाक्षा नेणिवेत दडपून टाकल्या जातात पण बऱ्याच रोग्याबाबत त्याला असा अनुभव आला की नेणिवेतील

अनुभवांची स्मृति जागृत करण्यास रोगी मुद्दाम जाणून प्रतिकार करीत नाही. यावरून असा निष्कर्ष निघाला की अतृप्त आकाक्षाना जाणिवेत येण्यास प्रतिबंध करणाऱ्या स्वत्वाचा काही भाग नेणिवेतच कोठेतरी असला पाहिजे भोवतालच्या परिस्थितीशी स्वत्व निकटचा सबध ठेविते सुख व दुःख या. वेदनाचा अनुभव घेताना ते शरीराशी एकरूप होते नेणिवेत मनाला त्रास देणाऱ्या व सामाजिक जीवनास विघातक अशा इच्छा व आकाक्षा दडपून ठेवलेल्या असतात

वरील विवेचनात फ्रॉइड्ने मनाचे दोन विभाग कल्पिले आहेत भोवतालच्या वातावरणाशी घनिष्ठ सबधाचा असा एक पृष्ठभाग व वातावरणापासून अलिप्त असा नेणिवेचा दुसरा भाग जीवनासबधीचा सर्वसामान्य दृष्टिकोन व इतर सर्व सहजप्रेरणा याचे मूळ निवासस्थान नेणिवेतच असते. बाह्य परिस्थितीचा विचार करून तिच्याशी सुसगत अशा प्रेरणाना व आकाक्षाना प्रकट होण्यास स्वत्व वाव देते व बाकीच्या प्रेरणा दडपून टाकते सुखतत्त्वाला अनुसरून नेणिवेत दडपून राहिलेल्या सर्व कल्पनाची व आकाक्षाची प्रकट होण्यासाठी एकसारखी धडपड चालू असते पण स्वत्वाच्या अनुमतीखेरीज त्याना प्रकट होणे शक्य नसते स्वत्व जोरदार असेल तर जीवनाला सुसूत्रता येते व नेणीव नेहमीच ताब्यात राहू शकते पण हे स्वत्व कमकुवत असल्यास सर्वच योग्य व अयोग्य प्रेरणाहि प्रकट होण्यासाठी बड करीत असतात व जीवनाची सुसूत्रता नाहीशी होते नेणिवेला फ्रॉईड्ने अबोधात्मा ( It किवा Id ) असेहि सबोधिले आहे

बोधात्मा (Ego) व अबोधात्मा (Id) याच्या जोडीने आणखी एक तत्त्व फ्रॉईड्ने मानले आहे ते म्हणजे ध्येयात्मा (Super Ego) हे होय ज्याला आपण व्यवहारी भाषेत सदसद्विवेकबुद्धि म्हणतो त्यालाच फ्रॉईड्ने ध्येयात्मा असे नाव दिलेले दिसते योग्यायोग्यतेबद्दल व इष्टानिष्टतेबद्दल काही सर्वसामान्य त्रिकालाबाधित असे सिद्धान्त ध्येयात्मा ठरवीत असतो व त्यानुसार रोजच्या दैनदिन आयुष्यक्रमातील वागणुकीची दिशा ठरविली जाते हे सिद्धान्त भोवतालच्या परिस्थितीवर व सामाजिक कल्पनावर आधारलेले असतात खालच्या दर्जाच्या काही प्राण्यात स्वत्व जागृत असतें हे जरी खरे मानले तरी त्याच्यात ध्येयात्मा मात्र नसतो सदसद्विवेक

बुद्धि ही देणगी फक्त माणसालाच लाभलेली आहे. ध्येयात्म्याचा उदय समाजाच्या रानटी अवस्थेपासूनच झाला असला तरी व्यक्तीतील विशिष्ट सदसद्विवेकबुद्धीचा जन्म बालपणापासून हळहळू होत असतो सदसद्विवेक-बुद्धीचा उगम पुष्कळ अशी कामप्रेरणेला मुरड घालण्यातून होतो. फ्रॉईड्च्या मतें बाल्यावस्थेतच मुलातील कामप्रेरणा भिन्नलिंगी व्यक्तित 'विषय' म्हणून शोध् लागते अर्थातच मुलगा आईकडे व मुलगी बापाकडे याच प्रेरणेने आकर्षिली जातात

मुलात ध्येयात्म्याचा उदय कसा होतो याची कारणमीमासा फ्रॉईड्ने अशी केली आहे की मुलात प्रथम मातृकाम्या ( Œdipus Complex) निर्माण होते तो बापाचा द्वेष करू लागतो. त्याचवेळी आपण सर्व बाबतीत आपल्या बापासारखे असावे असेहि त्यास वाटू लागते अशा रीतीने आईवरील प्रेमांत भागीदार म्हणून बापाबद्दल वाटणारा द्वेष व ध्येय म्हणून वाटणारा आदर या दोन भावनाचे एकमेकात निकराचे द्वद्व चालू असते. शेवटी वयाच्या चवथ्या किवा पाचव्या वर्षी आपल्या स्वत च्या जननेद्रियाकडे मुलाचे लक्ष केद्रित होते पण ही गोष्ट आईवडिलाच्या ध्यानात येताच ती दोघेहि त्याला कडक शिक्षा करून अशा तऱ्हेच्या वृत्तीपासून परावृत्त करतात अशा रीतीने मुलाची कामप्रेरणा सर्व बाजूनी पूर्णपणे दडपून जाते व मोठ्या शिकस्तीने मुलगा बापाप्रमाणे होण्याचे ध्येय डोळचासमोर ठेवून त्या दिशेने प्रयत्न करू लागतो या प्रयत्नातूनच ध्येयात्म्याचा उदय होतो मुलगा आपल्या सर्व-सामान्य वागणुकीचे सिद्धान्त हळहळू निश्चित करतो ध्येय म्हणून आईची मूर्ति डोळचासमोर ठेवल्यास त्याच्या जीवनावर तिच्या चारित्र्याची छाप पडलेली दिसून येईल. अशाच तऱ्हेचे स्पष्टीकरण मुलीबाबतहि देता येईल. चवथ्या किवा पाचव्या वर्षी पूर्णपणे दडपली गेलेली कामप्रेरणा परत कौमार्या-वस्थेत वर डोके काढू लागते. तारुण्यात मनुष्य कामप्रेरणेबाबत कितपत यशस्वी होईल हे त्याने लहानपणी मातृकाम्येचे किती यशस्वी प्रमाणांत निरोधन केले असेल त्यावर अवलबून राहील

वरील विवेचनास शास्त्रीय दृष्टीने फारसे महत्त्व नसले तरी काही रोग्याना बरे करताना या विवेचनाचा व कार्यकारणपरंपरेचा बराच उपयोग होतो मानसिक झगडयाचे मूळ बाल्यावस्थेपर्यंत नेऊन पोंचविल्यास रोगी

त्यासंबंधीचा विचार जास्त वस्तुनिष्ठतेने (Objectively) करूं शकतो, व त्यामुळे रोगनिवारणास मदतच होते

**मनोविश्लेषणवादाचें समीक्षण व मूल्यमापन** :— फ्रॉईड्च्या मानसशास्त्रीय तत्त्वज्ञानाचा विचार करताना आपणास त्यात एकूण तीन सामान्य सिद्धान्त आढळून आले (१) हेतुविरहित कृति असूच शकत नाही. (२) एकदा उद्भवलेली आशा किंवा आकांक्षा कधीहि नाहीशी होऊ शकत नाही व (३) व्यक्तिमत्त्व हे एक जिनसी नसून त्यात वेगवेगळे ध्रुव दिसून येतात. आणखीहि काही स्वतंत्र मूल्ये फ्रॉईड्ने मानली आहेत. स्वत्व, ध्येयात्मा, नाशप्रवृत्ति व जीवनासक्ति इतक्या स्वतंत्र कल्पना त्याच्या मानसशास्त्रात आढळतात खेरीज कामप्रेरणा व अवेक्षक (Sensor) यांचेहि स्वतंत्र अस्तित्व फ्रॉईड्ने मानले आहेच. व्यक्तिमत्त्वाच्या विकासाचा अभ्यास करताना यातील बऱ्याच सिद्धांतांचा व कल्पनांचा उपयोग होतो ही गोष्ट अमान्य करता येणार नाही. त्याचप्रमाणे मूळ कल्पनांचे अयोग्य स्वरूप बदलून त्यांच्या उदात्तीकरणाची (Sublimation) कल्पनाहि फार उपयुक्त आहे. हे उदात्तीकरण केव्हा व किती प्रमाणात करता येईल हे प्रश्न फ्रॉईड्ने सोडवून दाखविले नाहीत

फ्रॉईड्ने आपल्या आयुष्याची बरीच वर्षे मज्जाततूंच्या विकृतीवर (Neurosis) उपचार करण्यात खर्च केली व या उपचारात त्याने जी सूक्ष्म बुद्धिमत्ता व नवीन पद्धति वापरली त्यातच त्याचा मोठेपणा दिसून येतो फ्रॉईडने प्रथमच असे प्रतिपादन केले की मज्जातंतूंच्या विकृतीचे कारण मेंदूवर झालेला तत्कालिक आघात किंवा मेंदूला बसलेला धक्का हेच फक्त नसून, रोग्याच्या गतायुष्यातील निरोधित प्रेरणा हेहि असते. मनात जोरदार असलेल्या प्रेरणा व प्रतिकूल बाह्य परिस्थिति या झगड्यात जेव्हा व्यक्तीचे तडजोडीचे किंवा मिळते घेण्याचे प्रयत्न कमकुवत ठरतात, तेव्हा मज्जातंतुविकृति निर्माण होते. अशा वेळी डॉक्टरचे मुख्य काम रोग्याच्या मानसिक झगड्यात त्याने यशस्वी व्हावे यासाठी त्यास जरूर ती मदत देणें हेंच असतें. व्यक्तिमत्त्वासंबंधी फ्रॉईड्ने मांडलेल्या या नवीन दृष्टीकोनाबद्दल त्यास भरपूर श्रेय देणें इष्टच आहे. स्वतःच्या निरीक्षणाचे निष्कर्ष म्हणून

फ्रॉईड्ने माडलेले सिद्धात सर्वांना मान्य होतीलच असे नाही पण मानस-शास्त्राच्या प्रगतीसाठी त्याने एक नवीन दालन निर्माण केलें ही गोष्ट नाकबूल करता येणार नाही

**आल्फ्रेड् अॅड्लर् व मनोविश्लेषण** —मनोविश्लेषण पद्धतीच्या जन्मानतर साधारण दहा वर्षानी फ्रॉईड्च्या अनुयायात मतभेद निर्माण होऊ लागले फ्राईड्च्या सुरवातीच्या काही अनुयायात अॅड्लर् हा प्रमुख होता पण पुढे पुढे फ्राईडच्या सर्वच कल्पना अॅड्लर्ला पटेनात विशेषत: कामप्रेरणा व स्वत्त्व यातील द्वित्व अॅड्लर्ला मान्य होईना या मुद्द्यावर मतभेद झाल्याने तो फ्राईड्च्या गटातून फुटून निघाला व त्याने आपल्या भोवती एक स्वतत्र गट निर्माण केला आपल्या स्वत चा स्वतत्र दृष्टिकोन त्याने "व्यक्तिनिष्ठ मानसशास्त्र" (Individual Psychology) या सदराखाली माडला त्याच्या मते कामप्रेरणेवर फ्रॉईड्ने दिलेला भर अवास्तव होता मज्जाततुविकारात काही वेळा कामप्रेरणेचे झगडे दिसून येतात. म्हणून आयुष्यातील सर्वच कृतीच्या बुडाशी ही प्रेरणा जोरदार असते हे तत्त्व अॅड्लर्ला मान्य नव्हते व्यक्तिमत्त्वाच्या बुडाशी कामप्रेरणेखेरीज इतर काही तत्त्व सापडते की काय या दृष्टीने सशोधन करता अॅड्लर्ला असे आढळून आले की मज्जातर्तुविकाराच्या मुळाशी पुष्कळवेळा व्यक्तीला स्वत बद्दल वाटणारा न्यूनगड असतो हा न्यूनगड काही वेळा शारीरिक विकृतीमुळे निर्माण होतो, तर काहीवेळा तो पूर्णपणे मानसिक स्वरूपाचा असतो हा न्यूनगड मनुष्यास फार अस्वस्थ करतो कारण आपण इतरापेक्षा श्रेष्ठ असावे, इतरावर प्रभुत्व (Will for power) गाजवावे अशी एक पबळ इच्छा प्रत्येक व्यक्तीत निसर्गत च असते व या इच्छेच्या आड न्यूनगड येऊ लागल्याने मनुष्याला अस्वस्थता येते व आपल्यातील न्यून कोणत्यातरी रीतीने भरून काढण्यासाठी त्याची धडपड सुरू होते हे न्यून प्रत्यक्ष नाहीसे करण्याची शक्यता नसल्यास मुले ती बाजू वगळून दुसऱ्या कोणत्यातरी प्रातात आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतात उदाहरणार्थ जीं मुलें शरीराने अशक्त असतात त्यांना क्रीडागणावर आपले प्रभुत्व मुळीच दाखविता येत नाही. तेव्हा ती इतरत्र अभ्यासांत आपले श्रेष्ठत्व दाखविण्याचा प्रयत्न करतात

अशा रीतीने स्वत्व प्रस्थापित करणे ही आयुष्यातील मुख्य प्रेरणा आहे व ती आपले प्रभुत्व आविष्कृत करताना बाह्य परिस्थिति व स्वतःची भावनाप्रधानता याच्या निकटवर्ती येते या दोहोचे साहचर्य जेव्हा यशस्वी होतें तेव्हा जीवन सफल होते ही प्रेरणा जेव्हा परिस्थितीशी किंवा भावनांशीं झगडण्यात अपयशी ठरते तेव्हा निरनिराळे मज्जाततुविकार उद्भवतात

बोधात्मा सत्तातत्त्वाशी बऱ्याच प्रमाणात सहजीव असतो असे फ्रॉईड्चे मत होते पण अॅड्लर्च्या मते भोवतालच्या परिस्थितीतील नको असणारा भाग मुद्दाम दृष्टीआड करण्याचा बोधात्मा प्रयत्न करतो इतकेच नव्हे तर स्वत ला मानवेल अशीच भोवतालची परिस्थिति कल्पनेने निर्माण करण्याचाहि त्याचा प्रयत्न चालू असतो अशा तऱ्हेने बोधात्मा बाह्य परिस्थितीतल्या सत्य पण कटु भागावर काल्पनिक आवरणे घालून स्वतातील न्यून भरून काढण्याचा प्रयत्न करीत असतो परिस्थितीने निर्माण केलेल्या पण उत्तीर्ण होण्यास कठीण अशा कसोटया शक्यतो टाळून व्यक्ति आपल्या जीवनाची रीत ठरवीत असते एकदा आयुष्याचे ध्येय निश्चित झाल्यावर बदलत्या परिस्थितीतहि ते गाठण्याची व्यक्तीची धडपड चालू असते.

सर्वसामान्यत प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यात तीन तऱ्हेचे प्रश्न निर्माण होत असतात (१) व्यक्तीचे सामाजिक जीवन, (२) जीवनासाठी ठरविलेला प्रमुख उद्योग व (३) प्रेम

व्यक्तीच्या जीवनसरणीवर अनुवशापेक्षा परिस्थितीचा, विशेषतः कौटुबिक परिस्थितीचाच, फार परिणाम होत असतो अत्यत कर्तृत्ववान् व यशस्वी बापाची मुले, बापाइतका मोठेपणा मिळविणे अशक्य आहे असे दिसताच कष्टशून्य व सुखासीन आयुष्यक्रमाकडे वळतात गरीबी व सौदर्य हे विशेष परिस्थितीनुसार लाभल्यास याचना व स्वतःचे प्रदर्शन या प्रवृत्ति मुलांत आढळतात अत्यत लाडवलेले मूल कोणत्याहि स्थळी व काळी आपणच सर्वांच्या अवधानाचे सतत केन्द्र असावे अशा प्रवृत्तीचे आढळतें. एकूण मुलांत सर्वांत लहान मूलहि असेंच असतें. एकुलत्या एक मुलाचा दृष्टिकोन असाच बनून जातो की त्याने नेहमी दुसऱ्यावर प्रभुत्व गाजवावे व इतरानी त्याच्या आज्ञेत वागावे

कामप्रेरणेचे महत्त्व अॅड्लर् अगदीच अमान्य करीत नाही. पण सर्व आयुष्याची दिशा ठरविणारी ही एकच प्रेरणा आहे हे फ्राईड्चे मत मात्र अॅड्लर्ला मान्य नाही. अॅड्लर्च्या मते स्वत्वाचे प्रस्थापन व न्यून दडपून टाकण्याची प्रेरणा या सर्व आयुष्याचा दृष्टिकोन ठरविणाऱ्या महत्त्वाच्या प्रेरणा आहेत सामाजिक जीवन, जीवनाचा प्रमुख उद्योग व प्रेम या तीन्ही-पैकी समाजाशी तडजोड हा प्रश्न मूल प्रथम सोडवते व या प्रश्नाच्या निर्णयातूनच त्याच्या इतर दोन्ही प्रश्नासबधीचे निर्णय ठरत असतात

व्यक्तिमत्त्वाबद्दलचे अॅड्लर्ने सिद्धात वरीलप्रमाणे आहेत मज्जाततु-विकारावर उपचार करताना रोग्याचा एकूण आयुष्याविषयीचा दृष्टिकोन काय आहे हे डॉक्टरने प्रथम शोधून काढले पाहिजे. कोणत्या दृष्टीने रोगी आपले व्यक्तिमत्त्व प्रस्थापित करू इच्छितो तेहि पाहिले पाहिजे या दोन गोष्टी निश्चित करताना रोग्याच्या कौटुबिक परिस्थितीचा विचार करणे फार महत्त्वाचे असते त्याचप्रमाणे त्याच्या आवडीनिवडी, त्याने ध्येयभूत मानलेल्या सत्य किवा काल्पनिक सृष्टीतील व्यक्ति, त्याने जीवनासाठी निवड-लेला मूलोद्योग वगैरे सर्व गोष्टीहि विचारात घेतल्या पाहिजेत. इतकेच नव्हे तर त्याची उभे राहण्याची, चालण्याची, बसण्याची, निजण्याची पद्धत वगैरे बारीकसारीक गोष्टीहि आयुष्याचा दृष्टिकोन समजावून घेण्यास फार मदत करतात उदाहरणार्थ, जो मनुष्य उताणा व ताठ निजत असेल तो साधारणत. महत्त्वाकाक्षी असतो उलट अग चोरून, कुशीवर व डोक्यावरून पांघरूण घेऊन निजण्याची ज्याला सवय असेल त्याच्या अगात ध्येयासाठी धडपड करण्याची हौस अगर धैर्य याचा अभाव दिसून येतो अशा रीतीने एकूण आयुष्याचा दृष्टिकोन व्यक्तीच्या बारीकसारीक कृतीतून प्रतीत होत असतो. या सर्वांचा अभ्यास मनोविश्लेषण शास्त्रज्ञाने करणे फार जरुरीचें आहे.

स्वप्नाचा अभ्यास करणे ही गोष्ट मनोविश्लेषणात फ्राईड्प्रमाणे अॅड्लर्हि मानतो. पण फ्राईड्च्या मतें स्वप्न अतृप्त आकाक्षा प्रगट करतें, तर अॅड्लर्च्या मतें स्वप्नात व्यक्तीचा भविष्यकाल चित्रित केला जातो. पुढे लवकरच तोंड द्याव्या लागणाऱ्या एखाद्या प्रसंगातील क्रिया–प्रतिक्रियाची रंगीत तालीम स्वप्नात केली जाते. स्वप्नाचा अभ्यास केल्याने व्यक्तीची

जीवनसरणी कळण्यास मदत होते. प्रत्यक्ष जीवनात अनिर्णीत असे जे प्रश्न असतील त्यासबधीची स्वप्ने पडतात व स्वप्नातील घडामोडीतून व्यक्तीचा जीवनविषयक दृष्टिकोन सुस्पष्ट होतो

मज्जाततुविकार झालेल्या रोग्यास उपचार करीत असताना मनोविश्लेषणशास्त्रज्ञाचे मुख्य काम हे, की रोग्याचा न्यूनगंड शोधून काढावयाचा व तो त्याच्या डोक्यातून घालविण्याचा प्रयत्न करावयाचा. वय मोठे झाल्यावर जीवनसरणी बदलणे फारसे शक्य नसते ही गोष्ट जरी खरी असली तरी निरनिराळ्या प्रवृत्तीचा व्यक्त होण्याचा मार्ग बदलणे म्हणजेच प्रवृत्तीना जास्त सोज्वळ मार्गाने व्यक्त होण्यास मार्गदर्शन करणे ही गोष्ट मनोविश्लेषणशास्त्रज्ञ बऱ्याच यशस्वी रीतीने करू शकतो

तुलनात्मक दृष्टीने पाहिल्यास अॅड्लर्ची शास्त्रीय विचारसरणी फ्राईड्पेक्षा जास्त सुसूत्र वाटते त्याचे सिद्धात गाढ मानसशास्त्राच्या (Depth Psychology) सदरात जरी फारसे यथार्थतेने बसू शकणार नाहीत, तरी ते बुद्धीला पुष्कळसे पटण्यासारखे आहेत यात शका नाही दुसरी गोष्ट अशी की फ्रॉईड्इतके अॅड्लर्ने नेणिवेला महत्त्वाचे स्थान दिलेले नाही जीवनसरणीची कल्पना मात्र त्याने सर्वच ठिकाणी मूलभूत मानलेली दिसून येते फ्रॉईड्ने आपल्या शास्त्रीय सिद्धातात नेणिवेस जेवढे महत्त्वाचे स्थान दिले आहे तेवढेच महत्त्वाचे स्थान अॅड्लर्ने जीवनसरणीला दिले आहे

प्रतिकार ( Resistance ) व भावसक्रमण ( Transference ) याचाहि अॅड्लर्ने आपल्या सिद्धातात समावेश केला आहे जाणीव व नेणीव यामध्ये असलेला अवेक्षक (Censor) अयोग्य आकाक्षाना व्यक्त होण्यास बंदी करतो ही रोग्याची प्रतिकारशक्ति विश्लेषणशास्त्रज्ञाशी रोगी असहकार करतो तेव्हा दिसून येते, असे फ्रॉईड्चे म्हणणे आहे अॅड्लर्च्या मते रोग्याच्या प्रतिकाराच्या बुडाशी अशी कल्पना असते की जर मनात बाळगलेला गड उघड करून दाखविला तर मनोविश्लेषणशास्त्रज्ञ तो नाहीसा करील. तो नाहीसा झाल्यास आयुष्यात जास्त अवघड गोष्टीना तोड द्यावे लागेल व त्यात अपयश येण्याची शक्यता निर्माण होईल. म्हणून शक्यतो त्या न्यूनगंडाचा त्याग करण्यास रोगी तयार होत नाही. कारण त्या न्यूनगंडाच्या सबबीवर आयुष्यात पुष्कळ गोष्टींबाबत सूट मिळण्याची शक्यता असते.

त्याचप्रमाणे डॉक्टरबाबत अनुकूल वृत्ति दाखविण्यात किंवा प्रेम दाखविण्यात रोग्याचा हेतु इतकाच असतो की, डॉक्टरने त्याला चागली वागणूक द्यावी. एकूण जाणीव व नेणीव हे दोन भाग परस्परविरुद्ध नसून एकमेकास पूरकच आहेत असे अॅड्लर्चे मत होते नेणिवेत असलेला न्यूनगड व जाणिवेची प्रभुत्व स्थापन करण्याची धडपड ही दोन्ही मिळून एक व्यक्तिमत्त्व, गतिमान् एकत्व (Dynamic unity) तयार होते

फ्रॉईड्ने गृहीत धरलेले व्यक्तिमत्त्वाचे द्वित्व किंवा निरनिराळे परस्पर विरुद्ध ध्रुवहि अॅड्लर्ने गृहीत धरलेले नाहीत त्याचप्रमाणे बोधात्मा, ध्येयात्मा, प्रेरणामूल (Libido) वगैरे स्वतत्र मूल्येहि अॅड्लर्ने अमान्य केली मात्र हेतूशिवाय कृति नाही हा फ्रॉईड्चा सिद्धात अॅड्लर्ला पूर्णपणे समत होता त्याचप्रमाणे कार्यकारण परपरेबाबतहि तो फ्रॉईड्शी सहमत होता अॅड्लर्ने प्रस्थापित केलेला न्यूनगड व वर्चस्वाची इच्छा याचे स्वरूप पूर्णपणे मानसिकच आहे व्यक्तिमत्त्वाच्या घडणीच्या दृष्टीने बालपण हा फार महत्त्वाचा काल आहे याबद्दलहि फ्रॉईड् व अॅड्लर् याच्यात एकमत आहे

व्यवहारदृष्टचा अॅड्लर्ने माडलेले सिद्धान्त अधिक उपयुक्त आहेत. कारण बऱ्याच उदाहरणात ते लागू पडतात अॅड्लर्चे सिद्धात फ्रॉईड्च्या सिद्धातापेक्षा जास्त सुलभ आहेत, विशेषत: शिक्षण शास्त्रज्ञाना हे सिद्धात फार मार्गदर्शक असल्याने शैक्षणिक प्रातात अॅड्लर्ला साहजिकच फार मानाचे स्थान मिळाले

**युंग्चें पृथक्करणात्मक मानसशास्त्र** (Jung's Analytical Psychology) —युग्च्या मते फ्रॉईड्चे मानसशास्त्रीय सिद्धात क्रान्तिकारक व महत्त्वाचे आहेत पण ते काहीसे एकतर्फी व अपुरे आहेत त्यातील अपूर्णता नाहीशी करण्याचे युग्ने प्रयत्न केले व आपल्या सिद्धान्तास त्याने पृथक्करणात्मक मानसशास्त्र असे सबोधिले

युग्ने सुचविलेले सिद्धात मुख्यत: मज्जाततुविकृति व प्रेरणामूल यासंबधी आहेत मोठ्या माणसाच्या मज्जाततुविकृतीच्या बुडाशी त्याच्या बाल्यावस्थेत निर्माण झालेली मातृकाम्या (Œdipus Complex) हीच मुख्यत: असते असे फ्रॉईड्चे म्हणणे होतें. परंतु युग्च्या मते हे रोगाचे मूल-

कारण ( Predisposing cause ) झाले. पण कोणत्या तात्कालिक उत्तेजक कारणाने ( Exciting cause ) मज्जाततुविकृतीला सुरवात झाली याकडे फ्रॉईड्ने दुर्लक्ष केले. पुष्कळवेळा माणसाच्या मनात एखादा न्यूनगड असूनहि जोपर्यंत परिस्थिति विकट नसते तोपर्यंत मनुष्य सामान्य पातळीवर राहू शकतो पण ज्यावेळी अशी विशिष्ट परिस्थिति निर्माण होते की तिला जरूर ते धैर्य व्यक्ति दाखवू शकत नाही, तेव्हा त्या न्यूनगडाची जाणीव होते व हे तत्कालीन अपयश मज्जाततुविकृतीस कारणीभूत होते. पुढच्या कालात विकट परिस्थितीस तोड देण्याची एखादी तोड सुचल्यास त्या क्षणापुरती माणसाची कमकुवत व विकृत वर्तणूक नाहीशी होते या सर्व निरीक्षणावरून युग्ने असा निर्णय काढला की निर्माण झालेल्या परिस्थितीस यशस्वी रीतीने तोड देणे अशक्य होऊन मनाचा धीर सुटला की मज्जाततुविकार निर्माण होतो

मज्जाततुविकृतीच्या उपचारतत्रात युग्ने फ्रॉईड्प्रमाणेच मुक्तसाहचर्य व स्वप्नविश्लेपण याचा अवलब केला आहे विश्लेषणास सुरुवात मात्र तत्कालिक कारणापासूनच केली पाहिजे असे त्याचे म्हणणे आहे स्वप्नाच्या अभ्यासाने फक्त नेणिवेतील अतृप्त आकाक्षाचेच दर्शन होते असे नसून सद्यः-परिस्थितीशी तोड देण्यासाठी रोग्याच्या नेणिवेत काय योजना आहेत व त्यासबधी त्याचा एकूण दृष्टिकोन काय आहे हेहि विश्लेपणशास्त्रज्ञास समजते.

प्रेरणामूला (Libido) च्या कल्पनेला फ्रॉईडपेक्षाहि युग्ने जास्त विस्तृत स्वरूप दिले पण कामुकता (Sex) हीच नेहमी केंद्रस्थानी असते हे त्याने अमान्य केले फ्रॉईड्ने सागितलेला कामप्रेरणा व ॲड्लर्ने सागितलेला प्रभुत्व प्रस्थापनेचा गड या दोहोचा समावेश युग्च्या प्रेरणामूला (Libido) च्या कल्पनेत होतो युग्च्या मते प्रेरणामूलाच्या कल्पनेत फक्त सर्वसामान्य चेतना एवढाच अर्थ येतो या चेतनेचे शोपेनहॉरच्या जिजीविषेशी (Will to live ) किवा बर्ग्सन्च्या जीवनप्रेरणेशी ( Elan Vital ) बरेच साम्य दिसून येते या चेतनेची विकासासाठी, कार्यासाठी, व उत्पत्तीसाठी सतत धडपड चालू असते अगदी लहान मुलात ही चेतना प्रथम पोषककृति ( Nutritive Activity ) मधून प्रकट होते पोषणाच्या धडपडीला यश आल्यामुळे मुलाला जे सुख मिळतें त्याचा संबध लैगिक सुखाकडे लावणें

इष्ट नाही. कारण ही प्रेरणा अजून सामान्य चेतनशक्तीपासून वेगळी झालेली नसते. अशा रीतीने प्रेरणामूल म्हणजे फक्त कामप्रेरणा नव्हे हे युग्ने स्पष्ट केले आहे. युग्च्या मते फ्रॉईड्ने लैंगिक प्रेरणेला वाजवीपेक्षा जास्त महत्त्व दिले आहे फ्रॉईड्च्या मते युग्ने लैंगिक प्रेरणेचे महत्त्व कमी करून मानसशास्त्राच्या प्रगतीचे पाऊल मागे खेचले.

युग्ने प्रेरणामूलाच्या कल्पनेला पदार्थविज्ञानशास्त्रातील शक्तितत्त्वा-(Energy) मारखेच स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे शक्ति-तत्त्वाचें जरी वीज, उष्णता वगैरेत रूपातर झाले, तरी ती मूळची राहते त्याचप्रमाणे निरनिराळ्या स्वरूपात प्रकट होणारी सामान्य चेतना जशीच्या तशीच राहते युग्च्या मते फॉईड्ने या चेतनाशक्तीचे फक्त कामस्वरूप ओळखले. अॅड्लर्ने फक्त स्वत्व प्रस्थापनेची बाजू ओळखली व चुकीने त्या दोघानी या एकेका बाजूशीच सामान्य चेतना एकरूप आहे असे मानले युग्च्या मते या जीवनप्रेरणेचे स्वरूप सर्वव्यापी असल्याने मानसशास्त्रात हेच गृहीत प्रमेय मानणे यांत्रिक कारणपरपरेपेक्षा जास्त सयुक्तिक आहे

वरील विवेचनाच्या दृष्टिकोनातून मज्जातंतुविकृतीचा अभ्यास करताना युग्ला असे आढळून आले की विशिष्ट परिस्थितीशी तोड देताना अपयशाची शक्यता जेव्हा निर्माण होते, तेव्हाच मज्जाततुविकृति निर्माण होते मनात असलेल्या कल्पनाचे स्वरूप बदलून त्याचे नवीन धर्तीवर सकलन करण्यात अपयश येते मनोविश्लेपणशास्त्रज्ञाने रोग्याच्या पुढील कूटप्रश्न ध्यानात घेऊन तो सोडविण्याची दिशा त्याच्या विचारशक्तीस दाखवून देणे हे काम उपचारात प्रमुख असते. गतायुष्यातील कारणपरपरा शोधीत बसण्यापेक्षा सद्य स्थितीत त्याच्या मनाचा सुटलेला तोल सावरणे हे मनोविश्लेपणशास्त्रज्ञाचे अधिक महत्त्वाचे कार्य आहे. गतायुष्याचा इतिहास रोगनिवारणात मुळीच महत्त्वाचा नाही, असे युग्चे म्हणणे नाही.

**अंतर्वर्तिता (Introversion) व बहिर्वर्तिता (Extroversion) :—** फ्रॉईड् व अॅड्लर् याच्या सिद्धाताचे सकलन करून त्यांच्या विशाल पायावर युंग्ने आपले मानसशास्त्र उभे केले. मज्जातंतुविकृतीची कारणपरंपरा स्पष्ट करताना फ्रॉईड्ने अतृप्त आकाक्षांवर भर दिला तर अॅड्लर्ने स्वत्व

प्रस्थापनेला प्रमुख स्थान दिले. प्रत्यक्ष निरनिराळ्या उदाहरणाचा अभ्यास करताना काही ठिकाणी फ्रॉईड्ची कारणपरपरा लागू पडते तर काही ठिकाणी ॲड्लर्चे सिद्धात लागू पडतात यावरून युग्ने असा निष्कर्ष काढला की व्यक्तिमत्त्वात एकूण दोन प्रकार आढळून येतात. काहीच्या अवधानाचे व आशाआकाक्षाचे केद्रीकरण फक्त स्वत्वाभोवतीच झालेले असते तर काहीच्यात हे केद्र बाहेरच्या परिस्थितीत किवा सामाजिक जीवनात असलेले आढळते पहिल्या प्रकारच्या व्यक्तीना त्याने अन्तर्वर्ती व दुसऱ्या प्रकारच्या व्यक्तीना बहिर्वर्ती अशा सज्ञा दिल्या आहेत बहिर्वर्ती जास्त भावनाप्रधान असतात तर अतर्वर्ती व्यक्ति स्वत शीच विचार करण्यात तासन्तास गढून जाणाऱ्या व स्वप्नाळू प्रवृत्तीच्या असतात सामान्य चेतनेचे केद्रीकरण अतर्वर्ती माणसात स्वत भोवतीच झालेले असते, तर बहिर्वर्ती माणसात चेतनेचे केद्र स्वत बाहेर कोठेतरी असते

युग्ने केलेले हे व्यक्तिमत्त्वाचे प्रकार बरेच महत्त्वाचे म्हणून मानले गेले आहेत सर्व मानवजातीत हे दोन प्रकार दिसतील असे नाही युग्ने स्वत चा आणखी एक प्रकार नमूद करून ठेवला आहे, याला त्याने उभयवर्ती (Ambivert) असे म्हटले आहे या प्रकारच्या माणसाचे अवधान व प्रेरणाचे केन्द्र पूर्णपणे व्यक्तिनिष्ठहि नसते व पूर्णपणे वस्तुनिष्ठहि नसते काही अतर्वर्ती व काही बहिर्वर्ती असे त्याचे वर्णन करता येईल नतरच्या कालात काही शास्त्रज्ञानी निरनिराळ्या प्रश्नमालिका तयार करून त्यावरून मनुष्य किती प्रमाणात अतर्वर्ती व किती प्रमाणात बहिर्वर्ती आहे, हे ठरविण्याचे मार्ग शोधून काढले या प्रश्नमालिकात साधारणत खालील प्रकारचे प्रश्न असतात

(१) तुम्हाला एकात प्रिय वाटतो का ? (२) चार चौघे जमून गप्पा मारणे तुम्हास आवडते का ? (३) तुम्हास गर्दी, गडबड आवडते की शात वातावरण अधिक पसत पडते ? (४) एकच काम तासन्तास करीत बसण्याची तुम्हास आवड आहे का ? (५) कोणत्याहि प्रश्नावर अखेरचा निर्णय घेण्यापूर्वी तुम्ही खूप विचार करता का ? (६) तुम्ही स्वतःशी रमू शकता का ? किती काळपर्यंत ? (७) दैनदिनी लिहिणे तुम्हास आव-

डतें का ? (८) तुम्हास धडाडीची कामे स्वत करावयास आवडतात की धडाडीच्या गोष्टी फक्त वाचावयास आवडतात ?

. अशा रीतीने व्यक्तिमत्त्वाच्या शोधून काढलेल्या प्रकारात पुढे युग्ने पुष्कळ भर घातली युग्चा सर्वात मनोरजक सिद्धान्त असा आहे की जाणिवेत जी मडळी बहिर्वर्ती असतात ती मडळी नेणिवेत अतर्वर्ती असतात याच्या उलट जाणिवेत अन्तर्वर्ती असणारी मडळी नेणिवेत बहिर्वर्ती असतात.

## युंग् व इतर कांही मानस-शास्त्रज्ञ यांची नेणिवेची कल्पना

फ्रॉईड्ने नेणिवेस जितके महत्त्व दिले तितकेच युग्नेहि दिले आहे व्यक्तिगत नेणिवेखेरीज सर्व जातीची किवा वशाची मिळून चालत आलेली नेणिवहि स्वतत्र असते असे युग्चे म्हणणे आहे (Racial unconscious). यात पूर्वजानी मिळविलेले ज्ञान व अनुभव याचा समावेश होतो एका सकलित नेणिवेमधूनच ( Collective unconscious ) व्यक्तीच्या जाणिवेचा अगर नेणिवेचा उगम होतो वाशिक नेणीव ही परपरागत असते इतर बऱ्याच गोष्टी ज्याप्रमाणे आनुवशिक असतात त्याचप्रमाणे ही नेणीवहि अनुवशानेच येते मेंदूच्या ज्या विशिष्ट रचनेमुळे विशिष्ट तऱ्हेच्या वागण्याच्या व विचार करण्याच्या पद्धति आपल्या पूर्वजानी अवलबिल्या, त्याचाच अवलब आपण अजाणता करीत असतो या वाशिक नेणिवेत निरनिराळ्या सहजप्रेरणा व विचाराचे व कल्पनाचे सर्वसामान्य प्रकार याचा मुख्यत: समावेश झालेला असतो विचाराची स्वाभाविक दिशा, कमीतकमी त्रास होईल अशा कृति करण्याची प्रवृत्ति, व जुन्या परपरास चिकटून राहण्याची प्रवृत्ति याचाहि उगम याच वाशिक नेणिवेत असतो पुराणे व जुन्या समाजाचा इतिहास याची माहिती वाशिक नेणिवेच्या अभ्यासाच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे असे युग्चे मत आहे

मानसिक विकृतीचा अभ्यास करणाऱ्याना नेणिवेचे प्रमेय सोयीचें म्हणून ते त्याला मान्यता देतात असे नाही; तर नेणिवेशिवाय त्याचे पाऊल पुढे पडतच नाही जेने, प्रिन्स, फ्रॉईड्, अॅड्लर्, युग् या सर्वांनीच नेणिवेच्या कल्पनेचे आत्यंतिक महत्त्व मान्य केले आहें मात्र नेणिवेच्या स्वरूपासंबधी या सर्वांच्या कल्पना तंतोतंत सारख्या नाहीत मॅक्फर्डीने आपल्या 'मानसिक

आरोग्य ' या पुस्तकात असे म्हटले आहे की, जाणिवेच्या पलीकडच्या प्रातात बोलताना सुद्धा मानसशास्त्रीय परिभाषेचा प्रान्त सुटू नये, एवढ्यासाठीच नेणिवेचे अस्तित्व मानसशास्त्रज्ञ मानताना दिसतात वुड्वर्थचे म्हणणे असे की सर्वच क्रियाना 'मानसिक' हे विशेषण लावता येईल व 'शारीरिक' हेहि विशेषण तेवढ्याच यथार्थतेने लावता येईल शरीरविज्ञानशास्त्राच्या परिभाषेत ज्याला कृतीचे वर्णन करता येईल त्याने तसे करावे, ज्याना मानस-शास्त्राची परिभाषा जास्त पसत पडेल त्यानी त्याच कृतीचे वर्णन या भाषेत करावे इतकेच !

कित्येक शास्त्रज्ञ असे दिसतात की ते फ्रॉईड्, ॲड्लर् किंवा युग् यापैकी एकाचेच अनुयायित्व मान्य करीत नाहीत प्रत्यक्षात उपयोगी पडणारे असे सर्वांचे सिद्धान्त एकत्र करून शास्त्रीय प्रगति करण्याचे बहुतेकाचे धोरण दिसते प्रत्यक्ष इन्द्रियजन्य ज्ञानावरच शास्त्राची उभारणी व्हावी अशा मताचे लोक फ्रॉईड्च्या अबोधात्म्याने किंवा युग्च्या वाशिक नेणिवेने मानस-शास्त्राचे पाऊल खरोखर किती पुढे पडेल याबद्दल साशकता दर्शवितात. मनोविश्लेषण-शास्त्रज्ञानी मानलेली गृहीत प्रमेये आज प्रायोगिक मानसशास्त्रात उपयुक्त म्हणून मान्यता पावलेली आहेत यात शकाच नाही; पण त्याच्या अस्तित्वाबद्दल फार खोलात शिरून आधार शोधू गेल्यास मन प्रश्नचिन्हानी कुंठित होते हे नाकबूल करता येणार नाही.

प्रकरण २७ वे

# हेतुवाद (Purposivism)



निरनिराळ्या मानसशास्त्रीय पथोपपथाच्या तत्त्वविवेचनाचा विचार केला तर एक गोष्ट प्रामुख्याने जाणवते की, प्रत्येकजण एखादे विशिष्ट गृहीतक केंद्रीभूत करून त्यावर आपल्या विवेचनाची इमारत उभारतात घटकवादी ( Existentialists ) वेदनाची महती गातात, वर्तनवादी शारीरिक व्यापाराना मूलस्थानी ठेवितात, साकल्यवादी समष्टीशिवाय इतराना कमी लेखतात, तर मनोविश्लेषणवाद्याचे नेणिवेच्या गृहीतकाखेरीज पान हालत नाही याशिवाय मानसशास्त्रज्ञाचा आणखी एक पथ आहे की, जो मानवी आचरणाच्या मुळाशी असलेल्या प्रयोजनाला—हेतूलाच प्राधान्य देतो खरे पाहता वरील सर्वच गृहीतके आपापल्या परीने महत्त्वाची आहेत व सर्वाचा विचार मानसशास्त्राला अत्यत आवश्यक आहे. पण म्हणतात ना, "अनेक ऋषि अनेक मते." तीच गत मानसशास्त्राची. ज्याला जे महत्त्वाचे वाटते ते मध्ये ठेवून तो मानसशास्त्रज्ञ आपल्या विवेचनाची वीण त्याभोवती करतो.

"प्रयोजनम् अनुद्दिश्य न मदोऽपि प्रवर्तते" हा न्याय व्यवहारदृष्टीने अगदी खरा आहे. मानवी व्यापार हेतुपूर्ण निदान हेतुगर्भ नाहीत, ते पूर्णपणे अहेतुक असतात, हे सिद्ध करणारा शास्त्रज्ञ आपणाला मानवी व्यापाराचे अहेतुकत्व सिद्ध करावयाचे आहे, हे आपले प्रयोजन अप्रत्यक्षपणे वाचकाच्या नजरेस आणीत नाही का ? वर्तनवादीहि आपल्या विवेचनाच्या भरात अशी कबुली देतात की, मानसशास्त्रीय प्रयोगात ज्यावर प्रयोग होतो तो प्राणी हेतूची जाणीव ठेवीत नसेल; पण प्रयोग करणारा हेतूनेच त्या कार्याला प्रवृत्त होतो. याचा अर्थच हा की मानसशास्त्रातून हेतु हा शब्द काढून टाकणें

अशक्यप्राय होय. काही शास्त्रज्ञ तर या हेतूलाच प्रधानपद देतात व आपले विवेचन त्यावर केन्द्रीभूत करतात हेतुवादी पथात या सर्वांचा समावेश होतो.

हेतु म्हटला की दृष्टीसमोर दोन गोष्टी चटकन् उभ्या राहतात मात्र या दोन्ही गोष्टी नेहमीच एकत्र असतात असे नाही जी क्रिया आपण करणार तिचा परिणाम काय होईल, याचा आधी विचार केला जातो हे दूरचे पाहणे (दूरदर्शित्व) हा हेतूचा पहिला घटक आपण करू इच्छिणाऱ्या क्रियेचे विविध परिणाम होऊ शकतील, पण त्यातील एक विशिष्ट परिणाम आपल्याला हवा असतो तोच परिणाम व्हावा अशी आपली तीव्र इच्छा असते ही तीव्र इच्छा अगर मनीषा हा हेतूचा दुसरा घटक हेतुवादी मानसशास्त्रज्ञ या दुसऱ्या घटकाला म्हणजे परिणामविषयक मनीषेला अधिक प्राधान्य देतात व दूरदर्शित्व थोडेसे गौण लेखतात याचमुळे या पथाला प्रवर्तनवादी (Hormic) असेहि सबोधण्यात येते

व्यापक दृष्टीने पाहता पुष्कळसे पथ हेतुवादीच असतात असे म्हणावे लागेल फ्रॉईड्, ॲड्लर्, युग् यानी पुरस्कारिलेली विचारसरणी एकप्रकारे हेतुप्रधानच आहे हे नि मशय साकल्यवादहि हेतूचा पुरस्कार करतो पण मानसशास्त्राच्या अभ्यासात हेतु हाच मुख्य असे हिरीरीने सागणारा शास्त्रज्ञ म्हणजे वुइल्यम् मॅग्डूगल् इ स १९०८ साली "समाज मानसशास्त्रप्रवेश" हा ग्रथ लिहून त्याने या वादाला तोड फोडले सुरवातीस मॅग्डूगल् फ्रॉईड्ची विचारसरणी मान्य करीत नसे, पुढे मात्र त्या विचारसरणीला त्याने आपला पाठिबा दिला वरील ग्रथ लिहून मॅग्डूगल्ने सामाजिक शास्त्रात फार मोठी क्राति केली या ग्रथाचा बोलबाला फार झाला कित्येकजण त्याचे अनुयायी बनले व त्याच्या ग्रथाच्या आधाराने पुष्कळ पुस्तके प्रसिद्ध झाली तोपर्यंत समाज-मानसशास्त्र या नावाचे स्वतत्र शास्त्र होऊ शकेल असे कोणी मानीत नसत समाजशास्त्रज्ञ, इतिहासशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, आपापल्या सोयीप्रमाणे व बुद्धीप्रमाणे सबधित मानसशास्त्रीय सिद्धाताची उकल करीत त्याच्यात एकसूत्रीपणा क्वचितच असे. मानसशास्त्रज्ञानी आतापर्यंत इतर शास्त्राकडे ढुकूनहि पाहिले नव्हते मन, बुद्धि, वेदन, स्मृति, सवयी इत्यादि वैयक्तिक गोष्टीतच त्याचे लक्ष गुतले होते व या गोष्टीशी सामाजिक शास्त्रांचा सबंधच येत नसे; मानवी आचाराचा हेतु काय हे शोधून काढणें

एवढेच त्याचे क्षेत्र. राजशासनसस्थेपुढे माणूस मान का तुकवितो ? एक-मेकाच्या भीतीने की अधिकात अधिक लोकाचे अधिकात अधिक हित व्हावे या इच्छेने, की इतर लोक मान देतात म्हणून आपणहि तसे करावे या अनुकरण बुद्धीने, की जाऊ दे की, कशाला विचार करा अशा आळसाने ? धर्मपालन करविणारी स्वतत्र प्रवृत्ति आहे का ? आपण ज्याला सद्सद्विवेक म्हणतो ती शक्ति सहज आहे की मपादित आहे ? या व इतर सामाजिक प्रश्नाची उत्तरे ज्याला जशी सोयीची पडत तशी दिली जात मानसशास्त्रदृष्टीने याचा विचार अद्यापपावेतो झाला नव्हता. मॅग्डूगल्ने यात प्रथम लक्ष घातले व आपले समाजमानसशास्त्र तर्कनिष्ठ पद्धतीने तयार केले

मॅग्डूगल्ने दोन गोष्टी प्रामुख्याने वाचकाच्या नजरेस आणल्या सामाजिकशास्त्रज्ञ जी आधार नसलेली तत्त्वे लोकाच्या गळी उतरवीत ती कशी खोटी आहेत हे त्याने दाखवून दिले आणि खुद्द मानसशास्त्रज्ञ फक्त बुद्धि-व्यापारावर भर देतात हा त्याचा एकागीपणा कसा घातक आहे हेहि त्याने स्पष्ट केले याचबरोबर अन्तर्निरीक्षण ही एकच पद्धत स्वीकारावी हे त्याला मान्य नव्हते हेतुकार्य व भावनिक व्यापार या क्षेत्रात अन्तर्निरीक्षणाला फारच कमी अवकाश असतो उलट प्राणी, मुले, विकृत माणसे, याचा अभ्यास केल्यास असे स्पष्ट दाखविता येते की प्रत्येक व्यापाराच्या बुडाशी काहीना काही प्रयोजन असतेच बौद्धिक घटकावर भर देणारे मानसशास्त्रज्ञ कबूल करतात, की मानवी व्यापार बुद्धिप्रेरित असतात व त्याची दखल माणूस आधी घेतो, पण अपेक्षित परिणामात एक विशिष्ट परिणामच घडावा असे आपणास का वाटते ? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर एकच की त्या व्यापाराला प्रेरक अशी एक तीव्र मनीषा, मूलभूत गरज किवा जोरदार भावना असते, मात्र ती बुद्धिगोचर नसते

अशा तऱ्हेच्या गृहीतकाच्या आधारे मॅग्डूगल्ने सर्व विवेचन केले. व मानवी व्यापाराच्या मूलभूत हेतूचे मानसशास्त्र तयार झाले ज्या मनीषा, भावना, बुद्धीला आकलन होत नाहीत असे वर म्हटले त्यानाच सहजप्रवृत्ति म्हणावे असें मॅग्डूगल्चे म्हणणे मात्र सहजप्रवृत्तीतील बोधन आणि प्रवर्तन या घटकापेक्षा 'भावन' या घटकालाच मॅग्डूगल् अधिक प्राधान्य देतो. भावन हे सहजप्रवृत्तीचा गाभा आहे. म्हणून कित्येकदा सहजप्रवृत्ति व भावना

या दोघाचे समीकरण होते उदाहरणार्थ राग ही सहजप्रवृत्ति की भावना हे ओळखणे कठीण पडते मॅग्डूगल्ने प्रत्येक सहजप्रवृत्तिबद्दल एकेक स्वतत्र भावन मानले आहे (याबद्दलची अधिक माहिती पूर्वी आलीच आहे) सहजप्रवृत्ति या सपादित नसून आनुवशिक असतात प्राणिमात्राच्या सर्व कृतीचे मूळ या सहजप्रवृत्तीत दिसून येते. विजेचा मूळ प्रवाह रोखला तर सर्व कारखाना बद पडतो, तद्वतच सहजप्रवृत्तीचा व्यापार थाबला म्हणजे मानवी व्यवहार सपलाच असे होईल मानवी आचरणाचा सूक्ष्म अभ्यास केला तर असे दिसते की मनुष्याची सर्व धडपड सुखाची प्राप्ति व दु खपरिहार यासाठी असते हे ध्येय निश्चित धरले की प्रवर्तक प्रयोजनाची आवश्यकता भासू लागतेच, सहजप्रवृत्ति हे प्रयोजन निर्माण करतात असा हेतुवादाच्या विवेचनाचा एकदर रोख आहे.

मॅग्डूगल् सहजप्रवृत्तीना महत्त्व देत असला तरी सहजप्रवृत्ति या कायम स्वरूपाच्या असतात असे तो मानीत नाही शिक्षणाने व अनुभवाने सहज-प्रवृत्त व्यापार बदलू शकतात व त्यामुळेच मानवी आचरणात सापेक्ष प्रति-क्षेपाला महत्त्व आले सहजप्रवृत्तीत बदल होतो इतकेच नव्हे तर त्याचे मिश्रण होऊन त्यातून कार्यप्रवृत्त करणारी स्वतत्र वृत्ति निर्माण होते यानाच स्थिरभाव ही सज्ञा देण्यात येते मानवाच्या आचरणात सहजप्रवृत्तीपेक्षा स्थिरभाव अधिक जोरदार असतात

एखाद्या व्यक्तीभोवती, वस्तूभोवती, प्रसगाभोवती अनेक सहजप्रवृत्ति एकत्र येऊन एक स्थिरभाव बनतो व हा स्थिरभाव माणसाला त्या त्या बाबतीत कार्यप्रवण करीत असतो उदाहरणार्थ, देशाभिमान ही काही सहजप्रवृत्ति नाही त्यात अनेक प्रवृत्तीचा सुदर मिलाफ झालेला दिसेल. देशावर सकट येणार या विचाराने भीति वाटू लागते परकीयाच्या आक्र-मणाचा राग येतो, आतरराष्ट्रीय स्पर्धेचा प्रश्न आला की अहप्रवृत्ति जागृत होते. अशा अनेक भावनाची सुदर गुफण म्हणजे देशाभिमान होय आपली आई, आपले वडील, आपले कुटुब, आपली शाळा, आपला समाज, आपला देश, आपला धर्म इत्यादिकाच्या बाबतीत लहानपणीच स्थिरभाव तयार होऊं लागतात. मुलाच्या ठिकाणचा आत्मविषयक स्थिरभाव (Self-regarding

Sentiment) फारच बलवत्तर असतो आणि त्याच्या तीव्रतेवर आत्म-नियमन, नीतिमत्ता, ध्येयसिद्धि इत्यादि वैयक्तिक गोष्टी अवलबून असतात.

स्थिरभाव हेच खरोखर मानवी व्यापाराच्या बुडाशी असतात असा मॅग्डूगल्च्या विवेचनाचा निष्कर्ष. सर्वच आचरण बुद्धिनिष्ठ वा बुद्धिगम्य असे नाही आचरणाचा मोठा भाग प्रेम-द्वेष, आवडनावड, स्पर्धाईर्षा इत्यादि भावनानी भारावलेला असतो. विशेषत माणसाचे समाजातील वर्तन अत्यल्प प्रमाणात बुद्धिनिष्ठ असते त्यात भावनाचा जोर अधिक असतो. सघप्रवृत्तिच पहा ना ! या प्रवृत्तीचे मूळ कार्य म्हणजे गट तयार करणे पण एकदा का गट तयार झाला म्हणजे गटातील घटकाचे व्यक्तित्व कमी प्रभावी ठरते अनेक भावनिक वृत्ति एकत्र होतात व विशिष्ट सामाजिक स्थिरभाव विकास पावतात याच स्थिरभावाच्या उत्तेजनाने गटातील प्रत्येक व्यक्ति विशिष्ट कार्य करण्यास प्रवृत्त होते.

मॅग्डूगलचे हेतुवादीय विवेचन अनेकाना आवडले, पुष्कळाना पटले, काहीनी त्यावर ग्रथ लिहिले परतु सहजप्रवृत्तीची जन्मसिद्धता न मानणारा जो पक्ष होता, त्याने मॅग्डूगल्च्या विवेचनावर जोराचा हल्ला चढविला. बर्नार्ड् या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञाने सहजप्रवृत्तिविषयक सिद्धान्ताचा फोल-पणा दाखविण्याचा फार मोठा प्रयत्न केला काहीच्या मते मॅग्डूगल्चे गृहीतक मुळी मानसशास्त्रीय होऊ शकत नाही हेतुसशोधन हे तत्त्वज्ञानाचे क्षेत्र असल्यामुळे त्याला मानसशास्त्रात स्थान नाही म्हणून मॅग्डूगल्चे सर्व प्रयत्न निष्फळ आहेत असे असले तरी समाजमानसशास्त्र हा आता एक स्वतत्र अभ्यसनीय विषय बनला ह्याचे श्रेय मॅग्डूगल्लाच देणे आवश्यक आहे अनेक मानसशास्त्रीय शोध मॅग्डूगल्च्या विवेचनामुळे शक्य झाले राज्यशासनसस्था, शिक्षण, औद्योगिक कार्य इत्यादि प्रान्तात समाजमनाचा अभ्यास फलदायक झाला आहे व होत आहे म्हणून मॅग्डूगल्च्या हेतुवादाच्या अध्ययनाविना मानसशास्त्राचे अध्ययन पुरे होत नाही

प्रकरण २८ वें

# प्रायोगिक मानसशास्त्र



मानवी वर्तणकीविषयी कार्यकारणभाव दाखविणारे सिद्धांत मांडणे हे मानसशास्त्राचे कार्य आहे. उदाहरणार्थ, भीतीमुळे असत्यकथनाची सवय लागते, दीर्घकाळ काम केल्याने कार्यक्षमता कमी होते, अभ्यासाने उदाहरणे लवकर सुटतात इत्यादि सिद्धांत मानसशास्त्रज्ञ मांडतात. अशा सिद्धान्ताची प्रतीति बघण्यासाठी प्रयोग आवश्यक असतात. कारण आधुनिक शास्त्रीय दृष्टि 'नामूल लिख्यते क्वचित्' या तत्त्वाशी एकनिष्ठ राहणारी आहे. अर्थात् मानसशास्त्रज्ञानाहि केवळ दंतकथा अथवा आत्मनिरीक्षण यांच्या पोकळ आधारावर सिद्धांत रचता येत नाहीत. प्रयोगाने त्या सिद्धांताची सत्यता पटवून द्यावी लागते.

ही प्रायोगिक पद्धत अर्थात् भौतिक शास्त्रापासून उचललेली आहे. उदाहरणार्थ उष्णतेमुळे घनपदार्थ प्रसरण पावतात हा सिद्धांत घ्या. या सिद्धांताची प्रतीति पटविणाऱ्या प्रयोगासाठी लोखंडी गोळा, लोखंडी वलय, स्पिरिटचा दिवा इत्यादि वस्तु लागतात. दिव्यावर वलय तापविले असता त्याचा आकार वाढतो व आधी त्या वलयातून पार जाणारा गोळा प्रसरणानंतर जाऊं शकत नाही. ही घटना प्रत्यक्ष दाखवून मूळ सिद्धान्ताची सत्यता पटवून देता येते. या प्रयोगाचे वैशिष्टय असे आहे की त्यास लागणाऱ्या वस्तु ठराविक आकाराच्या व मापाच्या घेता येतात. द्यावयाच्या उष्णतेचे मान ठरवितां येतें व उष्णतेमुळे होणारे फरक अचूक मोजता येतात. शिवाय हा प्रयोग निरनिराळ्या व्यक्तींना पुनःपुन्हा करून पाहता येतो, म्हणून त्यावरून निघणाऱ्या निष्कर्षांत व्यक्तिनिरपेक्ष वास्तवता व विश्वसनीयता असते.

परिस्थितीतील इतर घटक कायम ठेवून प्रयोगविषय असलेला घटक मात्र ठराविक प्रमाणात बदलता येणे हे प्रयोगाच्या विश्वसनीयतेसाठी आवश्यक असते हे काटेकोर नियंत्रण मानवी वर्तणुकीवरील प्रयोगाबाबत पाळणे साधारणत शक्य होत नाही उदाहरणार्थ, अध्ययनासाठी दुपारपेक्षा सकाळची वेळ जास्त अनुकूल असते हा सिद्धात घ्या अध्ययनासाठी द्यावयाचा वेळ, सोडवण्यास द्यावयाच्या उदाहरणाची कठिणता, प्रयोगासाठी घ्यावयाच्या मुलाची बुद्धिमत्ता व पूर्वज्ञान इत्यादि घटक आपल्याला नियंत्रित करता येतील, पण मुलाची अभ्यासाविषयीची वृत्ति नियंत्रित करता येणार नाही. आणि या वृत्तीवर तर मुलाचा अभ्यास बराचसा अवलबून असतो तसेच आपण प्रयोगविषय झालो आहोत या जाणिवेने सुद्धा मानवी वर्तणुकीत फरक घडू शकतो आणि प्रयोग चालू आहे ही गोष्ट लपविणे नेहमीच शक्य होत नाही मनोवृत्तीचा अनियंत्रितपणा व जाणिवेचा परिणाम हे दोन घटक मानसशास्त्रीय प्रयोगाना बाधक ठरू शकतात

शिवाय असे काही मानसशास्त्रीय सिद्धात आहेत की त्याविषयी प्रयोग करणे अशक्य आहे उदाहरणार्थ, उपासमारीमुळे बुद्धिमत्तेवर अनिष्ट परिणाम होतो हा सिद्धान्त घ्या या सिद्धाताचा पडताळा पाहण्यासाठी काही मुलाची मुद्दाम उपासमार करावी लागेल पण असे करणे आपल्या सामाजिक नीतीशी विसगत आहे मानवी वर्तणुकीबाबत प्रयोग करणे अशा रीतीने कठीण असल्यामुळे इतर प्राण्यावर विशेषत उदरा-माकडावर प्रयोग करणे मानसशास्त्रज्ञ पसत करतात

तथापि मानवी वर्तणुकीवरहि अनेक प्रयोग झालेले आहेत व नित्य होत आहेत हे प्रयोग कशा तऱ्हेने केले जातात याची स्पष्ट कल्पना प्रोफेसर फिच् याना केलेल्या एका प्रयोगावरून येईल या प्रयोगाचा हेतु अकगणित शिकविण्याच्या पद्धतीचा अनुमानशक्तीवर होणारा परिणाम अजमावून पाहण्याचा होता प्रो फिच् याचा असा कयास होता की सोपपत्तिक पद्धतीने अकगणित शिकविले असता अनुमानशक्ति वाढते प्रथम प्रो फिच् यानी अनुमानशक्तीचे मापन करणाऱ्या दोन तुल्यबल कसोट्या तयार केल्या. प्रत्येक कसोटीत शभर समस्या होत्या.

बारा वर्षे वयाच्या पुष्कळशा मुलींना त्यांनी पहिली कसोटी दिली. नंतर त्या मुलींपैकी मुली निवडून दोन समान गट तयार केले दोन्ही गटातील मुलींची संख्या समान होती, त्यांची बुद्धिमत्ता समान होती, व दोन्ही गटातील मुलींनी प्रत्येकी पहिल्या कसोटीतील ३५ समस्या सोडविल्या होत्या

या दोन गटांपैकी एका गटास १० आठवडे पर्यंत प्रो फिच् यांनी सोपपत्तिक पद्धतीने अंकगणित शिकविले दुसऱ्या गटास नेहमीचेच शिक्षक त्या मुदतीत नेहमीच्याच पद्धतीने अंकगणित शिकवीत होते

दहा आठवड्यानंतर दोन्ही गटांना अनुमानशक्तीची दुसरी कसोटी देण्यात आली तेव्हा ज्या गटाला सोपपत्तिक पद्धतीने अंकगणित शिकवले होते त्या गटातील मुलींनी प्रत्येकी ४९ समस्या सोडविल्या, व दुसऱ्या गटातील मुलींनी प्रत्येकी ३९ समस्या सोडविल्या म्हणजे ४ समस्या जास्त सोडविणे हा केवळ सवयीचा व कालगतीने होणाऱ्या विकासाचा परिणाम होय पण त्याहून १० जास्त समस्या सोडविणे हा सोपत्तिक पद्धतीने अंकगणित शिकविल्याचा परिणाम होय अर्थात् ही पद्धत अनुमानशक्तीच्या वाढीला उपकारक असते हे सिद्ध झाले

यावरून मुलांवर करावयाच्या मानसशास्त्रीय प्रयोगात कोणती खबरदारी घ्यावी लागते ते दिसून येते प्रयोगाचा हेतु निश्चित करावा लागतो, प्रयोगाची प्रक्रिया निश्चित करावी लागते, त्यासाठी लागणारे साहित्य काळजीपूर्वक तयार करावे लागते आणि केवळ सवयीमुळे व कालगतीने होणारे फरक लक्षात येण्यासाठी अनियंत्रित (म्हणजे ज्यावर प्रयोग केला जात नाही असा) गट ठेवावा लागतो

सिद्धान्ताची प्रतीति पटविणे हे जसे मानसशास्त्रीय प्रयोगाचे कार्य आहे, तसेच सिद्धान्त मांडण्यास उपयोगी पडणारी माहिती जमविणे हेहि आहे उदाहरणार्थ, मुलांच्या उपजतशक्ति कोणत्या असतात, ८ वर्षांच्या मुलांच्या आवडी काय असतात, कुमारवयात बालकाच्या वर्तनात कोणते फरक घडून येतात, इत्यादि माहितीचा संग्रह करणे हेहि प्रायोगिक मानसशास्त्राचे कार्य होय. अर्थातच अशा संग्राहक कार्याची प्रक्रिया वेगळी असते. या कार्यासाठी चिकाटी, पूर्वग्रहापासून अलिप्तता आणि सूक्ष्मनिरीक्षणक्षमता या गुणांची आवश्यकता असते

प्रायोगिक मानसशास्त्राच्या कार्याला सुरवात सुमारे १०० वर्षापूर्वी म्हणजे १८६० च्या सुमारास झाली फेक्नर्-सिद्धाताचा प्रणेता मानसशास्त्रज्ञ फेक्नर् यास या शास्त्राचा जनक मानतात "सवेदनविषयक अनुभवात फरकाची जाणीव होण्यासाठी चेतकात काही विशिष्ट परिमाणात फरक करणे आवश्यक असते," हा फेक्नर् सिद्धात होय उदाहरणार्थ आधी २०० तोळ्याचे वजन हातावर देऊन नतर २०२ तोळ्याचे वजन दिल्यास फरकाची जाणीव होणार नाही पण आधी ४ तोळ्याचे वजन हातावर देऊन नतर ६ तोळ्याचे वजन दिल्यास फरक जाणवतो

प्रायोगिक मानसशास्त्राच्या प्रारभीच्या काळात बरेचसे प्रयोग इद्रियवेदनावरच झाले. उदाहरणार्थ, किती अतरावर टाचणी टोचली असता वेगवेगळी वेदने होतात, घड्याळाचा आवाज किती अतरावरून ऐकू येऊ शकतो, शब्दाची जाणीव किती सेकदात होऊ शकते, बोटाने वजन उचलीत राहिल्यास कार्यक्षमतेत घट केव्हा होते इत्यादि अनेक प्रयोग करून वर्तणुकीला आधारभूत जी शारीरिक क्रिया तिच्याबद्दल बरीचशी सूक्ष्म माहिती गोळा करण्यात आली

त्यानतर हळूहळू मानसिक वर्तणुकीविषयी प्रयोग सुरू झाले. त्यात स्मृतिविषयक प्रयोग पुष्कळ आहेत जर्मन मानसशास्त्रज्ञ एबिंग्हॉस् याने या प्रयोगासाठी अर्थशून्य मूळाक्षरगटाचा उपयोग करण्याचे तत्र शोधून काढले. मराठीत पड या गटाला अर्थ आहे म्हणून त्याचे स्मरण ठेवताना अर्थाची मदत होऊ शकेल, पण डप या गटाला अर्थ नाही म्हणून त्याचे स्मरण ठेवताना अर्थाची मदत होणार नाही असे गडक, डलव, अकुब, नरथ इत्यादि अनेक गट तयार करता येतील तसे तयार करून ऐबिंगहॉसने त्या गटाचे पाठांतर करण्याविषयी अनेक प्रयोग करून स्मृतिविषयक महत्त्वाचे सिद्धात माडले. पाठान्तरासाठी दिलेल्या मजकुराची दीर्घता तसेच पाठान्तरासाठी घेतलेले श्रम, व पाठान्तरासाठी दिलेल्या काळाची विभागणी यावर स्मरण अवलंबून असतें हे त्याने दाखवून दिले

स्मृतिविषयक प्रयोगात प्रा. पाइल् व स्नाइडर् यानी केलेला प्रयोग उल्लेखनीय आहे. पाठान्तर खंडपद्धतीने करणे अधिक श्रेयस्कर की समग्र

पद्धतीने करणे अधिक श्रेयस्कर हे निश्चित करण्याचा या प्रयोगाचा हेतु होता पाठान्तरासाठी २४० पद्यपक्तीची निवड करण्यात आली विद्यार्थ्याच्या एका गटाने दररोज २० ओळी पाठ केल्या दुसऱ्या गटाने सर्व २४० ओळी दररोज तीनवेळा वाचल्या प्रयोगाच्या शेवटी असे आढळून आले की समग्र पद्धतीने पाठातरास वेळहि कमी लागतो व ते अधिक पक्के होतें.

चित्तविक्षेपाचा पाठान्तरावर होणारा परिणाम अजमावण्यासाठी प्रा. फोर्ड् यानी केलेला प्रयोगहि उद्बोधक आहे यात वर्गातील विद्यार्थ्याना ६० ओळी छापून देण्यात आल्या होत्या प्रत्येक ओळीत काही आकडे होते व काही अक्षरे होती दिलेले कार्य प्रत्येक ओळीतील आकड्याची बेरीज करून ती लिहिणे हे होते पहिल्या आठ ओळीतील आकड्याची बेरीज करताना वातावरण शात ठेवण्यात आले होते नतरच्या ६ ओळीतील आकड्याची बेरीज चालू असताना चित्तवेधक आवाज करण्यात आले. नतर पुन्हा ६ ओळीतील आकड्याची बेरीज चालू असताना वातावरण शात ठेवण्यात आले होते हा क्रम सर्व साठ ओळीतील आकड्याची बेरीज सपेपर्यंत चालू ठेवण्यात आला प्रयोगावरून असे आढळून आले की परिस्थिति बदलताच कामात मथपणा येतो म्हणजे आवाज सुरू झाल्याबरोबर व पुन्हा शातता झाल्याबरोबर दोन्ही वेळा कामाची गति मदावते तसेंच आवाजाचा बिनचूकपणावर परिणाम होत नाही पण आवाज चालू असताना होणाऱ्या कामाने थकवा जास्त येतो

मनुष्येतर प्राण्याच्या विद्यार्जनाच्या स्वरूपाविषयी प्रो थॉर्न्‌डाइक् व प्रो. कोह्‌लर् यानी केलेले प्रयोग त्यातील निष्कर्षाच्या परस्परविरोधामुळ सुप्रसिद्ध झालेले आहेत प्रो थार्न्‌डाइक् यानी माजरावर प्रयोग करून विद्यार्जन यत्नस्खलितनिष्ठ असते असा सिद्धान्त माडला व प्रो. कोह्‌लर्‌ने वानरावर प्रयोग करून विद्यार्जनाची प्रक्रिया उपजत ज्ञानावर ( Insight ) आधारलेली असते असे मत दिले अशा रीतीने मानसशास्त्रीय प्रयोगाच्या मिष्कर्षात विसंगति आढळल्याची उदाहरणेहि अनेक आहेत बुद्धिमापनाची साधने निर्माण करणे प्रायोगिक मानसशास्त्राचे महत्त्वाचे कार्य मानले जातें तथापि परिस्थितीमुळे बुद्ध्यंक बदलतो की नाही याविषयी प्रायोगिक मानसशास्त्रज्ञाचे प्रयोगसिद्ध सिद्धात सारखे हेलकावे खात आले आहेत.

विशिष्ट विषयाच्या अभ्यासाचा बौद्धिक कार्यक्षमतेवर कांही परिणाम होतो की काय या प्रश्नाला उत्तर देण्यासाठी प्रो थॉर्न्डाइक् यांनी केलेल्या संस्मरणीय प्रयोगाचा उल्लेख करून हे विवेचन संपवू. हा प्रयोग ८००० विद्यार्थ्यांवर वर्षभर करण्यात आला. आधी सर्व विद्यार्थ्यांना बौद्धिक कसोटी देऊन त्याची बौद्धिक कार्यक्षमता मोजण्यात आली नंतर वर्षभर विद्यार्थ्यांचा नेहमीचा अभ्यास चालू होता. अमेरिकेत विद्यार्थ्यांना विषयाची निवड आवडीप्रमाणे करता येते म्हणून प्रो थार्न्डाइक् यानी विद्यार्थ्यांचे असे गट पाडून ठेवले होते की प्रत्येक गटाच्या जोडीत फक्त एकच विषय भिन्न असेल. उदाहरणार्थ इंग्रजी अथवा गणित अथवा शास्त्र अर्थात् या एकाच विषयाच्या अभ्यासाचा विद्यार्थ्यांच्या बौद्धिक कार्यक्षमतेवर काय परिणाम झाला ते पडताळणे सुलभ होते. वर्षाच्या शेवटी पुन्हा बौद्धिक कसोटी देऊन मुलाच्या बौद्धिक कार्यक्षमतेचे पुन्हा मापन करण्यात आले. व पहिल्या व दुसऱ्या मापनात काय फरक झाला व तो कोणत्या विषयाच्या अभ्यासामुळे झाला ते ठरविण्यात आले. इतर विषय समान असल्यामुळे हे शक्य झाले नतर निरनिराळ्या विषयाच्या परिणामाची तुलना करण्यात आली त्यावरून असा निष्कर्ष निघाला की कोणत्याच विषयाच्या अभ्यासाने बौद्धिक कार्यक्षमतेत उल्लेखनीय फरक होत नाही. अर्थात् विद्यासंक्रमणाचा (Transfer of Training) सिद्धात विश्वसनीय नाही.

वेदन, स्मरण, अवधान, अनुमान, विद्यार्जन, विद्यासंक्रमण इत्यादि अनेक मानसिक कार्यांच्या बाबतीत प्रयोगशाळातून अखड संशोधन पाश्चात्य देशात चालू आहे. तसेच स्वभावविशेषाचे मापन करण्याचाहि प्रयत्न चालू आहे. अशा प्रयोगाची आवश्यकता मनाविषयीचे ज्ञान सपन्न व निश्चित करण्यासाठी फार आहे. अजून आपल्या देशात प्रयोगाचें कार्य फारसें झालेलें नाही. तसे होणे जरूर आहे. मानव वर्तणुकीत देशपरिस्थितिनुसार फरक आढळून येतात. म्हणून पाश्चात्यानी केलेल्या प्रयोगाचे निष्कर्ष तसेच्यातसे भारतात स्वीकारणे धोक्याचें आहे. आपल्या मानसशास्त्रास आपण केलेल्या प्रयोगाचा भरभक्कम आधार हवा.

**(प्राध्यापक) रा. म. मराठे.**

## प्रकरण २९ वें

# मानसशास्त्र आणि मानवी व्यवहार



अडचण आली की मनुष्य उपाय शोधू लागतो. उपाय शोधण्याच्या या धडपडीतून अनेक व्यवहारोपयोगी शास्त्रीय शोध लागले मानसशास्त्राचेहि असेच झाले बुद्धीचे मोजमाप कसे ठरवावे हा महत्त्वाचा प्रश्न शालाधिकाऱ्यापुढे, कारखानदारापुढे, व्यापाऱ्यापुढे उभा राहिला. त्याचे उत्तर म्हणून विविध तऱ्हेच्या कसोटया निर्माण करण्यात आल्या. विकृतमज्ज रोगी कसे बरे करावेत या बिकट प्रश्नाच्या विवचनेतून फ्रॉईड्सारख्या भिषग्वरानी मनोविश्लेषण सुरू केले आज त्याचा उपयोग अनेक तऱ्हानी होत आहे किंबहुना आजच्या मानवी व्यवहारात मानसशास्त्राला एक मोठें प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त झाले आहे हे निःसशय ते कसे, याचा आपण थोडक्यात विचार करू

**शिक्षण व मानसशास्त्र** —"गुरुजी रामाला गणित शिकवितात" या वाक्यात आपणास तीन मुख्य घटक दिसतात गुरुजी, रामा व गणित हे ते घटक होत पूर्व काली कर्ता म्हणून 'गुरुजी' या घटकाला महत्त्व होते. आजहि ते कायम आहे पण दुसऱ्या दोन घटकापैकी पूर्वी 'गणित' या घटकाला अधिक महत्त्व दिले जाई. 'रामाची' तितकीशी कोणी पर्वा करीत नसत आज ही गोष्ट संपूर्णपणे बदलली आहे. गणित हा विषय रामाला शिकवावयाचा आहे हें दृष्टीसमोर ठेवून गुरुजी रामालाच शिक्षण प्रक्रियेत मानाचें स्थान देऊ लागले. त्याचा परिणाम असा झाला की 'राम' विषयक पूर्ण ज्ञान गुरुजीस आवश्यक झाले. याचाच अर्थ रामाचे मन समजावून घेणें अपरिहार्य झालें. मानसशास्त्राशिवाय हे अशक्य झाल्यामुळे शिक्षणात मानसशास्त्राने प्रवेश केला. याशिवाय शिक्षकालाहि स्वतःविषयीचे ज्ञान

हवेच असते मानसशास्त्र हीहि गरज पुरविते वर्गांत एकटाच रामा नाही. आणखीहि मुले असतात. त्याचे प्रत्येकाचे ज्ञान, शिवाय वर्गात ती सर्व मुले एकत्र आली म्हणजे त्या समुदायाचे मानसशास्त्र माहित असणे आवश्यक ठरले. सर्वच मुले बुद्धीने सारखी नसतात त्या दृष्टीने निरनिराळे विषय शिकविण्याच्या निरनिराळ्या पद्धति शिक्षक उपयोगात आणू लागला अशा रीतीने शिक्षणक्षेत्रात असा एकहि भाग उरलेला नाही की जेथे मानसशास्त्राच्या ज्ञानाची जरुरी नाही उलट मानसशास्त्र पढल्याशिवाय कोणी शिक्षक वर्गात पाऊल ठेवील तर ती गोष्ट हास्यास्पद तर ठरेलच, पण मुलाच्या दृष्टीने अनिष्टहि झाल्याशिवाय राहणार नाही

**कारखाने व मानसशास्त्र** .—वाढती उत्पादनक्षमता ही उद्योगधंद्याच्या यशाची गुरुकिल्ली आहे यंत्रामुळे उत्पादन वाढले हे खरे पण यंत्रे चालविण्याला अजूनहि मानवी प्राण्यांची जरुरी आहेच अनेक गोष्टी जरी यंत्राच्या साहाय्याने होत आहेत, तरी अशा कितीतरी सहस्र गोष्टी आहेत आहेत की त्या करण्यासाठी माणसाची उपस्थिति आवश्यक असते या माणसानी —मजुरानी कोणत्या पद्धतीने काम करावे, त्यानी विश्रांति कशी व किती घ्यावी याबद्दल अनेक प्रयोग करून मानसशास्त्रज्ञानी उत्पादनक्षमतेला आवश्यक गोष्टी ठरवून दिल्या आहेत जुन्या काळी आपल्या नोकरानी एकसारखे काम करीत रहावे यासाठी मालक फार दक्षता घेत. त्याच्या कोत्या बुद्धीला वाटे की नोकरानी दहा, बारा तास सारखे काम केले, की कामाचा डोंगर पडेल या उलट मानसशास्त्रज्ञानी ठरविले की मालकाचे हे धोरण कार्य—निष्पत्तीच्या दृष्टीने कुचकामी आहे प्रयोगावरून असे सिद्ध झाले की सकाळच्या प्रहरी कामाला सुरवात झाली की दुसऱ्या प्रहरात काम जास्त जास्त केले जाते तिसऱ्या प्रहराला त्याला उतरती कळा लागते. मध्ये जेवण व थोडीशी विश्रांति झाली की कामाला थोडासा जोर येतो मात्र ते सकाळच्या दुसऱ्या प्रहराइतके होत नाही सध्याकाळी तर कामाला ओहोटीच लागते मजूर अधिकाऱ्याच्या भीतीने हातपाय हलवितात असें दिसते पण प्रत्यक्ष काम मात्र अगदी अल्प होते. दिवसाप्रमाणें आठवड्याचें मोजमाप घेतले, ते असे. सोमवार साधारणच जातो, मंगळवार, बुधवार जास्तीत जास्त काम होते. पुढे पुन्हा कमतरता येत जाते. शनिवारी कमीत

कमी काम होते अशा रीतीने कामाच्या आड येणारा थकवा कसा नाहीसा करावा याचा विचार सुरू झाला विश्रांतीच्या वेळा वाढविण्यात आल्या, कामाचे तास कमी करण्यात आले आणि मौज अशी झाली की या प्रयोगाने उत्पादनात नजरेत भरण्याजोगी वाढ झाली

मजुराच्या भावना, सुखदु खे याचाहि उत्पादनाच्या दृष्टीने अभ्यास करावा लागतो मजुरीपेक्षा मजूर स्वाभिमानाला अधिक जपतो आपल्या कामाची वाहवा होते की नाही याकडे त्याचे लक्ष असते. शिवाय नौकरीची शाश्वतीहि त्याला हवी असते आपल्या क्षेत्रात आपणाला स्वातंत्र्य असावे, वेळप्रसंगी आपल्या कुवतीप्रमाणे आपल्या कामात काही नवीन प्रयोग करावे अशी कित्येकाची इच्छा असते मजुराच्या या मन स्थितीची जाणीव ठेवून मालकानी कारखाना चालविल्यास त्यात दोघाचाहि फायदा होतो हे मानसशास्त्रज्ञानी सिद्ध केले

कारखान्यात होणाऱ्या पुष्कळशा अपघाताच्या मुळाशी मानसशास्त्रीय कारणे असतात काही मजूर स्वभावत च अपघातप्रवण ( Accident Prone ) असतात अशा लोकाचा अभ्यास करून थकवा, दुखणे, अनुभव, चिन्ता, भावनाशीलता, इत्यादिमुळे या लोकाच्या हातून अपघात घडतात, असे दिसून आले कारखान्यातील वातावरण हाहि उत्पादनातील एक प्रमुख घटक आहे छताचा रंग, भिंतीचा रग, उजेड, कारखान्यात होणारा एकसूरी आवाज, फिरती हवा, उष्णतामान, थडीचे प्रमाण या सर्वाचा मजुराच्या मनावर परिणाम होतो मानसशास्त्रज्ञाच्या यासबधीच्या शिफारशी कारखानदाराना फारच फायद्याच्या झाल्या आहेत

**नोकरभरती व मानसशास्त्र** —नोकरभरती म्हटली की अर्ज मागविणे, अर्जदारातून निवड करणे, योग्य कामी लायक माणस नेमणे, वेतन वाढ, बदली, बडतर्फी, नोकराची गाऱ्हाणी इत्यादि गोष्टीची यादी आपल्या डोळ्यासमोर उभी राहते मानसशास्त्रज्ञानी या बाबतीतहि अनेक प्रयोग करून निर्णय ठरविले आहेत नोकर ठेवतानाची पद्धत म्हणजे अर्ज, शिफारसपत्रें, फोटो, प्रत्यक्ष भेट हा विधि ठरलेला नोकराची लायकी ठरविताना नुसता अर्ज हा अगदी निरुपयोगी ठरतो शिफारसपत्राच्या बाबतीतहि तसेंच. शिफारस पत्र देणारा सहसा वाईट लिहीत नाही. फोटोवरून अर्ज-

दाराचा रुबाब पारखता येतो; पण प्रत्यक्ष मूर्ति आणि फोटो यात पुष्कळदा महदंतर असते. राहता राहिला एकच उपाय; तो म्हणजे प्रत्यक्ष भेट. या प्रसगी उपयोगी पडाव्या अशा अनेक कसोटचा मानसशास्त्रज्ञानी तयार केल्या आहेत व्यापार-कसोटचा, प्रावीण्य-कसोटचा, कृति-कसोटचा, बुद्धि-कसोटचा इत्यादीच्या योगाने अर्जदाराची लायकी पारखली जाते व योग्य माणसाची नियुक्ति करणे सोपे जाते

**जाहिरात-प्रचार व मानसशास्त्र**.—नित्याच्या विक्रीत, व्यापारी देवघेवीत व जाहिरातीत औद्योगिक मानसशास्त्राची पदोपदी जरुरी भासते. जाहिराती आकर्षक होण्यासाठी शीर्षकाची लाबी रुदी किती असावी ते कोणत्या रगात असावे, याबाबतहि नियम ठरविलेले आहेत मुखपृष्ठाचा वरचा उजवा कोपरा वाचकाच्या चटकन् दृष्टीस पडतो मुखपृष्ठावरील अगर शेवटच्या पानावरील पानभर पसरलेली जाहिरात वाचकाच्या नजरेतून मुळीच सुटत नाही पेढीची व दुकानाची नावे, पाटचाचा रग, अक्षराची ठेवण, इत्यादि गोष्टीहि मानसशास्त्राच्या कक्षेतून सुटत नाहीत आणि विक्रेता, याला तर दुकानाची पायरी चढून येणारे प्रत्येक गिऱ्हाईक चटकन् ओळखता आले पाहिजे यशस्वी विक्रेत्याने मानसशास्त्राचे ज्ञान मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न केला पाहिजे प्रचार या शब्दाला साप्रत फार वाईट अर्थ येत चालला आहे परतु चागल्या गोष्टीचा प्रचार करणे हे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य असल्याने प्रचाराला लोकशाहीत फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. उदाहरणेच पाहिजे असल्यास दारूबदी किवा प्रौढ शिक्षण या चळवळी घ्या यात प्रचाराशिवाय काय करता येईल ? कायद्याने दारूबदी करण्याचा प्रयत्न चागला असला तरी त्या चळवळीला पूर्ण यश तेव्हाच मिळेल की, ज्या वेळी दारुडचाचे मन पालटेल माणसाची काही बाबतीत मनाची ठेवण विशिष्ट तऱ्हेने बनते ही ठेवण बदलण्याचा प्रचार हा एक उपाय आहे. अर्थात् अशा वेळी सूचना ही जी मानवी स्वभावाची सर्वसाधारण प्रवृत्ति सागितली तिचा उपयोग प्रचारकास करणे भाग पडते

चागल्या क्षेत्रात प्रचाराला जसें महत्त्व आहे, त्याचप्रमाणे प्रत्येक नागरिकास प्रचाराचे मानसशास्त्रहि माहीत असणें तितकेंच आवश्यक आहे. लोकशाही राज्यात अनेक ध्येयें डोळयासमोर ठेवून अनेक पंथ, पक्ष, उपपक्ष

निर्माण होतात. यापैकी प्रत्येक आपलेच म्हणणे खरे, आपलेच धोरण राष्ट्राला लाभदायक, कल्याणकारक असे पटविण्याचा प्रयत्न करीत असतो असे करीत असताना आपल्या विरुद्ध पक्षाची नालायकीहि तो प्रचारक भल्याबुऱ्या उपायानी आपल्या श्रोत्याच्या गळी उतरविण्याची खबरदारी घेतो. अशाच प्रसगी प्रचारातील खरे-खोटे किती, अतिरजितत्व किती हे ऐकणाराना चटकन् ध्यानात यावयास पाहिजे ही गोष्ट प्रचाराच्या मानसशास्त्राच्या अध्ययनाने कळ शकते

**रोगनिवारण व मानसशास्त्र** :—मानसिक रोगातून रोग्याची मुक्तता करणारा एक मानसशास्त्रप्रवीण वैद्यवर्ग सध्या पुष्कळ मोठमोठ्या शहरात कार्य करीत आहे व्याधीने पछाडलेली, माणसे, विकृतमज्ज असे रोगी, दुष्टाचरणी मुले, वेडे, इत्यादि माणसे आजपर्यंत समाजाच्या हेटाळणीस व तिरस्कारास पात्र झाली होती मानसशास्त्रज्ञाने या तऱ्हेच्या रोग्याना मोठेच वरदान दिले आहे फुकट गेलेला व निव्वळ भारभूत झालेला हा समाजाचा भाग आता निरनिराळ्या मानसशास्त्रीय उपायानी आधिमुक्त करता येतो व त्यातील पुष्कळजण पुन्हा समाजाला उपयुक्त असे घटक बनत आहेत

**न्यायालयें व मानसशास्त्र** :—खुद्द न्यायसभेंत, गुन्ह्याचा शोध लावताना, दुर्वर्तनी व गुन्हेगार माणसाशी वागताना मानसशास्त्राचा खूप उपयोग होतो साक्षीदार खरे बोलत आहे की खोटे बोलत आहे, हे अनेक युक्त्या-प्रयुक्त्यानी ठरविता येते.

असत्यशोधक यंत्राबद्दल मागें उल्लेख आलाच आहे. भावनानिदर्शक असें हें यंत्र गुन्हा शोधून काढताना फार मोठें सहाय्य करतें.

दुर्वर्तनी व कायमचे गुन्हेगार असणाऱ्या लोकांसाठी मानसशास्त्राच्या नियमानुसार सुधारणा-शाळा स्थापितां येतात. कारागृहात गुन्हेगाराशीं वर्तन ठेवताना दक्षता घेतली तर पुष्कळ गुन्हेगार सुधारण्याचा संभव असतो. दुर्वर्तनी मुलांसाठी तर अनेक देशांत "बालराज्यें" (Little Common wealths ) स्थापना झाली आहेत. त्यक्त, बहिष्कृत अशा मुलाकरवीं ह्या शाळांतून अनेकविध विधायक कार्यें आज करून घेतलीं जात आहेत.

**आत्मविद्या व मानसशास्त्र** —मानसशास्त्र हे तर आत्मविद्येचा गाभा आहे माणसाच्या शरीरात वावरणारा 'मी' हा कोण, हे जाणण्याला मानसशास्त्राशिवाय इतर शास्त्रे निरुपयोगी ठरतात वेदान्तातील आत्म्याची कल्पना घ्या सर्व प्राणिमात्राची समवृत्ति ठेवणारा हा आत्मा म्हणजे मानसशास्त्रातील सहजप्रवृत्तीच्या उदात्तीकरणाची अतिम सीमाच होय आत्मविद्येमध्ये शील, इच्छाशक्ति याना मोठे स्थान आहे मानसशास्त्राच्या पूर्ण अध्ययनाने याची आपणास चागली कल्पना येते

मानसशास्त्र अद्याप बाल्यावस्थेत आहे हे खरे; पण या शास्त्राने आज मानवी जीवनाच्या बहुतेक सर्व बाजूना स्पर्श केला आहे, यात शका नाही. पन्नास वर्षांपूर्वीचे बालसगोपन आणि आजचे बालसगोपन यात जे महदतर दिसते त्याच्या मुळाशी मानसशास्त्राची वाढ हेच कारण नाही काय? सुशिक्षित आईबाप व वडीलधारी माणसे आज मुलाशी ज्या रीतीने वागतात ती पद्धत पन्नास वर्षापूर्वी रूढ होती का? शिक्षणक्रम व शिक्षण-पद्धति यात आज किती बरे क्रान्ति झालेली दिसते? व्यापार-उदीम, विक्री-खरेदी, कारखानदारी यातहि मानसशास्त्राने विलक्षण बदल केला आहे घरातील मानसशास्त्र कारागृहातहि पोचले आहे कारागृह म्हणजे निर्दयता, कारागृह म्हणजे छळ, ही कल्पना हळूहळू बदलत असून कारागृहे म्हणजे सुधारणाशाळा, कारागृहे म्हणजे पशूना माणसे बनविण्याची कार्यालये असाच अर्थ रूढ व्हावयास लागला आहे

मानसशास्त्राचा अवतार हा असा सर्वकष आहे मानवी व्यवहार व मानसशास्त्र याचे समीकरण बनत आहे मानसशास्त्राच्या अध्ययनाचा सर्वात मोठा फायदा म्हणजे माणूस माणसाला ओळखतो हा तर आहेच; पण माणूस स्वतःला ओळखू शकतो हा आहे स्वतःबद्दलच्या अनेक आभासमय कल्पनानी मनुष्याच्या हातून अनेक अपराध, अनेक चुका झाल्या आहेत व त्याचा परिणाम सर्वांनाच भोगावा लागलेला आहे. यापुढे माणूस स्वतःला जसजसा अधिक ओळखू लागेल तसतसे हे अपराध व चुका टाळतील. माणूस व त्याच्याबरोबरच समाजहि सुखी होईल ( Know Thy Self ) (आत्मान प्रथमं विद्धि) या ध्येयाप्रत पोंचण्याचा मार्ग मानसशास्त्राने सुकर केला हा मानसशास्त्राच्या अध्ययनाचा लहानसहान फायदा नाही.

# संदर्भ ग्रंथ


| | |
|---|---|
| न. ल. आठवले | बालकांचा मनोविकास |
| L. L. Bernard | Instincts |
| L. Brackenbury | A Primer of Psychology |
| R. B. Cattell | Your Mind and Mine |
| J. Drever | An Introduction to Psychology of Education. |
| J. Drever | Psychology of Everyday Life |
| B. Dumville | Child-Mind |
| G. T. Fechner | Elements of Psycho-physics |
| J. C. Flugel | A Hundred years of Psychology |
| G H. Green | The Mind in Action |
| W. James | Principles of Psychology Vol. I, II |
| भा. धों. कर्वे | अध्यापन आणि मानसशास्त्र, बालमनाचे रहस्य |
| म. का कारखानीस | बालमन |
| Loveday & Green | Introduction to Psychology |
| H. V. Matthew | Psychology & Principles of Education |
| W. Mc Dougall | Introduction to Social Paychology |
| | Psycho-analysis & Social Paychology |
| | The Group-Mind |
| | An Outline of Psychology |
| C. A Mercier | Crime and Insanity |
| G. Murphy | A Briefer General Psychology |
| E. E. R. Mumford | The Dawn of Character |
| C S Myers | An Introduction to Experimental Psycholagy |
| ह. ना. नेने | शिक्षणकला आणि मानसशास्त्र |

| | |
|---|---|
| C. K. Ogden | The A B C of Psychology |
| ना. सी. फडके | मानस मंदिर |
| S. Radhakrishnan | Essentials of Psychology |
| W. T. Robinson | Psycho-analysis |
| E. A. Ross | Social Psychology |
| J. S. Ross | Groundwork of Educational Psychology |
| B. Russell | The Analysis of Mind |
| S. S. Sargent | The Basic Teachings of the Great Psychologists |
| G. F. Stout | A Manual of Psychology |
| शं. ब. सुखटणकर | शैक्षणिक मानसशास्त्र |
| R. H. Thousless | General and Social Psychology |
| J. Ward | Psychologcial Principles |
| J. B. Watson | Behaviourism |
| R. S. Woodworth | Contemporary Schoolsof Psychology, Psychology (A Study of Mental Life) |
| Daniel Katz<br>R. L. Schanck | Social Psychology |
| Sutherland<br>Woodworth<br>Maxwell | Introductory Sociology |
| L. Bloomfield | Language |